# मराठी
# वाङ्मयाचा परामर्श

[ आरंभापासून ते १८७४ पर्यंत ]

प्रा. गं. भा. निरंतर, एम्. ए.
फर्ग्युसन कॉलेज, पुणें

व्हीनस बुक स्टॉल : पुणें २

# प्रस्तावना

अयोग्य अवहेलना आणि अप्रमाण आदर या दोन्ही विकृत पण अपरिहार्य अवस्था ओलांडून, मराठी वाङ्मयाचा अभ्यास आज सुस्थिर अवस्थेला येऊन पोहोचला आहे. आणि येथपर्यंत प्रगति होण्याला बऱ्याच अंशीं कारण म्हणजे 'मराठी भाषा आणि वाङ्मय' या विषयाचा अन्तर्भाव पदवीपरीक्षांच्या अभ्यासक्रमांत झाला हें होय. सुव्यवस्थित अभ्याससाधनें असल्याखेरीज कोणत्याहि विषयाचा अन्तर्भाव अभ्यासक्रमांत करण्यात अर्थ नसतो; तर उलट अभ्यासक्रमात अन्तर्भाव झाल्याखेरीज सुव्यवस्थित अभ्यासग्रंथ तयार होत नाहींत-निदान सुगम पाठ्यपुस्तकें निर्माण होत नाहींत,- हेंहि तितकेंच खरें आहे. मराठीचा अभ्यास, या घातुक भोवऱ्यातून आतां निश्चित बाहेर पडला आहे. आणि प्रो. निरंतर यांच्या "**मराठी वाङ्मयाचा परामर्श**" या ग्रंथासारखे ग्रंथ हे या प्रगत अवस्थेचेच पुरावे होत.

अवहेलना आणि वृथाभिमान या दोन्ही रोगांतून मुक्त झाल्यावर, मराठीचा अभ्यास करणाऱ्या विद्वानापुढे नवीनच अडचणी उपस्थित झाल्या आहेत. मराठीच्या पद्धतशीर अभ्यासास सुरवात होण्याच्या सुमारास, भोंवतालच्या जगांत अभ्याससाधनें, अभ्यासपद्धति आणि संशोधनशास्त्र, यांनीं एवढा पल्ला मारला आहे कीं महत्त्वाकांक्षी मराठी पंडितांना 'आधीं हें करूं कीं तें करूं'— आणि "करावें तरी काय काय ?" असा थोडा कौतुकास्पद संभ्रम पडल्यास नवल नाहीं. शब्दकोश, भाषाशास्त्र, साहित्यशास्त्र, नाट्यशास्त्र, कादंबरीशास्त्र, साद्यंत वाङ्मयेतिहास, खंडशः इतिहास, पृथक् कविचरित्रें...एक ना दोन! यांतील कोणतें करावें आणि कोणतें सोडावें, असें होऊन गेल्यास नवल नाहीं या सर्व लेखनांत विशिष्ट कवीच्या अभिमानाचा अगर विशिष्ट इंग्रजी पुस्तकाच्या अनुकरणाचा प्रभावहि मधून मधून प्रेरक होत असे. पण या विस्काळित आणि विपुल अभ्यासवाङ्मयांतूनहि अखेर योग्य त्या विषयांनाच प्राधान्य मिळालें; व आज मराठी वाङ्मयांतील प्रमुख खंड आणि प्रमुख प्रश्न निश्चित झाले आहेत. आणि प्रमुख प्रश्न निश्चित होणें, हा कोणत्याही विषयाच्या अभ्यासाचा एक महत्त्वाचा टप्पा असतो.

केवळ विहंगमावलोकन केलें तरी असें दिसेल कीं महानुभाव लेखक, ज्ञाने श्वर, रामदास, आणि केशवसुत यांच्या वाट्याला जेवढा अभ्यास आणि जितके वाद आले, तितके इतरांच्या वाट्यास आलेले नाहींत आणि यांतील प्रत्येका संबंधींचे मुख्य ' वाद ' कोणते तेंहि आतां ठरून गेल्यासारखें झालें आहे, त्यांना दिलीं गेलेलीं अभ्यसनीय उत्तरेंहि आतां लोकविश्रुत आहेत.

व म्हणूनच आता पृथक् अभ्यासाची, एकांड्या अभिमानाची, आणि एकमार्गी संशोधनाची प्राथमिक कामगिरी होऊन गेलेली आहे. आतां या विपुल आणि विस्कळित अभ्यासाची मोजणी आणि बांधणी करण्याची कामगिरी सुरु झाली आहे.

प्रो. गं. भा. निरंतर यांच्या या ग्रंथाचें स्वरूप अशाच "**अभ्यासाच्या अभ्यासा**"चें आहे. ' अभ्यासाच्या अभ्यासाचें ' हें काम आज किती उपयुक्त आहे, किती आवश्यक आहे, किती निकडीचें आहे, हें विद्यालयांत अध्यापन करणारांना तरी वेगळें सांगण्याची गरज नाहीं. पण हें काम जितकें अगत्याचें आणि निकडीचें आहे, तितकेंच तें अवघड आणि ' अप्रिय ' आहे ! ' अप्रिय ' असें मी दोन अर्थांनीं म्हणतो. लेखकाला स्वतःलाहि इतरांनीं केलेल्या अभ्यासाची कांटेतोल मोजमाप करण्यापेक्षां स्वतःचीं मतें अस्खलितपणें सांगणें अधिक सोयीचें पडतें; आणि सर्वसामान्य वाचकालाहि जन्मतारखांची चर्चा, ओवी संख्येचा हिशोब, आधार ग्रंथाची आणि पुराव्याची छाननी, साक्षीपुरावे आणि उतारे, यापेक्षा एकमुखी ' पोवाडा ' अधिक प्रिय होतो.

निरंतर हे अभ्यासक आहेत, तसे साहित्यिकहि आहेत. ' साहित्यिक ' निरंतरांचा ग्रंथ याहून किती वेगळा झाला असता, हें निरंतरांची कोटिक्रमशैली आणि भाषाशैली ज्यांच्या परिचयाची आहे, त्यांना वेगळे सांगावयास नको ! पण तो आकर्षक वाङ्मयेतिहास वाचल्यानंतर विद्यार्थ्यांना फक्त निरंतरांचा दृष्टिकोन कळला असता, पण त्यांत उल्लेखिलेले ( आणि बहुधा खंडित केलेले !) इतर ग्रंथ वाचण्याची आवश्यकता फिरून उरलीच असती !

या ग्रंथांत निरंतरांनीं स्वतःला कुशल सूत्रधाराप्रमाणें पडद्यांत ठेवलें आहे आणि आतांपर्यंत झालेल्या नामांकित अभ्यासकांचें अभ्यासफल तेवढें विद्यार्थ्यांच्या पुढें वाढून ठेवलें आहे. स्वतंत्र वाङ्मयेतिहास लिहिण्याची पात्रता व

तयारी असलेल्या विद्वानानें तयार केलेला अभ्याससाधन ग्रंथ, केवळ परीक्षोपयोगी ग्रंथाहून किती वेगळा होतो, हें या पुस्तकावरून लक्षांत येईल.

या ग्रंथाचा पहिला गुण म्हणजे पांगारकर, भिडे, भावे, फाटक, बनहट्टी, ‥से, पंगु यांसारख्या जुन्या वाङ्मयाच्या प्रसिद्ध अभ्यासकाचे समर्पक आणि ‥ुल आधार विद्यार्थ्यांना उपलब्ध करून देणें, हा होय. लेखकानें स्वमत-‥स्तारावर नियंत्रण घातलें असलें, तरी इतरांच्या मतांची निवड, तुलना, व ‥ननी या बाबतींत त्याचा जागरूक अधिकार जागजागीं जाणवतो. इतर ‥द्वानांच्या मताची ग्राह्याग्राह्यता तर लेखकानें सहजाधिकारानें पण सूचकपणें ‥खविलीच आहे; पण अवश्य तेथें प्रसिद्ध अभ्यासकांचे प्रमादहि दाखविले आहेत. माहितीची विपुलता, स्वमताचा संकोच आणि विधानांतील व विवेचनांतील निश्चितता ( sureness of touch ) या तीन गुणामुळें प्रौढ अभ्यासकांना हा ग्रंथ बहुमोल वाटेल. अभ्यासाचीं साधनें विखुरलेलीं व विस्कळित असल्यानें आपली ही साधी भोळी स्वभाषा, प्राचीन संस्कृतभाषेहून आणि संपन्न इंग्रजी भाषेहूनहि, विद्यार्थ्यांना अडचणीची होऊन बसते ! भाव्यांच्या ‘ महाराष्ट्र–सारस्वतापासून ’ तों प्रो. पंगू यांच्या “ प्राचीन कविपंचक ” व “ सामराज ” या अभ्यासोपयुक्त ग्रंथापर्यंत; अनेक पुस्तकांनीं ही अडचण कमी करीत आणली होती. अलीकडे डॉ. ग्रामोपाध्ये आणि डॉ. तुळपुळे यांचींहि वेगवेगळ्या कालखंडांना उपयुक्त अशीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. प्रो. निरंतर हे आज या सर्व उद्योगी आणि साक्षेपी अभ्यासकाच्या अभ्यासाचें मंथन करून ‘ नेमकें आणि निकें ’ नवनीत विद्यार्थ्यांच्या हातीं देत आहेत. हें पुस्तक विशिष्ट कवींपुरतें अगर कालखंडापुरतें मर्यादित नसून, बी. ए. च्या विद्यार्थ्यांना अभ्यासाव्या लागणाऱ्या संपूर्ण कालखंडाला धरून असल्यानें, या एकाच पुस्तकांत विद्यार्थ्यांना हवी असलेली सर्व माहिती सांपडेल, ही सोय विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें खरोखर बहुमोल आहे. केवळ तरुण विद्यार्थ्यांनाच ‥हे, तर ज्यांचें वाचन विपुल झालें आहे व ज्यांचीं मतेंहि पक्व झालीं आहेत अशा अध्यापकांना आणि साहित्यिकांनाहि नित्योपयोगी संक्षिप्त माहिती पुस्तक ( Ready-reference book ) म्हणून हें पुस्तक अभ्यास-साहित्यांत कायमचें ठेवावेंसें वाटेल !

कोणत्याहि संपन्न आणि विविधरूप वाङ्मयाच्या अभ्यासास, अभ्यासकाचे अंगीं विविध गुण असावे लागतात, हें मराठीच्या क्षेत्रांत लक्षांत ठेवण्याची विशेषच गरज आहे. मुकुंदराजाचा काल ठरविण्यास ज्या गुणाची उपयुक्तता असेल, त्याचा उपयोग नामदेवाच्या अभंगांतील आर्तता अनुभविण्यास असेलच असें नाहीं. ज्ञानेश्वरींतील वाक्‌चातुर्य चाखणारास अमृतानुभवांतील ' अज्ञानखंडन ' आणि ' ज्ञानखंडन ' चाखतां येईलच असें नाहीं मुक्तेश्वर–श्रीधरांच्या ओवीसागरांत रममाण होणारा रसिक, रामदासाची प्रखर वैखरी पाहून बिचकण्याचाहि संभव आहे. मयूर कवीच्या काव्यात आनंद मानण्याला कोणत्या ' गुणा 'ची आवश्यकता आहे, याचा तर प्रस्तुत लेखकाला अद्याप पत्ताच लागलेला नाहीं ! आणि हें सर्व जुनें म्हणून ' सोनें ' मानणें ठरलें, तरी केशवसुतादि आधुनिक कवींची जात ओळखण्यास संस्कृत अध्ययन, पूर्वजाभिमान अगर ग्रंथाधार यांचाहि फारसा उपयोग नाहीं ! आणि म्हणूनच संस्कृत अगर इंग्रजी भाषेच्या अभ्यासानेंहि या असंपन्न पण वाढत्या वाङ्मयाच्या अभ्यासांत अभ्यासकाच्या व्यापक रसिकतेची चांगलीच कसोटी लागते !

पण यामुळे वाङ्मयाभ्यासाच्या क्षेत्रांत एकदेशीय अभिमानामुळें माजणारे दुराग्रह बरेच वाढलेले दिसतात. काहींच्या मतें तर वाङ्मयाभ्यासाला व्यक्तिनिरपेक्ष संशोधन–शालेचें ( लॅबोरेटरीचें ! ) स्वरूप येणें म्हणजे शास्त्रीय बाण्याचा परमोत्कर्ष होय ! अनेक सरकारी नोकरांनीं मिळून तयार केलेल्या खानेसुमारीच्या किंवा पीक-पाहणीच्या रिपोर्टांतील निर्विकार भूमिका वाङ्मयसमालोचनेंत येईल तो सुदिन, असें यांचें मत असतें. लेस्ली स्टीफन् या अभ्यासकाच्या टीकाग्रंथात; प्रो. लेग्वॉ ( पॅरिस् ) यांनीं काढलेला ' Self-repression ' अथवा व्यक्तिमत्त्वावरोध हा गुण ( ? ), अशा अहवालवजा अभ्यासात प्रमुख गणला जातो. या गुणाचेंहि कांहीं कार्य नाहीं असें नाहीं, पण केवळ या गुणाच्या सहाय्यानें संपूर्ण वाङ्मयाभ्यास होऊं शकणार नाहीं; विशेषतः जुन्या संतकवींच्या वाङ्मयाचे स्वरूप आणि मूल्य ओळखतांना तर अवरोधापेक्षा उन्मादाचीच आवश्यकता अधिक आहे. ते कवी अद्वैती होते कीं विशिष्टाद्वैती होते, हें ठरवितांना न्यायवेदान्तादिकांचा अभ्यास उपयोगी पडेल;

पण त्यांच्या अर्भकप्राय लडिवाळपणाचा, हट्टाचा, आणि आक्रोशाचा नाजुक हळवेपणा ओळखण्यास शांकरभाष्याचा अगर रामानुज-भाष्याचा उपयोग नाहीं !

**अब तो मेरा गिरिधर गोपाल, दूसरा न कोइ**

*  *  *  *

**अब तो बात फैल गइ जाने सब कोइ**
**दास मीरां लाल गिरधर, होनी सो होई**

"आतां गिरिधर गोपालच काय तो माझा उरला आहे. दुसरें कोणी नाहीं."

" आता ही गोष्ट बाहेर पसरली; सर्व लोकांना ठाऊक झाली ! गिरिधर गोपालजाची दासी मीरा म्हणते, जे व्हायचे ते होऊन चुकलें !"

असे उद्गार जेव्हां संतसम्राज्ञी मीराबाई काढते, तेव्हा त्यातील काव्यगुणांचें वर्णन करताना विद्वानाना ' नेति ' ' नेति'च्या हतबल भाषेचाच आश्रय करावा लागतो ! एका आधुनिक गुर्जरविदुषीला हेंच करावे लागलें आहे. मीराबाईच्या काव्यासंबंधीं ती म्हणते:—

She has only one thing to say, and in consequence her range is limited. Her poems have elegance and delicacy rather than variety. Her heart is capable of deep feeling. but its expression is limited by her comparative ignorance. Mira is not ego-centric, only intense; not voluptuous, nor profound.

या वर्णनांत मीराबाईच्या सामर्थ्याहून दुबळेपणाचेंच वर्णन अधिक आहे. तथापि कवयित्री दुर्बल असली, तरी तिचें काव्य मात्र तीराप्रमाणें हृदयाचा ठाव घेणारें आहे. त्या तीरानें विव्हल होण्याला ' हृदय ' बरीक हवें ! कारण, मीराबाईच्याच शब्दांत सागायचें झालें तर—

---

Lilavati Munshi, quoted by K M. Munshi in Gujrat and its Literature.

## ' घायलकी गत घायल जाने ' !

सारांश नुसत्या संशोधनानें तर काम भागणार नाहींच; पण साध्या अलंकारशास्त्रीय ' रसिकतेनें 'हि भागणार नाहीं. ज्या अपूर्व आणि अपार्थिव ' रसा 'ची तृषा नामदेवासारख्या आणि जनाबाईसारख्या अशिक्षित भगवद्भक्तांनाहि लागली होती, त्या रसाची तोंडओळख तरी असणें आवश्यक आहे.

आणि या अपार्थिव आर्ततेच्या प्रांतांत जेव्हां ज्ञानेश्वरासारखा बालबृहस्पति शिरतो, तेव्हां तर बुद्धि आणि भावना या दोहोंचीहि पुरी परीक्षाच होऊन चुकते ! नुसते साधर्म्यावर आधारलेले अलंकार घेतले तरी सामान्य कवीचा आवांका आणि ज्ञानेश्वरासारख्याची झेप यांतील तफावत ध्यानीं येऊन मन स्तिमित होतें ! ॲरिस्टॉटल आपल्या ' ऱ्हेटरिक 'वरील ग्रंथांत* रूपकालंकारासंबंधीं एक आश्चर्यकारक अभिप्राय व्यक्त करून म्हणतो:

But metaphors please, for they beget in us by the genus or some common thing to that with another, a kind of science.

दोन वस्तूंतील समानधर्माची जाणीव देऊन एक प्रकारच्या शास्त्रीय ज्ञानाची वाढ रूपकादि अलंकार करतात, हें विधान ज्ञानेश्वराच्या काव्याइतकें दुसऱ्या कोणाच्या काव्यासंबंधीं सार्थ असेल ! आपल्या आवडत्या पांडुरंगावर कांद्यामुळ्याचें रूपक करणाऱ्या सावता माळ्यापासून तों उपमादृष्टान्ताच्या निमित्तानें अखिल लोकव्यवहाराचें अन्तर्ज्ञान दाखविणाऱ्या ज्ञानेशा पर्यंत, सर्वांनीं ईशप्रेम या असाधारण विषयावर मराठींत काव्य केलें आहे. त्याची परीक्षा करण्यास केवळ बुद्धि अगर विद्या असून भागणार नाहीं परमार्थासंबंधीं आर्तता आणि भगवद्भक्तासंबंधींची भक्तिमानताहि हवी.

---

* ' Rhetoric ' या शब्दाचा अर्थ सामान्यतः ' अलंकारशास्त्र ' असा होतो; परंतु ॲरिस्टाटलच्या ' ऱ्हेटरिक ' या ग्रंथाचा विषय तेवढाच आहे असें नाहीं. तो ग्रंथ ' वाक्चातुर्य '-आणि तदंगभूत इतर विषय या विषयींचा आहे.

मराठी वाङ्मयाच्या अभ्यासांत कोणत्याहि एकांगी पद्धतीचें स्तोम न माजतां ही बहुंगी परंपरा वाढीस लागावी, हींच कोणाहि वाङ्मयभक्ताची इच्छा असणार.

अशा अभ्यासाची पहिली पायरी म्हणून प्रो. निरंतर यांच्या या सुंदर अभ्यासग्रंथाचा तरुण अभ्यासकास उपयोग होवो.

ता. २६–३–४९<br>
तुकाराम–आश्रम<br>
टिळक-वाडी पुणें.

**श्रीकृष्ण के. क्षीरसागर**<br>
महाराष्ट्र ए. सोसायटीचें कॉलेज, पुणें.

# हृद्गत

मराठी वाङ्मयाच्या प्राचीन कालापासून तों अर्वाचीन काळापर्यंतच्या कालखंडाचा अभ्यास करण्यास भावे, भिडे, पांगारकर, पोतदार, सरदार, इत्यादिकांचे ग्रथ हींच मुख्य साधनें आहेत, परतु यापैकी कांहीं ग्रथ सध्यां मिळत नाहींत आणि कांहीं फारच मोठे आणि अव्यवस्थित आहेत. पुन्हां या ग्रंथकारांच्या ग्रथांतील कांहीं विषयासबंधी जें बरेंच नवें विवेचन झालें आहे, होत आहे, त्यांचाहि परिचय विद्यार्थ्यांस असणें आवश्यक आहे. वरील विवेचन निरानेराळ्या नियतकालिकांतून, ग्रथांतून, लेखसंग्रहातून प्रसिद्ध झालें आहे. या जुन्या व नव्या विवेचनाचें सुसंगत संकलन करून वाङ्मयेतिहासाच्या विद्यार्थ्यांस सहाय करावें व मूळ ग्रथ वाचण्यास त्यास वेळ मिळावा या हेतूनें हा परामर्श घेतला आहे विविध मतांचें संकलन करताना मला जें मत ग्राह्य वाटतें, त्याचा परिचय विद्यार्थ्यांस होईलच. परंतु कोणतेंही अनुमान वा मत स्वीकारण्यापूर्वी प्रचलित मतांचा परिचय असणें जास्त आवश्यक आहे म्हणून मी या ग्रंथांत माझ्या मतांचा जास्त उहापोह केलेला नाहीं.

या कालखंडातील मुख्य ग्रथकार, त्यांचे ग्रथ, त्या ग्रथद्वारा त्यांनीं व्यक्त केलेले आपले विचार, दृष्टिकोन यांचा परिचय करून देतांना स्थल-मर्यादेचें बंधन अपरिहार्य होतें. पण ते बधन संभाळून घेतलेला हा परामर्श अभ्यासकास उपयुक्त ठरेल अशी आशा आहे.

या परामर्श–कार्यांत माझीं मतें निश्चित करण्यास मला ज्या अभ्यासकांच्या लेखनाची फार मोठी मदत झाली त्यांचे उल्लेख ग्रथांत केलेच आहेत. त्या ग्रंथकारांचा मी अतिशय आभारी आहे. त्यापैकीं मी स्वीकारलेली कांहीं अनुमानें विवाद्य आहेत याची मला जाणीव आहे. तरी त्यांतला जो भाग मला वादातीत असा वाटतो तोच मी विशेषतः या ग्रथात दिला आहे.

ग्रथ लिहीत असतां विचारविनिमयाच्या रूपानें मला अनेकांनीं फार मोटी मदत केली. त्यांत आचार्य शं. वा. दांडेकर, प्रा. श्री. रा. पारसनीस, प्रा. श्री. के. क्षीरसागर, गोपीनाथ तळवलकर, प्रा. गं. बा. सरदार यांचा प्रामुख्यानें उल्लेख करून माझी कृतज्ञता व्यक्त करीत आहे. संक्षेपांचा खुलासा शेवटीं दिला आहे.

पुणें, रामनवमी, शके १८७१ — गं. भा. निरंतर

# अनुक्रमणिका

**महत्त्वाची दुरुस्ती—**

[ पृ. ६० वर प्रकरणांक ५ पडला आहे, तो ६ असावयास पाहिजे. पृ. २७४ वर मोरोपंत या प्रकरणाचा क्रमांक २० पडला आहे तो १९ असावयास पाहिजे. ]

# मराठी वाङ्मयाचा परामर्श

## १ आद्य ग्रंथ आणि ग्रंथकार

१ मराठीचा जन्म :

**श्री चावुण्डरायें करवियलें**

आज उपलब्ध असलेलें हें मराठींतलें पहिलें वाक्य आहे. हें वाक्य म्हैसूरजवळ श्रवणबेळगोळ येथील शिलालेखांत आलेलें आहे. हा लेख इ. स. ९८३ ( श. ९०५ ) म्हणजे ज्ञानेश्वरीपूर्वी ३०७ या वर्षी कोरला आहे. गंग घराण्यांत राचमल्ल राजाच्या कारकीर्दीत चावुण्डराय हा प्रधान होता. त्यानें बाहुबलजी उर्फ गोमटेश्वर याचा एक अतिशय प्रचंड असा दगडी पुतळा उभारला आणि पुतळ्याच्या खालीं निरनिराळ्या देशभाषांत ही गोष्ट दगडावर कोरून नमूद केली. त्यांत वर दिलेली पहिली ओळ मराठी भाषेंत आहे. दुसरी ओळ कांहीं वर्षांनंतर कोरलेली असावी. तीहि मराठीतच आहे. ती—

**गंगराजें सुत्तालें करवियलें**

अशी आहे. मराठीचा आरंभ अशा स्वरूपांत इ. स. ९८३ ( श. ९०५ ) मध्यें झालेला दिसतो.

परंतु राजवाडे यांच्या मतें मराठी भाषेंतील जुना लेख याहीपूर्वीचा आहे. त्यांनीं संपादून प्रसिद्ध केलेला चिकुर्डे येथील ताम्रपट इ. स. ७३६ ( श. ६५८ ) मधील आहे.

या ताम्रपटांत 'संस्कृत शब्द व रूपें आढळतात, तरी भाषेची मोडणी मराठी आहे.' उदाहरणार्थ त्या ताम्रपटांतील पुढील भाग पहा.

हस्तीनापुरी सुखसंकथा विनौदी राज्य करित दशिणदिसावरे दिगुविजययात्री विजयं करवुन करहाटकंबलेश्वर देवा संनिधी कटकमेलिकार करवुन पित्रुसत्रुनिर्मिती सर्पयाग करित अर्हेद्रभक्षक स्वहा तथा लवणांबुधिमाडलैाह सुभ्यंतरत धर्मपतिष्टे तदनंतरे करहाट ४५०० भ्यतर कारिवेनव्दाड ग्रामौच बलियवाड, चिकलवाड ग्रामा मुलिका मंनेयराम गावुंडेया मद्हस्तीपालरक्षपालकराया मंनवुन भाव संवछरे वैशाखमासे क्रिष्ण पक्षे भौमदिने अष्टम्यां तिथौ दत्त

(म. श. को. प्र. ५-२)

वरील उताऱ्यांत ‘ करित, ’ ‘ करउन ’ इत्यादि मराठी रूपें आणि ‘ ग्रामौच, ’ ‘ वैशाखमासे, ’ ‘ क्रिष्ण पक्षे, ’ ‘ भौमदिने, ’ इत्यादि संस्कृत रूपें आहेत.

राजवाडे यांच्या मतें या ताम्रपटाचा काल इ. स. ७३६ (श.६५८) असला, तरी भाषेवरून तो पुढील काळांतील दिसतो. भाषेचें स्वरूप बरेंच अर्वाचीन असल्यामुळें मराठींतील सर्वांत जुना लेख म्हणून हा ताम्रपट स्वीकारतां येत नाहीं. शिवाय चालुक्यांचीं जीं नांवें ताम्रपटांत आढळतात तीं यांत नाहींत (या. का. म. प्र.२) म्हणून राजवाडे यांनीं दिलेला या ताम्रपटाचा काल प्रमाण मानतां येत नाहीं.

“ तथापि हा काल जर बरोबर असेल तर देशी भाषा खिस्ती शकाच्या सातव्या शतकांत रूढ झाल्या ’ (म. श. को. प्र. ५–२) असें सिद्ध होईल.

मराठी शब्दांचा प्रथम उपयोग मंगळवेढें येथील इ. स. ४८८ च्या ताम्रपटांत आढळतो. त्यांतील खळोजि पवार, पटल, इत्यादि शब्दांच्या आधारें राजवाडे मराठी भाषेचा जन्म ५ व्या शतकापर्यंत मागें खेंचतात. परंतु मंगळवेढें येथील ताम्रपटाचा इ. स. ४८८ हा काल बरोबर नाहीं. परमार घराणें ९ व्या शतकाच्या पुढचें आहे. म्हणून हा ताम्रपट मराठी भाषेचा आरंभ म्हणतां येत नाहीं. (या. का. म. प्र. २)

मराठी शब्द श. ६०२ मधील ताम्रपटापासून आढळतात. उदा०

श. ६०२ ताम्रपट.

पन्नास, प्रिथिवी

श. ६२१ शिलालेख

सुंक, बादावी

श. ६७५ ताम्रपट :

देऊळवाडे, पारगांव, आईतवाडें.

श. ६८० ताम्रपट :

दोसिराज, भंडारगविठुगे

श. ७२८ ताम्रपट :

वारिखेड

श. ७३५ ताम्रपट :

खळखळ

श. ७५७ ताम्रपट :

येज्ञ

श. ८१० ताम्रपट :

जो, पुन्य, दह, थिति.

श. ८३२ ताम्रपट :

वइरि

श. ९०० ताम्रपट :

सांव्राज्य

श. ९२२ शिलालेख :

करणिक, थीर

श. १०१६ ताम्रपट :

कोंकण, रिषि, संवतु, भाभण, राय

श. १०४९ ताम्रपटः

सकु, घोरपड, मोर

—( म. श. को. प्र. ५-२ )

ताम्रपट, शिलालेख यांत शब्दरूपानें मराठी भाषा अशी श. १०४९ ( इ. स. ११२७ ) पर्यंत विखुरलेली आढळते.

ज्याचा काल मतभेदातीत आहे असा श्रवणबेळगोळ येथील शिलालेख आहे. म्हणून त्यांतील पहिली ओळ मराठींतलें पहिलें वाक्य इ. स. ९८३ ( श. ९०५ ) मधील होय.

मराठीचा वाक्य-रूपानें अवतार इ. स. ९८३ मध्यें झाला.

ग्रंथरूपानें मराठीचें आद्य स्वरूप दाखविणारा पहिला ग्रंथ म्हणून 'अभिलषितार्थ चिंतामणि अथवा मानसोल्लास' या ग्रंथाचा निर्देश करण्यांत येतो. हा ग्रंथ इ. स. ११२९ मधील आहे.

हा ग्रंथ चालुक्य कुळांतील दुसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा सोमेश्वर यानें लिहिला आहे. सोमेश्वर इ. स. ११२७ मध्यें गादीवर बसला. वरील ग्रंथ त्यानें इ. स. ११२९ मध्यें लिहिला.

हा ग्रंथ संस्कृतांत आहे. त्यांत एका भागांत मराठी पद्यें दिलीं आहेत. या ग्रंथांत मराठी प्रथम ग्रंथनिविष्ट झाली. पण मराठीतला संपूर्ण ग्रंथ हा नव्हे.

'अभिलषितार्थ चिंतामणि' या ग्रंथांत जीं मराठी पद्यें आहेत त्यांपैकीं उदाहरणार्थ एक पहाः

**जेणें रसातलउणु मत्स्यरूपें वेद आणियले**
**मनुशिवक वाणियलें तो संसारसायरतारण**
**मोहंतो रावो नारायणु जो गींचों.**

अर्थः—ज्यानें रसातलांतून मत्स्यरूपानें वेद आणिले, मनुशिव वर्णिले ( स्तविले ) तो संसारसागरतारक मो ( ह ) हंता राजा नारायण.

"मराठी भाषेची शिष्ट ग्रंथांत आलेली ही पहिलीच झुळूक दिसते म्हणून तिचें विशेष कौतुक करण्यासारखें आहे."

[ म. भा. वा. इ. ७७ ]

"यापूर्वी निदान शंभर वर्षे तरी मराठी भाषा ही बोली म्हणून अस्तित्वात असावी."

[ या. का. म. ग्र. २ ]

## २ आद्य ग्रंथकार

देवगिरीचें यादव घराणें आणि मराठी वाङ्मय यांचे संबंध आरंभापासूनच दिसतात.

मराठींत संपूर्ण लिहिलेला असा पहिला ग्रंथ 'विवेकसिंधु' हा होय. तो लिहिणारा मुकुंदराज हा अर्थात् आद्य मराठी ग्रंथकार ठरतो.

'विवेकसिंधू' मध्यें ग्रंथकालाचा उल्लेख असा आहे :

**शके अकरा दाहोत्तरू**
**साधारण संवत्सरू**
**राजा शारंगधरू**
**राज्य करी**
**ऐसा समयो सर्वोत्तमू**
**तेथ मुकुंद द्विजोत्तमू**
**विवेकसिंधु मनोरमू**
**निर्मिता जाला**

या उल्लेखावरून हा ग्रंथ इ. स. ११८८ ( श. १११० ) मध्यें लिहिलेला आहे. पण कालाचा वरील उल्लेख ज्या भाषेंत केलेला आहे ती भाषा बाराव्या शतकांतली नाहीं ! ! म्हणजे मूळ ग्रंथ आज मूळ स्वरूपांत उपलब्ध नाहीं. त्याचीं हस्तलिखित रूपांतरें होत गेली आणि आज उपलब्ध असलेलें हस्तलिखित भाषेच्या दृष्टीनें मुळापेक्षां पुष्कळच बदललें आहे. त्यामुळें श. १११० मध्यें मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें तें कळण्यास 'विवेकसिंधू' चें विद्यमान स्वरूप उपयोगी पडत नाही.

शिवाय या कालोल्लेखांतहि चूक आहे. शक-संख्या व संवत्सर-नाम हीं जुळत नाहींत. श. १११० मध्यें कीलक संवत्सर येतो. आणि साधारण संवत्सर श. १११२ मध्यें येतो. ही चूक दुरुस्त केली तरी 'विवेकसिंधू'-च्या रचनाकालांत एकदोन वर्षांचा फरक पडेल एवढेंच ! परतु श. १११२ मधील मराठी भाषेचें स्वरूप कळण्यास 'विवेकसिंधू' चें विद्यमान स्वरूप प्रमाण मानतां येत नाहीं.

परंतु भाषेचा विचार ( भाषाशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचा असूनहि ) बाजूस ठेविल्यास वाङ्मयाचें वैचारिक स्वरूप कळण्यासाठीं 'विवेकसिंधू'-चें विद्यमान स्वरूप स्वीकारण्यास काय हरकत आहे ? मुकुंदराजाच्या मूळच्या पोथींतील शब्दांचीं रूपें बदलेलीं असलीं तरी विचार कायमच आहे कीं नाहीं ?

म्हणून मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा आरंभ आदिकवि मुकुंदराज आणि आद्यग्रंथ ' विवेकसिंधु ' यांपासून करण्यास हरकत नाहीं.

## मुकुंदराज

( इ. स. ११२८–११९८ )

### कालनिर्णय

मुकुंदराजाच्या कालनिर्णयास साहाय्यक असे पुढील उल्लेख ' विवेक-सिंधु ' या ग्रंथांत आहेत :

**( १ ) शके अकरा दाहोत्तरू, इ.**

**( २ ) नृसिंहाचा बल्लाळ**
**तेयाचा कुमरू जयंतपाळ**
**तेणें करविला गदारोळ**
**ग्रंथरचनेचा**

( पूर्वार्ध, अ. ७–१५५ )

**( ३ ) वैनगंगेच्या तीरीं**
**मनोहर अंबानगरी**
**तेथ प्रगटले श्रीहरी**
**जगदीश्वर**

( उत्तरार्ध, अ. ११–३८ )

नृसिंह, बल्लाळ, जयंत, ही त्रयी देवगिरीच्या यादवांत नाहीं. परंतु बल्लाळ म्हणजे भिल्लम असें डॉ. भाऊ दाजी यांच्या मतें दिसतें.

सिंघणाचा बाप आणि भिल्लमाचा मुलगा जैत्रपाळ किंवा जयंतपाळ असें बा. ब. पटवर्धन म्हणतात.

( वु. फा. ले. २. १९१७ ).

भिल्लम यादवाचा काळ इ. स. ११८७ ते ११९१ असा आहे. हा 'विवेकसिंधु'च्या रचना-कालास जुळतो. जैत्रपाळाचा काळ इ. स. ११९१ ते १२१० हा निश्चित आहे.

यावरून मुकुंदराज भिल्लम यादवाच्या वेळीं होऊन गेला असें म्हणतां येतें.

अंबानगरी म्हणजे नागपूर प्रांतांतील अंभोर. कारण तेथें हरिनाथाची समाधि आहे आणि याच प्रांतीं रघुनाथाची समाधि आहे.

अंभोर वैनगंगेच्या कांठीं आहे. बैतुलजवळ खेडलें गांवीं जुन्या किल्ल्यांत मुकुंदराजाची समाधि आहे. अंबानगरी आणि जोगाईचें अंबें यांचा समन्वय कसा लावावा? पांगारकरांचें अनुमान असें कीं, मुकुंदराजाच्या पादुका एखाद्या शिष्यानें जोगाईचें अंबें येथें नेऊन स्थापन केल्या.

( म. वा. इ. १-२९२ )

त्याची समाधि अंभोर ( नागपूर प्रांतीं ) येथें आणि पादुका जोगाईचें अंबें येथें असा समन्वय लावितां येईल. भिडे म्हणतात : 'जोगाई अंबें येथें दाखविण्यांत येणारी समाधि कोणातरी दुसऱ्या मुकुंदराजाची असावी.'

( म. भा. वा. इ. ८१ )

हा ग्रंथ मुकुंदराजानें वृद्धापकाळीं लिहिलेला असावा.

**मज श्वासनिमेषाचा श्रम**
**तेथ कायसा या ग्रंथाचा उद्यम**
**परी फळला मनोधर्म**
**सदैवांचा**

( वि. सिं. पू. ७-१५४ )

या उल्लेखावरून वृद्धापकाळीं दम्याचा त्रास होत असतांनाच या ग्रंथाचें लेखन चाललें असावें. श्वासनिमेषाचा श्रम या उल्लेखावरून पांगारकर असें अनुमान काढतात कीं 'ग्रंथरचनाकाली कवि चांगले ६० च्या आंतबाहेर असावेत.'

(म. वा. इ. १-३९२)

मुकुंदराज हा जोगाईचें अंबें येथें रहात होता. तो वाजसनेय यजुर्वेद शाखेचा देशस्थ ब्राम्हण होता. तो लहानपणापासून चिंतनशील वृत्तीचा असावा. शैवसप्रदायाचे संस्कार त्याच्यावर तरुणपणीच झाले असावेत. शंकराचार्यांनीं प्रतिपादिलेला अद्वैतवाद 'मराठी'त सांगणें हेंच मुकुंदराजानें आपलें कार्य ठरविलें आणि त्याप्रमाणें त्यानें ग्रंथलेखन केलें. मुकुंदराज शांकरमतानुयायी होता. नाथपंथ शंकरासच आद्य गुरु मानतात. भावे म्हणतात : 'तो शिवभक्त असून नाथसंप्रदायी असावा.' आपण श्रीशंकराचार्यांचा 'अनुवाद' करीत आहोंत असें मुकुंदराज म्हणतो :

**श्रीशंकरोक्तीवरी**
**मी बोलिलों मऱ्हाठी वैखरी**

(वि. सिं. पू. ७-१४७)

'या संप्रदायाचा अभिमानी, स्वयें आपण शूलपाणी' असें मुकुंदराजानें आपल्या पंथाबद्दल स्पष्टच विधान केलें आहे.

आपल्या गुरूनें (हरिनाथानें) शंकराची उपासना केली असेंहि मुकुंदराजानें म्हटलें आहे :

**बारा वर्षें पाशुपत**
**आचरला महाव्रत**
**तेणें पार्वतीसहित**
**शंभु प्रसन्न केला** (वि. सिं. उ. ११.४७)

**तयाचे परी अति गहन**
**हरीनें आदरिलें अनुष्ठान**
**तेणें तपें त्रिभुवन**
**पोळतें झालें** ( वि. सिं. उ. ११-४९ )

यावरून मुकुंदराज हा मराठींतला आदिकवि, शांकरमतानुयायी आहे. शंकराचार्यांचा अद्वैतवाद 'मराठी वैखरीं' त सांगणें एवढाच त्याचा ग्रंथलेखनाचा हेतु होता.

महाराष्ट्रांत पुढें जो भक्तिसंप्रदाय प्रस्थापित झाला त्यांत आणि महाराष्ट्र संतांची जी परंपरा सुरू झाली त्यांत मुकुंदराजास स्थान नाहीं, असें वा. ब. पटवर्धन म्हणतात. ( उ. फा. ले. २ )

भक्तिसंप्रदायापूर्वी महाराष्ट्रात कोणत्या विचारांचें मराठी वाङ्मय प्रचलित होतें, हे मुकुंदराजाच्या ग्रंथावरून कळतें.

### ग्रंथरचना

मुकुंदराजाचे ग्रंथ म्हणून इतिहासकार निरनिराळे ग्रंथ सांगतात.

भावे म्हणतात : '**विवेकसिंधू** खेरीज **परमामृत**, **पवनविजय**, **मूलस्तंभ**, **पंचीकरण**, वगैरे ग्रथ मुकुंदराजाचे म्हणून प्रसिद्ध आहेत.'

परंतु '**मूलस्तंभ**' हा निव्वळ दुसऱ्या कोणाचा असावा असें उघड दिसतें. '**परमामृत**' मुकुंदराजाचा नसावा असा काहीं विद्वानांचा तर्क भावे यानीं नमूद केला आहे. ( म. सा. १—३७ )

परंतु पांगारकरांच्या मतें '**विवेकसिंधु**' व '**परमामृत**' हे दोनच ग्रंथ मुकुदराजाचे असावेत. '**पवनविजय**', '**पंचीकरण**', '**मूलस्तंभ**', इ० ग्रंथ व कांहीं अभंग मुकुंदराजाच्या नांवावर मोडतात. पण तो मुकुंदराज, आदिकवि मुकुंदराज नव्हे. मुकुंद, मुकुंदस्वामी, मुकुंदकवि, मुकुंददीन, वगैरे पांचसहा मुकुंद मागाहून झाले.

**( म. वा. इ. १-३९५ )**

बा. ब. पटवर्धन, ' परमामृत ' ' विवेकसिंधु ' व 'मूलस्तंभ' या तीन ग्रंथांचीं नांवें देऊन तिसरा आपण प्रत्यक्ष पाहिला नसून त्याविषयीं ऐकलें आहे असा खुलासा करतात.

भिडे यांनीं ' विवेकसिंधु ' व ' परमामृत ' हे दोनच ग्रंथ नमूद केले आहेत. ( म. भा. वा. इ. ७९ )

## विवेकसिंधु

या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धांत ७७७ ओंव्या आहेत व उत्तरार्धांत ८९४ ओंव्या आहेत. असा हा १६७१ ओंव्यांचा ग्रंथ आहे. याच्या मराठी व संस्कृत अशा दोन्ही प्रति उपलब्ध आहेत. परंतु संस्कृत रचना मुकुंदराजाची नसावी; कारण एका संस्कृत पोथींत ' गोपाल मुद्गल ' असें ग्रंथकाराचें नांव आहे. पुन्हां मराठी प्रतींतलीं ' बल्लाळ ' ' जैत्रपाळ ', इत्यादि नांवें संस्कृत प्रतींत नाहींत. यावरून मूळ मराठीचें हें रूपांतर ' गोपाळ ' यानें केलें असें आतां स्पष्ट होतें.

[ म. सा. १–३६ ]

देहधारी आत्मा आणि विश्वात्मा यांचें अद्वैत हा विषय आहे. जीवावर मायेचें जें पटल आहे त्यामुळें जें दृश्य जग दिसतें तें वस्तुतः असत्य आहे, हा ग्रंथांतील मुख्य विचार आहे.

तत्त्वमसि हें शब्दद्वारां पटविण्याचा प्रयत्न केला तरी गुरुमुखाशिवाय हें ज्ञान प्राप्त होणार नाहीं असें निक्षून सांगितलें आहे.

मुकुंदराजानें स्वतः गुरूकडून ब्रम्हानंदसाम्राज्य मिळविलें होतें. त्या साम्राज्याचें रहस्य इतरांसाठीं ग्रंथरूपानें सांगितलें आहे.

ग्रंथांत योगमार्गाचें जें वर्णन केलें आहे त्यावरून मुकुंदराजानें स्वतः योगाभ्यास केला होता आणि योगमार्गानेंच अद्वैताचें ज्ञान मिळविण्याची योग्यता संपादन केली असें स्पष्ट दिसतें.

अद्वैतवादाचीं गहन अनुमानें पटवितांना दिलेल्या उपमा व दृष्टांत अतिशय समर्पक आणि उद्बोधक आहेत. उदा०

तूर्या अवस्था म्हणजे सर्वसाक्षित्व येणें. परंतु सर्वसाक्षित्वाच्या पुढची अवस्था उन्मनी. सर्वसाक्षित्वांतहि निराळें अस्तित्व उरतेंच. तेंहि नाहींसें होणें, वृत्त्यतीत होणें ही उन्मनी अवस्था. ती कशी आहे :—

निंबोळियांस मधुरता
जैशी पक्कदशा

वि. सिं. पू. ६-८७

जैसी साखर उदकीं विरे
परी तेथीची मधुरता उरे

वि. पू. ६-८९

तत्त्वतां 'तूं' निराकार असतां आकाराचा अर्थ काय? देह आणि आत्मा यांचें ऐक्य किती बेमालूम होतें?

अहो अंगासी संलग्नें
केशनखें अचेतनपणें
तीं चैतन्यासी वेगळीं कवणें
निवडावीं?

वि. सिं. पू. ७-६३

मुकुंदराजाच्या काव्यशक्तीचा एक नमुनाः—

तव होतासमवेत
हवन करी हरिनाथ
....................
झाली होमाची समाप्ती
मग आदरिली पूर्णाहुती
तेणें प्रकटला स्वयंज्योती
घृतधारेसरिसा

ज्या पूर्णाहुतीची ज्वाळा
गगनचुंबित विशाळा
कनकवर्ण सोज्वळा
मज तैशी गमली
नातरी स्रष्ट्यानें कनकदंड
गगनछत्रा रोविला प्रचंड
तेथें प्रगटे चंद्रचूड
म्हणूनियां
तैसी गगनाच्या देउळीं
ज्वाला शिवलिंग प्रगटली
मग स्नपनविधी आरंभिली
हरीनें घृतधारें

वि. सिं. उ. ११-५३-५७

अद्वैतवादाची इतकी महती सांगूनही ग्रंथाच्या शेवटीं गुरूजवळ, मुक्तीपेक्षा गुरुप्रेमभक्तीच मागितली आहेः

मज ब्रम्हत्वासी नाहीं चाड
तुझें भजन अत्यंत गोड
...................... वि. सिं. उ. १०-३६
ब्रम्हप्राप्तीची पदवी
तिहीं कार्नीचि एकावी
परी सद्गुरुभजनेवीण अनुभवी
नव्हतीच कीं

वि. सिं. उ. १०-४३

मुकुंदराजास स्वतः गूढवादाचे अनुभव ( Mystic experiences ) आले होते, असें रा. द. रानडे म्हणतात.

९ व्या अध्यायांतील योगमार्गाचें, परमेश्वरप्राप्तीच्या आनंदाचें व १२ व्या अध्यायांतील ब्रम्हानंदाचें वर्णन हे स्वानुभवाचे बोल आहेत.

मुकुंदराजानें स्वतः योगमार्गादिकांनीं ब्रम्हज्ञान मिळविलें; परंतु तो मार्ग प्रापंचिकांना अवघड आहे, म्हणून त्यांच्यासाठीं त्यानें 'राजयोग' सांगितला. स्वतः योगाभ्यासी असून उपदेशांत मात्र सुलभ असा मार्गच सांगावा, हाच मार्ग पुढें ज्ञानदेवादिकांनीं चालू ठेविला. मुकुंदराज म्हणतो :

**न लगे वेदशास्त्रांचा पांग**
**अभ्यासावा न लगे अष्टांग**
**जरी पाविजे राजयोग**
**श्रीगुरुप्रसादें**

वि. सिं. उ. १९-१७

'विवेकसिंधू 'नें राजयोगावर भर दिला आहे :

**जनकाचेनि महिमानें**
**श्लाघ्यता पावे**

वि. सिं. पू. ७-१५१

असा हा राजयोगाचा मार्ग आहेः—

**प्रपंचाशीं भिन्नत्व**
**नाहीं परब्रम्हीं**

पूर्वार्ध. ६-१०५

**असतां इंद्रियव्यापार**
**परी तो ब्रम्हरूपें व्यवहार**
**पूर्णबोधासि संसार**
**परमार्थचि**

उ. ९-७८

**कर्मशेषें देहीं वर्तती**
**परी ते कर्मबंध नेणती** ( उ. ९-८४ )

इत्यादि वचनें पाहिल्यास प्रपंचाच्या त्यागापेक्षां प्रपंचावर विजय मिळविण्याच्या मार्गावरच मुख्य रोख दिसून येतो.

प्रपंच आहे त्या स्वरूपांत 'वैरी' च आहे. त्याचें विरोधीपण नाहींसें होण्याचा मार्ग म्हणजे ब्रम्हज्ञान. ब्रम्हज्ञानाच्या प्राप्तीनें प्रपंचाचें भय उरत नाहीं.

अर्थात् प्रपंचाचें परब्रम्हाशीं एकरूपत्व अनुभवण्यासाठीं आधीं राजयोग-मार्गानें जी पूर्व तयारी करावी लागते ती अगदींच सोपी आहे, असें नाहीं. किती झालें तरी राजयोग हाहि योगच आहे. भक्तियोग हाहि योगच आहे.

**देवाचें सगुण-स्वरूप चिंतावें**

..............................

**करावा विषयाचा त्याग**
**धरावा साधूचा संग**
**रागद्वेषाचा प्रसंग**
**घडूंचि न द्यावा** ( वि. सिं. पू. ७-७७ )
**नित्य करावा ऐसा नेम**
**पडों नेदावा संसारभ्रम**
**धरावा स्वरूपाच्या कामें**
**साधनपंथ** ( पर० १४-५ )
**जिकडे मनाची राहटी**
**न लागावें तयाचें पाठीं**
**माघारीं घालोनियां दृष्टी**
**स्वस्वरुपेसी ठेविजे** ( पर० ९-८ )

ही एक तपश्चर्याच आहे. या तपश्चर्येनें

**अहंकार गळे**
**आणि कल्पना मावळे**

......................

कर्मवासना सरली
विवेकीं इच्छा निमाली
पूर्ण दृष्टी जाली
......................
मनाचिया वृत्ति समस्ता
खुंटलिया पै
......................
जेथ सुखदुःखासी वेगळीक
आधीचि ना
..........................
अहंता स्वरूपीं गळे
विषयतृष्णा मावळे
इंद्रियांचे लळे
क्रियेवीण पूर्ण होती ( पर० १२-६ )
नदी उगमीं स्थिरावे
..........................

असें झालें कीं मग :

( नदी ) सिंधूपण कां न पावे
तैसें जीवाचें ब्रम्ह कां न व्हावें
या स्थिती राहतां ? ( पर० ९-१२ )

या राजयोगाच्या प्राप्तीचा अगदीं सुलभ असा मार्ग म्हणजे सगुणोपासना :

चित्तअवलंबनेवीण
जरी न राहे स्थिरपण
तरी सगुण स्वरूप
चिंतावें ( वि. सिं. पू. २-९३ )

**तेथें हृदयाच्या शेजारीं**
**षोडशोपचारें पूजा करी**
**उपासावा श्रीहरी**
**अनन्यभावें** ( वि. सिं. पू. २-९४ )

सगुणाकडून निर्गुणाकडे जावें.

असा हा राजयोग ' विवेकासिंधू'त सांगितला आहे.

**परमामृत**

१४ प्रकरणांचा ३०३ ओव्यांचा हा ग्रंथ आहे. यांत ' विवेकासिंधू'त सांगितलेले विषय संक्षेपानें सांगितले आहेत.

**विवेकसिंधूचा अन्वय सारांश**
**येथें कथियला**

असें ग्रंथकार म्हणतो.

**जप तप अनुष्ठानें**
**आणि नानापरीचीं साधनें**
**मोक्ष न पाविजे आत्मज्ञानें**
**वांचोनियां सर्वथा** ( पर० २-९ )

हें या ग्रंथांत पटविलें आहे. या ग्रंथांतहि शांकरमताचाच पुरस्कार केलेला आहे.

स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह, इत्यादि अत्यंत गहन विषयांचें विवेचन या ग्रंथांत असलें तरी त्यांत कवीची प्रतिभाहि प्रगट झाली आहे. अवघड प्रमेयें उपमा-दृष्टांतांनीं विशद करण्याचें कौशल्य पहाः

आत्मा स्वयंप्रकाश असून जीव अज्ञानांत कां गुरफटावा ?

**उजेडीचा घरांत आला**
**तंव दृष्टीं अंधार भरला**
**डोळे असतां अदेखणा जाला**
**आपणासि तो**

( पर. १०–३ )

ब्रम्हानंदाच्या अनुभवाच्या स्थितीचें हें वर्णन पहा :

आनंद आनंदासी घोटी
बोलतां परेसी पडे मिठी
मुक्यानें सुखाच्या गोठी ।
केविं कीजे

परमामृत १२-१२

खुंटलें मनाचें जाणणें
तें सुख अनुवादावें कवणें
हें अनुभवी तोचि जाणे
इतरां टकमक

परमामृत १२-१३

या ज्ञानाचें महत्त्व सांगतांना मुकुंदराज म्हणतो :

हें ब्रम्हगौप्य गुप्त ठेवणें
अनुभव कोणां न सांगणें
देवतांचें गुप्त राहणें
स्वस्वभावें करोनियां
हें ब्रम्हगौप्य मूढाशीं
सांगू नको अलभ्य त्याशीं
गुज टाकोनी चाहाटळपणाशीं
वृथा मूर्ख उठवूं नको

परमामृत १४-१८

परंतु आपल्याला प्राप्त झालेल्या ज्ञानामृताबद्दल, 'परमामृता'बद्दल इतका 'लोभ' मुकुंदराजानेंहि बाळगला नाहीं !

**जयासी नाहीं प्रचीति**
**नेणती तर्क मुद्रेची स्थिति**
**तयालागीं मराठीचिया उक्ती**
**केली ग्रंथरचना**
**उपार्जनेचा श्रम नेणे बाळ**
**तयाचें मुखीं मिष्टान्न कवळ**
**सुयें जेवीं जननी कृपाळ**
**अपत्यविषयीं**

वि. सिं. उ. ११
१३२-३३

हे त्याचे उद्गार मूढांच्या उद्धाराविषयींची तळमळच दाखवितात.

'विवेकसिंधू' च्या शेवटीं ब्रम्हपदापेक्षांहि भजनाची गोडी मोठी आहे म्हणून मुक्तीवरील प्रेमभक्ति मागितली आहे.

'परमामृता' च्या शेवटीहि, स्वानंदांत निमग्न झाल्यावरहि 'मुक्त'

**लोकांमाजीं दावीत**
**भक्तिरहस्य**

असा वावरत असतो आणि

**भक्तिज्ञान वैराग्य पाहीं**
**करुनि दाविती आपुले देहीं**
**जगासी लाविती सोई**
**तारक ते**

परमामृत १२

निर्गुणाच्या आकलनाचें एक साधन म्हणून सगुणोपासनेचा स्वीकार करावा. प्रपंचाचें भयंकर मोहकारी स्वरूप पाहून त्यावर विजय मिळवून शेवटीं प्रपंच आपलासा करावा. मुक्त झाल्यावरहि 'जगासी सोई लाव-

ण्यासाठी ' जगांतच, जनांतच रहावें, इत्यादि गोष्टी या आदिकवीच्या आणि मराठीच्या आद्यग्रंथांतच आहेत. पुढें ज्ञानेश्वरादिकांनीं दाखविलेल्या भक्तिमार्गाचीं बीजें मराठी वाङ्मयाच्या आरंभस्थानीच आढळतात.

मुकुंदराजानें आपल्या ग्रंथांत शुद्ध तात्त्विक विवेचनाबरोबर त्या तत्त्वज्ञानानें जीवनाचें सार्थक करण्याच्या भागावरहि पुष्कळ भर दिलेला आहे. तत्त्वज्ञानाचें आविष्करण करणारें मराठी वाङ्मय ( Expositional School ) मुकुंदराजापासून सुरू झालें. जीवन-मरणाची रहस्यें सर्वांना आकलन व्हावीत, या हेतूनें ग्रंथरचना करण्याचा हा उपक्रम या आदिकवीनें केला.

त्याच्या ग्रंथांत धर्म आणि तत्त्वज्ञान यांचें संकलन झालेलें दिसतें. तत्त्वज्ञान सांगता सांगतां तें आकलन होण्यासाठी धर्म—आचारधर्मंहि त्याच्या ग्रंथात दिसून येतो. आपला ग्रंथ आपल्यापेक्षां खालच्या पायरीवर असलेल्या साधकावस्थेंतील मुमुक्षूंसाठीं आपण लिहित आहोंत, ही भूमिका या ग्रंथांत दिसते. अर्थात् स्वानुभव वर्णन करतां करता काही वेळा पुनःप्रत्ययाचा आनंद कवि स्वतःच अनुभवूं लागतो आणि त्या वेळीं वाचकांचा व श्रोत्यांचा त्यास क्षणभर विसर पडून आपण आपल्याच ठिकाणीं तल्लीन व्हावें, तसें कांहीं ठिकाणी होतें.

आत्मज्ञानाचा ' प्राकृत ' मार्ग, ' प्राकृत ' जनासाठी ' प्राकृत ' भाषेंत सांगणें ही मराठी वाङ्मयाची परंपरा मराठीतील आद्यग्रंथकार मुकुंदराज याच्यापासूनच सुरू झाली.

# २ नाथपंथ आणि नाथांचें वाङ्मय

## १ नाथपंथ

मुकुंदराजानें दिलेल्या गुरुपरंपरेवरून व त्यांच्या हकीकतीवरून तो शिवभक्त असावा हें तर स्पष्टच दिसतें. परंतु तो नाथसंप्रदायीहि असावा असें भावे म्हणतात ( म. सा. १—३७ ). पांगारकरांनी नाथपरंपरेंत मुकुंदराजांची व नंतर ज्ञानेश्वराची गुरुपरंपरा दिली आहे. ( म. वा. इति. १-४८१ ) परंतु यांतहि दोन परंपरा दिसतात. मुकुंदराजांची परंपरा आदिनाथ, हरनाथ, रघुनाथ, मुकुंदराज अशी आहे. त्यानंतर झालेल्या ज्ञानेश्वराच्या परंपरेचा आरंभसुद्धां आदिनाथापासूनच होतो. म्हणजे आदिनाथापासून सुरू होणारी परंपरा मुकुंदराजापाशीं संपली आणि दुसरी परंपरा आदिनाथ–मच्छेंद्र–गोरक्ष–गैनी–निवृत्ति–ज्ञानेश्वर अशी सुरू झाली.

नाथपरंपरेची तिसरी शाखा ज्ञानेश्वरापासूनच सुरू झाली. ज्ञाननाथ–सत्यामळनाथ–गैनीनाथ–गुप्तनाथ--उद्बोधनाथ·–केसरीनाथ-–·शिवदिनकेसरी अशी ती तिसरी परंपरा दिसते.

ज्ञानेश्वराच्या परंपरेंतच दोन शाखा दिसतात : ज्ञानेश्वर–विसोबा खेचर–नामदेव व चोखामेळा, ही एक शाखा आणि सत्यामळनाथ ते शिवदिनकेसरी, ही दुसरी शाखा.

मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, शिवदिनकेसरी, या सर्वांचाच समावेश सर्वस्वी नाथपरंपरेंत करणें बरोबर नाहीं, असें त्यांचें वाङ्मय वाचल्यास दिसून येत.

मुकुंदराज हा शिवभक्त होता; परंतु शैवसंप्रदायाची नाथपंथ ही एक शाखा आहे. शैवांचे ७ भेद आहेत व त्यांतल्या जोगी-विभागात नाथपंथाचा समावेश होतो ( ज्ञा. त. ४५६ ). पण शैवसंप्रदायाशीं नाथपंथाचें मुळींच साम्य नाहीं हें सरदार मिरीकर यांनीं विस्तारपूर्वक दाखविलें आहे ( ज्ञा. द. १·४८ ). म्हणून मुकुंदराज शैवसंप्रदायी आहे एवढ्यावरून तो नाथसंप्रदायी असें म्हणतां येत नाहीं.

ज्ञानेश्वरांना उपदेश देणारे निवृत्तिनाथ हे गैनीनाथाचे शिष्य होते. यावरून ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा नाथपंथी आहे. परंतु स्वतः ज्ञानेश्वरांनीं नाथपंथाचा पुरस्कार केला नाहीं. ज्ञानेश्वरांनीं भागवत संप्रदायाचा पुरस्कार केला. भागवत धर्म वा भागवत संप्रदाय हा ज्ञानेश्वरांच्या पूर्वीच महाराष्ट्रांत प्रचलित होता. त्याला ज्ञानेश्वरासारखा प्रवर्तक लाभल्यामुळें त्याचा प्रभाव कित्येक शतकें टिकून राहिला.

स्वतः नाथपंथी असलेल्या ज्ञानेश्वरांनीं भागवत धर्माचा पंथ महाराष्ट्रांत निर्माण केला. त्यामुळें महाराष्ट्रांत नाथपंथाच्या जागीं भागवत धर्मपंथ किंवा वारकरी पंथ प्रचलित झाला.

नाथपंथांत हा फेरफार कां केला आणि तो कसा उपकारक झाला हें कळण्यासाठी नाथपंथाचें स्वरूप पाहिलें पाहिजे.

आदिनाथानें ( शंकरानें ) मच्छेंद्रनाथास बोध केला आणि मच्छेंद्रनाथांनीं नाथपंथाची स्थापना केली.

नाथपंथाची संस्थापना करणारे मच्छेंद्रनाथ यांचा काल सुमारें शके १०७३ व हाच नाथपंथाच्या स्थापनेचा काल असावा असें मानणें योग्य आहे ( ज्ञा. द. १-५४ ).

ज्ञानेश्वरापूर्वीं नाथपंथ महाराष्ट्रांत १०० वर्षें प्रचलित होता. परंतु त्या पंथाचें वैशिष्ट्य दाखविणारें तत्त्वज्ञान कळण्यास कांहीं साधनें, त्यांचे ग्रंथ उपलब्ध नाहींत. ‘ **नवनाथभक्तिसार** ’ व ‘ **नाथ-लीलामृत** ’ हे दोन ग्रंथ आहेत. त्यांत ‘ **नवनाथभक्तिसार** ’ हा ग्रंथ बराच पूज्य मानण्यांत येतो. तो ग्रंथः—

**शके सत्राशे एकेचाळीस**
**प्रमाथीनाम जेष्ठमास**
**शुक्लपक्ष प्रतिपदेस**
**ग्रंथ समाप्त जहाला** [ ज्ञा. द. १-४० ]

म्हणजे ज्ञानेश्वरानंतर पांचशें वर्षांनीं तयार झालेला आहे. तो ‘**गोरक्षकिमयागार** ’ या ग्रंथाच्या आधारें धुंडीसुत मालू नरहरी यानें लिहिला.

'**नवनाथभक्तिसारांत**' ज्ञानेश्वरापूर्वी झालेल्या पंधरा सोळा नाथांची हकीगत दिलेली आहे. 'ऐतिहासिक दृष्टीनें या ग्रंथाचा फारसा उपयोग होणें शक्य नाहीं. किंबहुना ऐतिहासिक चिकित्सेपुढें त्याचा टिकाव लागणें कठीण. ज्ञानेश्वरपूर्वकालीन नाथपंथाची यथार्थ कल्पना त्यावरून येणार नाहीं.'

[ ज्ञा. द. १-४० ]

सरदार ना. य. मिरीकर यांचा हा अभिप्राय लक्ष्यांत घेतला म्हणजे नाथपंथाची—मूळ नाथपंथाची—माहिती कळण्याचा उपलब्ध असा एकच मार्ग म्हणजे ज्ञानेश्वरादिकांनी आपल्या ग्रंथांत दिलेली माहिती. ती माहिती नाथपंथाच्या पुरस्कारासाठीं दिलेली नाही. ती ओघाओघानें आलेली आहे.

ज्ञानेश्वरादिकांच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून वरील लेखात नाथपंथाविषयीं खालील अनुमानें आढळतात :

'नाथपंथांत पीतवस्त्र, भगवी कफनी, भस्म, मृगचर्म इतक्याच गोष्टी वापरण्यांत येत होत्या. परंतु त्याहि पंथविशेष म्हणून गणलेल्या दिसत नाहींत. जुन्या नाथपंथाचा केवळ योगावरच भर नसे. योगाभ्यासाला त्यात महत्त्व आहे हें मात्र खरें. योगास ते अभ्यासयोग म्हणतात व अभ्यासापुरताच योगाचा उपयोग त्यांनी केलेला आहे. गुरुभक्ति हा तर नाथपंथाचा मुख्य बाणा.'

( ज्ञा. द. १—४५, ४७, ४८ )

'नाथपंथांत दोन मार्ग होते. ते ज्ञानयोग व कर्मयोग यांच्या तत्त्वावर आंखण्यांत आले होते. ज्ञानयोगी याचा भर वैराग्यावर होता व कर्मयोगी विवेकावर भर देणारे होते. ज्ञानयोगीयांस पुढें योगी हें नांव मिळालें व अवधूत. सिद्ध, गोसावी, हीं विशेषणें त्यांस मिळून त्या मार्गासहि अवधूतपंथ हें नांव प्राप्त झालें. कर्मयोगी भक्तिमार्गी असून त्यांस स्वामी, वगैरे नांवें असत.'

'अवधूत पंथ हा नाथपंथाचीच एक शाखा आहे. त्या पंथांत गोरखनाथास आद्यगुरुत्वाचा मान आहे व त्यांनींच हा पंथ काढला असा

समज आहे. या पंथास शैवसंप्रदाय मानणें यथार्थ नाहीं. शैव व वैष्णव हे भेद हा पंथ मानीत नाहीं. दत्तात्रय हें (शिवविष्णुऐक्य दाखविणारें) त्यांचें उपास्य दैवत आहे. ज्ञानमार्गी अवधूत पंथ भक्तीस उचलून धरणारा होता. ज्ञानेश्वराचे वडील विठ्ठलपंत यांना संन्यासदीक्षा देणारे रामानंद हे गोरक्षनाथांचे समकालीन होते. त्यांनी गोरक्षनाथांच्या अवधूतपंथास सगुणभक्तीची जोड मिळवून दिली व तो केवळ भक्तिमार्गी केला, असें म्हणणेंहि यथार्थ होणार नाही. कारण ज्ञानभक्तीची सांगड नाथपंथानेंच घालून दिली आहे. ( मच्छेंद्रनाथांचा ) नाथपंथ वर्णाश्रमधर्म पाळणारा होता तरी त्यांनी जातीस महत्त्व दिलें नाहीं. भगवद्भक्तीचा मार्ग सर्वांस खुला ठेवला. व त्यांचा संन्यासहि कृतिप्रधान नसून वृत्तिप्रधान होता. [ज्ञा. द. १-५२]

स्वधर्माचरण, कर्तव्यनिष्ठा, पूर्णत्व प्राप्त झालें तरी लोकसेवा करीत जगाचेंहि कल्याण साधणें, जगास प्राधान्य देऊन त्यात एकतत्त्व भरलें आहे हा सिद्धांत, हरिस्वरूपाचें प्रतीक अशी सगुणोपासना, साधनसुलभतेसाठीं अवतारकल्पनेचा स्वीकार, गुरूचा शोध करावा न लागतां आत्मोन्नतीच्या विशिष्ट अवस्थेंत त्याची आपोआप भेट होणें. नाम या साधनाचा पुरस्कार, हरिहराचें ऐक्य दाखविणाऱ्या विठ्ठलाची उपासना आणि त्या ऐक्याचें धर्मक्षेत्र अशी पंढरी; या सर्व गोष्टी नाथपंथांत आधीच होत्या असें मिरीकरांनी म्हटलें आहे. भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग व योगमार्ग हे तिन्ही मार्ग नाथपंथांत मुळांतच होते.

‘ ज्ञानेश्वरांनीं नवीन असें कांही सांगितलें नाहीं. हरिहरैक्य मानणारा तो भागवत संप्रदाय होता. नामस्मरणाचा मार्ग पुरातन होता. मच्छेंद्रनाथांनी त्याचें पुनरुज्जीवन केलें. व त्यास हरिहरैक्याची जोड घालून नाथसंप्रदायानें हरिहरैक्य, नामस्मरण, सर्वांभूतीं भगवद्भाव, हरिभक्ति, सगुणभक्ति, गुरुभक्ति, इत्यादि सर्व गोष्टी पंढरीशीं जोडून पंढरीसंप्रदाय जाहीर केला. या सर्व गोष्टी ज्ञानेश्वरांच्या पूर्वींहि होत्या. ज्ञानेश्वरांनीं त्यांचाच जयजयकार केला.’

(ज्ञा. द. १-९०)

सरदार मिरीकरांनीं या विवेचनांत ज्ञानेश्वरी हा नाथपंथाचा मुख्य ग्रंथ मानून सर्व अनुमानें काढिलीं आहेत. त्यास निळोबाचे उद्गार आधार म्हणून दिले आहेतः

**नाथसंप्रदायाची थोरी**
**प्रकट केली ज्ञानेश्वरी**

ज्ञानदेवांचाहि एक अभंग आहे. त्यांत

**' आम्ही एक दीन जाणा नाथपंथी '**

असा एक चरण आहे.

या आधारावरून ज्ञानेश्वरादिकांनीं जुन्याच पंथाचें, नाथपंथाचें पुनरुज्जीवन केलें असा सरदार मिरीकरांचा आशय दिसतो. नामभक्ति, विठ्ठलोपासना, पंढरीमाहात्म्य, या सर्व गोष्टी नाथपंथांतच होत्या, असें त्यांचें म्हणणें आहे.

परंतु ज्ञानेश्वरापूर्वी शंभर वर्षे प्रचलित असलेल्या श. १०७३ मध्यें मच्छेंद्रनाथाचें मूळ तत्त्वज्ञान मूळ स्वरूपांत सांगणारा ग्रंथ उपलब्ध नाहीं, तोंपर्यंत मुकुदराज किंवा ज्ञानेश्वर यांनी नाथपंथाचें तत्त्वज्ञानच पुरस्कृत केलें असें निश्चित म्हणतां येत नाहीं. भागवत धर्म व त्याबरोबरच स्वतः अनुभवलेला योगमार्ग या दोन्ही पंथांचें विवेचन ज्ञानेश्वरींत आढळतें हें मात्र खरें.

पांगारकर नाथपंथाचा शिवसंप्रदायांतच समावेश करतात. योगविद्या, वैराग्य व अद्वयानंद हीं नाथपरंपरेचीं प्रधान लक्षणें आणि मेखला, शृंगी, पुंगी, कंथा, कर्णमुद्रा, कौपीन, व्याघ्रांबर, खडावा व झोळी हीं या पंथाचीं बाह्य साधनें होत. महाराष्ट्रांत वारकरी पंथानें या बाह्य लक्षणांचा तर त्यागच केला (म. वा. इ. १-४८७); परतु योगविद्येचाहि आग्रह धरला नाहीं. वैराग्याची संसाराशीं सांगड घातली आणि अद्वयानंदाचा निराळा मार्ग दाखविला.

कानफाटे नांवाचा नाथपंथ म्हणून पांगारकरांनीं उल्लेख केलेला आहे (म. वा. इ. १-४८४): कानफाटे पंथ स्थापन करणारा धर्मनाथ चौदाव्या शतकांत ज्ञानेश्वरानंतर शंभर वर्षांनंतर होऊन गेला. तेव्हां तो

गोरखनाथाचा शिष्य असणें शक्य नाहीं. परंतु त्याचा हटयोगावर भर होता व त्यानें गोरखनाथास गुरुस्थानीं मानलें. मुसलमानांनीं नाथपंथी स्थानें भ्रष्ट केल्यावर नाथपंथानें पीराचीहि उपासना स्वीकारून आपला बचाव केला. धर्मनाथाच्या पंथांत योगी व पीर असे दोन भेद आहेत. यावरून धर्मनाथाचा हा पंथ मुसलमानांच्या धर्मच्छळाच्या काळांत सुरू झाला असावा.

**कान फाडुनिया मुद्रा ते घालिती**
**नाथ म्हणविती जगामाजी**

या तुकारामाच्या वचनांत कानफाट्यांची निंदा केली आहे. ती नाथपंथाची निंदा नव्हे. धर्मनाथानें गोरखनाथास गुरु मानून [illegible]या नाथ-पंथावर आक्रमण केलें व त्यामुळें नाथपंथी म्हणजे कानफा[illegible] अ[illegible] आज समजूत झाली आहे.

नाथपंथी लोक कानास भोकें पाडतात व म्हणून यांस कानफाटे म्हणतात हें पांगारकर यांचें विधान ऐतिहासिक दृष्ट्या बरोबर नाहीं. महाराष्ट्रांत नाथांची जी परंपरा झाली ती कानफाट्यांची नव्हे. योग-मार्गानें अद्वयानंद अनुभवणारांची होय.

( ज्ञा. द. १-४३ ते ४७ )

नाथपंथांत सगुणोपासनेला प्राधान्य नाहीं. योग हेंच त्यांचें अद्वैतानु-भवाचें प्रधान साधन आहे. त्यामुळें कृष्णभक्ति, पंढरीमहात्म्य, नाम-स्मरणाचें महत्त्व हे विषय निवृत्तिपूर्व नाथांच्या ग्रंथांत आढळत नाहींत. तथापि ईश्वराच्या सगुणस्वरूपाची भक्ति हें प्रधान साधन मानलें नसलें तरी नाथपंथांत शिवोपासना आहे आणि गुरुभक्तीलाहि फार महत्त्व आहे. सगुणोपासनेला नाथपंथाचा विरोध नाहीं. योग आणि अद्वैततत्त्वज्ञान गुरुपरंपरेनें व कृष्णोपासना प्राधान्यानें कुलपरंपरेनें निवृत्ति-ज्ञानदेवांना प्राप्त झालेली दिसते. म्हणून या अद्वैत, योग आणि भक्ति यांचे पडसाद त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र ऐकू येतात.

( ज्ञा. तत्त्वज्ञान ४१७ )

भावे यांच्या मतें, नाथपंथ महाराष्ट्रांत उत्तरेकडून आलेला आहे. शैवसंप्रदायी लोकांपैकीं योगाभ्यास करणारांचा हा पंथ होय. त्यांनीं उपदेशिलेली योगाभ्यासाची परंपरा प्रत्यक्ष आचरणानें व ग्रंथद्वारें महाराष्ट्रांत आजतागायत चालू आहे. महाराष्ट्रांत योगाभ्यासाचा प्रसार नाथपंथामुळें झाला. या पंथातील लोकांनीं आपल्या विद्येचें 'गुह्य' फक्त अधिकारी व्यक्तींनाच सांगितलें.

नाथपंथाच्या प्रसारामुळेंच मराठी भार्षेत योगासंबंधाचे ग्रंथ निर्माण झाले. पण मराठी भार्षेत ते ग्रंथ असले तरी ते साधारण लोकांसाठी लिहिलेले नाहींत. " पंथांतल्या आंतील कड्यामधल्या लोकांना मराठी भाषा सं[illegible]ापेक्षां समजण्यास सोपी पडे, म्हणूनच ही रचना त्यांनीं मराठींत [illegible] "

म. सा १-४१

मच्छिंद्र व गोरक्ष हे मूळचे कोठचे याविषयीं निश्चित सांगतां येत नाही. तरी ' ते मूळचे उत्तरेकडचे असून यात्रेच्या निमित्तानें दक्षिणेंत आले असावे याविषयीं मतैक्य आहे ' असें डॉ. पेंडसे म्हणतात. त्यांच्या समाधी अनेक ठिकाणीं दाखविल्या जातात. महाराष्ट्रांत सातारा जिल्ह्यांत मत्स्येंद्रगड या नांवाचा डोंगर नाथाच्या स्मरणार्थ दाखविला जातो. नगर जिल्ह्यात नेवाशाजवळ एका डोंगरांत गोरक्षाची समाधि दाखवितात. नाशिक जिल्ह्यांत त्र्यंबकेश्वरीं गहिनीनाथांचा मठ प्रसिद्ध आहे.

काठेवाडांत गोरखमटी आहे. हरिद्वार व गोरखपूर येथें त्यांचे मठ आहेत. गिरनार पर्वताचें सर्वांत उच्च शिखर गोरखनाथ या नांवानें प्रसिद्ध आहे.

' मत्स्येंद्रनाथ व गोरक्षनाथ हे नेपाळांतल्या गुरखे लोकांचे देव आहेत. गोरक्षनाथ ही शूर गुरख्यांची मुख्य देवता आहे. त्यांना गुरखे ही संज्ञा गोरक्षनाथापासूनच मिळाली आहे. नेपाळांतील बौद्धांच्या महायानपंथास गोरक्षनाथांनीं खो दिला. '

म. वा. इ. १-४८३-४

## २ नाथांचें वाङ्मय

गोरक्षनाथाचे शिष्य गहिनीनाथ यांनीं लिहून ठेविलेला गोरक्ष-नाथांचा उपदेश '**गोरक्षगीता**' या नांवानें प्रसिद्ध आहे. गहिनीनाथ हे ज्ञानेश्वरांचे गुरु होत. **गोरक्षगीता** भावे गैनीनाथाची म्हणतात. ( म. सा. १-४० ) तर पांगारकराच्या मतें तो ग्रंथ गोरक्षनाथाचाच आहे.

( म. वा. इ. १-४९० )

गोरक्षाच्या नावावर मोडणारे ६०।७० ग्रंथ असले तरी मराठींत त्यांच्या नांवावर मोडणारे असे ग्रंथ **अमरनाथसंवाद व गोरक्षगीता** हे दोनच दिसतात.

महाराष्ट्रांत ज्ञानेश्वरांच्या पूर्वी कित्येक वर्षे प्रचलित असलल्या या पंथाचें फारसें वाङ्मय उपलब्ध नाही आणि आहे तेंहि मूळ स्वरूपांत नाहीं. परंतु विचारपरंपरा या दृष्टीनें मुकुंदराज, ज्ञानेश्वर, याच्या ग्रंथाचा यांच्याशीं बराच जिव्हाळ्याचा संबंध आहे. विशेषतः योगमार्गाचें विवेचन व अनुभव हीं मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांना नाथपंथात लाभलीं. त्यांच्या ग्रंथांवर त्यांचा दृढ संस्कार दिसतो.

**नाथपंथीयांच्या** वाङ्मयाची त्यांच्या ग्रंथावरून ओळख होते. उदाहरणार्थ **अमरनाथसंवाद** या गद्य ग्रंथांत प्रपंचाचें स्वरूप स्पष्ट करीत असतां किती समर्पक दृष्टांत दिले आहेत पहा :

**मग निगालीये नदी उदके अनित्यें ।**
**परि प्रवाही नित्य जाणावी किं ।**
**तैसा दृश्यु प्रपंचु पदार्थ अनित्यु ।**
**परि त्या प्रवाहो नित्यु जाणावा ।**

..................................

..................................

आत्मज्ञानी संसारांत कसा वागतो :

**जैसें पद्मिणीचें पत्र उद्कां।**
**भितरि आसौनि आलिपत ( अलिप्त )।**

( अमरनाथसंवाद )

गोरक्षनाथ व ज्ञानेश्वर हे एकाच परंपरेंतले असून या दोहोंतलें पाणी मूळ एकाच झऱ्याचें असें मनांत येतें. ज्ञानेश्वरींतील खालील उतारा पाहिला कीं असें मनांत येणें साहजिक आहे :

**जैसें वाहतें पाणी जाय वेगें**
**तैसेंचि आणिक मिळे मागें**
**येथ असंतचि असिजे जगें**
**मानिजे संत**

[ ज्ञा. १५-१३२ ]

गोरक्षगीता ' या ओवीबद्ध ग्रंथाचेंहि ज्ञानेश्वरीशी असेंच साम्य आढळतें :

**तेणें कामशक्ति खुंटली**
**मग वायूतें ऊर्ध्वगति जाली**
**आला मणिपुराजवळीं**
**देखिली बाळी कुंडली**
**प्राणायाम करितां नेटें**
**तें कुंडलिनी चिमुटे**
**वेळे उकलुनी सुसाटे**
**गगनमार्गें**

[ गोरक्षगीता ]

जो मूळबंधें अडला
अपानु माघौता मुरडला
तो सवेंचि वरी सांकडला
फांकु धरी
क्षोभलेपणें माजे
उवाइला ठाईं गाजे
मणि फुलेसी जूंझे
राहोनिया

ज्ञाने. ६-२१४, २१५

गोरखनाथ किंवा गैनीनाथ यांनीं लिहिलेले ग्रंथ मूळ स्वरूपांत उपलब्ध नाहींत. परंतु त्यांच्या उपदेशांत निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, यांच्या मताचा उगम सांपडतो.

गोरक्षनाथांचा भर योगावर होता आणि गैनीनाथांनीं कृष्णभक्तीचा पुरस्कार केला. योगमार्गापेक्षां सुकर म्हणून कृष्णभक्तीचा, सगुणोपासनेचा मार्गच पुढें प्रसृत झाला.

अष्टांग साधनें साधिती पवन
ज्यासी योगीजन शिणताती
तो हा कृष्ण...........
निवृत्तीचें ध्येय कृष्ण हाचि होय
गहिनीनाथें सोय दाखविली !

## ३ हेमाद्रि पंडित व बोपदेव

बाराव्या शतकांत मुकुंदराजाच्या नंतर झालेले दोन मोठे ग्रंथकार यादवांच्याच राज्यांतले कर्तबगार गृहस्थ होते ही गोष्ट उल्लेखनीय आहे.

महाराष्ट्रांतील हेमाडपंती देवालयें आणि मोडी लिपी या रूपानें आजतागायत प्रसिद्ध राहिलेला हेमाद्रि पंडित हा चौरस बुद्धीचा ग्रंथकार होता.

हेमाद्रि पंडित हा महादेवराव व रामदेवराव यांच्या कारकीर्दीत 'श्रीकरणाधिप' होता. त्याच्या नांवावर **लेखनकल्पतरु** हा एक ग्रंथ आहे. याशिवाय नीतिबोध नांवाचा लहानसा लेख, अनेक मेस्तकें म्हणजे जमाखर्चाच्या वगैरे पद्धतीविषयीचे ग्रंथ हेमाद्रीच्या नावावर रूढ आहेत. तरी 'हे ग्रंथ हेमाद्रीनें रचले नाहीत' असें भावे यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. हेमाडपंताचा अस्सल ग्रंथ आज आपणास उपलब्ध नाही ( म. सा. १-४९-५० ). ग्रंथकर्तृत्व संशयास्पद असलें तरी बाराव्या शतकांतील वाङ्मय म्हणून या उपलब्ध वाङ्मयाचें महत्त्व आहेच.

**लेखनकल्पतरु** हा पत्रलेखनपद्धतीविषयीचा ग्रंथ आहे. श्लोक व गद्य-टीका असें त्याचें स्वरूप आहे. शुद्ध, सात्त्विक आणि रहस्यमयी अशा तीन पद्धती पत्रलेखनाच्या सांगितल्या आहेत आणि ज्यास पत्र लिहावयाचें असेल त्याचे पत्रलेखकाशीं संबंध असतील त्याप्रमाणें मायने दिले आहेत. उदा० स्वस्त्रीस आशीर्वाद लिहावा आणि नाटकशाळेस 'आज्ञा करितो की, हें प्रारंभीं लिही स्वरक्षेला' असें सांगितलें आहे.

कांहीं पत्रें लिहून दाखविली आहेत. त्यांत रचनाकौशल्य असें कीं, तीं गद्य आहेत आणि वृत्तांतहि वाचतां येतात.

आध्यात्मिक विचाराबरोबरच अगदी व्यावहारिक विषयावरहि ग्रंथरचना मराठी वाङ्मयांत आरंभकाळीं होत असल्याचें दिसतें. मराठी राज्यांतील भाषा व व्यवहार हीं कळण्यास हें वाङ्मय अतिशय उपयोगी आहे. पण तें फारच थोडें उपलब्ध आहे.

ग्रंथलेखनाच्या बाबतीत हेमाद्रीचें कर्तृत्व अनिश्चित असलें तरी महाराष्ट्रांत बाजरी, बिनचुन्याच्या इमारती आणि मोडी लिपी या तीन गोष्टींचा पुरस्कार करण्याचें श्रेय हेमाद्रीस निर्विवादपणें देण्यांत आलें आहे. 'चतुर्वर्गचिंतामणि' हा हेमाद्रीचा ग्रंथ सर्वमान्य आहे, असें पांगारकर म्हणतात ( म. वा. इ. १-३३२ ). या ग्रंथांत व्रतें, दान, तीर्थे, देवतापूजन, श्राद्धविधि, मुहूर्तनिर्णय, प्रायश्चित्त, इत्यादि विषय आहेत.

'**आयुर्वेदरसायन**' हा हेमाद्रीचा आणखी एक ग्रंथ पांगारकरांनी व भावे यानी उल्लेखिला आहे.

**बोपदेव** हा हेमाद्रीचा समकालीन, सहकारी पंडित व भक्त होय. तो वऱ्हाडी ब्राह्मण होता. बोपदेव व हेमाद्रि यांनीं एकमेकांच्या ग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत.

बोपदेवानें व्याकरणावर १०, वैद्यकावर ९, ज्योतिषावर १, साहित्य-शास्त्रावर ३, भागवत तत्त्वावर ३, मिळून २६ प्रबंध लिहिल्याचें हेमाद्रीनें म्हटलें आहे. त्यानें भागवतावर चार ग्रंथ लिहिलेः **१ हरिलीला २ मुक्ताफल, ३ परमहंसप्रिया** व **४ मुकुट** असे हे चार ग्रंथ आहेत. **हरिलीला** व **मुक्ताफळ** या बोपदेवाच्या ग्रंथांवर हेमाद्रीनें टीका लिहिली.

# ४ महानुभाव चक्रधर

मुकुंदराजाच्या नंतर ज्ञानेश्वराच्या पूर्वी एका मोठ्या पंथाचें वाङ्मय महाराष्ट्रांत निर्माण होऊं लागलें. तो महानुभावपंथ होय. 'महानुभाव हा शब्द महानुभाव कवींच्या ग्रंथांत कोठेंच आढळत नाहीं. 'महात्मा' शब्द मात्र आढळतो. या पंथास महात्मा पंथ, जयकृष्णीय पंथ, अच्युत पंथ, महानुभावपंथ अशीं नांवें पुढें मिळत गेलीं.'

( म. वा. इ. १-४७८ )

या पंथाविषयीं टीकाकारांत तीव्र मतभेदांचीं रणें पूर्वी माजलीं, मध्यंतरीं तीं शांत झालीं होतीं. महानुभावाविषयीं महाराष्ट्रांत तीव्र तिरस्कार बरींच वर्षे होता. त्याची तीव्रता कमी व्हावी व महाराष्ट्रीयांनीं त्यांना परके, विरोधक न मानतां आपल्यांतलेच म्हणून त्यांचा स्वीकार करावा या धोरणानें पांगारकरादिकांनीं विवेचन केलें.

[ म. वा. इ. १-४८० ]

महानुभावांच्या वाङ्मयाचें संशोधन अलीकडे अतिशय मोठ्या प्रमाणावर वऱ्हाडांत सुरू झालें. यापैकीं कांहीं संशोधकांनीं महानुभावपंथाच्या प्रवर्तकाविषयीं अतिशयोक्त आदर दाखवून त्यांना कृष्ण–बुद्ध महावीरप्रभृतींच्या मालिकेंत बसविण्याचा उपक्रम केला. त्यामुळें त्याची प्रतिक्रिया होऊन महाराष्ट्रांत पुन्हां वादविवाद सुरू झाले आहेत.

महानुभावपंथाचे मूळ पुरुष गोविंद प्रभु, गुंडम प्रभु उर्फ गुंडोबा गुडम राऊळ हे होत. त्यांच्या जन्मकाळाविषयीं शके १०८३, ११०० व १११० अशीं तीन मतें आहेत. त्यांचा जन्म वऱ्हाडांत ऋद्धिपूरजवळ काठसुर गव्हाण या खेडेगांवीं झाला. ते काण्वशाखीय ब्राह्मण वऱ्हाडांत ऋद्धिपूर गांवीं रहात. आईबाप लहानपणीं वारल्यावर मावशीजवळ ऋद्धिपूर येथें त्यांचें वास्तव्य झालें. लहानपणींच त्यांना परमार्थसुखाचा छंद लागून ते सिद्धकोटीला पोहोचले. ते कृष्णभक्त होते.

## चक्रधर

चक्रधर हाच महानुभावपंथाचा प्रवर्तक होय. गोविंद प्रभूविषयीं फारशी माहिती नसल्यामुळें महानुभावांचा विचार चक्रधरापासूनच करावा लागतो.

चक्रधराचें मूळ नांव हरपाळदेव असें होतें. तो भडोच येथील राजाचा दिवाण सामवेदी नागर ब्राह्मण, विशाळदेव याचा मुलगा होय. विशाळदेवास दत्ताच्या उपासनेनें पुत्र झाला. तोच हरपाळदेव होय.

मिडे यांच्या मतें त्याचा जन्म श. १०७५ मध्यें झाला असावा. पांगारकर यांच्या मतें जन्म शके १०७३ हा असावा.

वयांत आल्यावर हरपाळ राजविलासांत आयुष्य घालवीत राहिला. द्यूतक्रीडेच्या नादीं त्यानें सर्वस्व घालविलें. आपली पत्नी कमलादेवी हिच्या अंगावरचे दागिनेहि त्यानें घालविले. जुगारीच्या पायीं होणारी मानहानी, पत्नीकडून व आईबापांकडून होणारा उपहास या सर्वांचा परिणाम होऊन हरपाळ विरक्त होऊन एक दिवस रामटेक येथें श्रीरामाच्या दर्शनास जावयास निघाला. त्याच्याबरोबर बापानें मोठा लवाजमा दिला. परंतु वाटेंतच बरोबरच्या माणसांची चुकामूक झाली म्हणून असो किंवा हरपाळानें त्यांची नजर चुकविली म्हणून असो, हरपाळ रामटेकचा रस्ता सोडून ऋद्धिपुराकडे ( परमेश्वरपुराकडे ) गेला [ शके ११०७ चैत्र शु. १५ ( भावे म. सा. १-५७ ) ].

ऋद्धिपुरास गोविंद प्रभु उर्फ गुंडम राऊळ यांचा सहवास चक्रधरास लाभला. तेथें चक्रधरास योगविद्या प्राप्त झाली. गोविंद प्रभूकडून मंत्रोपदेश आणि चक्रधर हें नांव हरपाळास प्राप्त झालें.

१२ वर्षे पर्वतावर वास केल्यावर चक्रधर देशसंचार करू लागला. तेलंगण, कर्नाटक, या प्रांतांत कांहीं काळ संचार केल्यावर तो महाराष्ट्रांत येऊन राहिला.

चक्रधरानें अनेक विद्यांत विलक्षण नैपुण्य संपादन केलें होतें. भारत, भागवत, योगवासिष्ट, इत्यादि ग्रंथांचें त्यानें अध्ययन केलें होतें.

कोणत्याहि शास्त्रांतील त्याचें अचूक ज्ञान पाहून त्याच्याविषयीं भोंवतालच्या लोकात विलक्षण आकर्षण निर्माण झालें.

गुरूपदेश लाभल्यावरहि चक्रधराच्या ठिकाणीं वैराग्य पूर्णपणें बाणलें नाहीं. संन्याशाप्रमाणें भटकत असतांनाच त्यानें एका घोड्याच्या व्यापाऱ्याच्या मुलीशीं विवाह केला. भावे म्हणतात : 'औरंगल शहरीं कमल नाईक नांवाच्या सामवेदी ब्राह्मणाची मुलगी हंसाबा हिच्याशीं श. ११२२ ज्ये. शु. ७ स विवाह केला. (म. सा. १-५७) हंसाबाबरोबर कांहीं काळ संसारसुख अनुभवल्यावर त्यास पुन्हां वैराग्य आलें आणि त्यानें देशाटन सुरू केलें. चक्रधर पैठणप्रांती असतां यादवाच्या राजघराण्यापर्यंत महानुभावपथाचा प्रवेश झाला. भटकतां भटकतां तो अचळपूर ( एलिचपूर ) येथें आला.

एलिचपूरच्या रामदेव दरणा नांवाच्या एका संस्थानिकाची गांठ पडली. रामदेव दरणा यांच्या आग्रहावरून चक्रधर त्याच्या राजधानीस गेला आणि तेथें रामदेवरावाच्या आग्रहावरून त्याची मुलगी उमादेवी हिच्याशीं विवाह केला आणि गृहस्थाश्रमात तो पुन्हां रममाण झाला. हा त्याचा तिसरा विवाह होय. ( श. ११८२ ) तीन वर्षे अशीं गेल्यावर चक्रधरास पुन्हां वैराग्याची लहर आली. पण उमादेवी (उर्फ गौरी) हिच्या सहवासाचा मोह सुटेना. शेवटीं एक दिवस त्यानें त्या मोहापासून सुटण्याचा निश्चय करून चंद्रभागेंत बुडी मारली. तो बुडाला असेंच सर्वांस वाटलें. दुःखानें उमादेवी मरण पावली ! परंतु चक्रधर परतीरास सुखरूप पोहोंचला होता. परत आल्यावर त्यास पत्नीच्या मृत्यूची बातमी कळली आणि सर्वसंगपरित्याग करून तो विदेही स्थितींत भटकूं लागला ! असें भटकत असतां त्यास भोगावती नदीचे कांठीं श्रीदत्तात्रेयाचें दर्शन झालें ( शके ११८५ कार्तिक ). त्यानें संन्यासदीक्षा धारण करून राहिलेलें आयुष्य धर्मोपदेश करण्यांत घालविलें.

त्यानें जो उपदेश केला तो कोणत्याहि एका विशिष्ट तत्त्वज्ञानाचा नव्हता. स्वानुभवानें जें पटलें, सुचलें, तें त्यानें इतरांस सांगितलें. संन्यासधर्माचाच त्यांत मुख्य भाग होता. परंतु त्यानें स्वतः कोणतीहि तत्त्व-

प्रणाली अशी सिद्ध केली नाहीं. त्याच्या उपदेशांतून, त्याच्या वचनांतून त्याच्या शिष्यांनीं तत्त्वज्ञान रचलें व महानुभावपंथ सिद्ध केला.

चक्रधर दक्षिण हिंदुस्थानकडे वळला नाहीं. उत्तरेकडील प्रांतांत संचार करून त्यानें आपल्या नवीन पंथाचा प्रसार केला. महाराष्ट्राविषयीं त्यास विशेष आदर दिसतो. 'कानड देशॉ तैलंग देशां न वचावे : महाराष्ट्रीं असावे' अशा त्याचा उपदेश होता. भावे म्हणतात " 'कन्नड व तेलंगण हे देश विषयी वृत्तीचे म्हणून वर्ज्य केले गेले (म. सा. १–६४) चक्रधरानें आपल्या तत्वाचा प्रचार करण्याचें कार्य केवळ ९ वर्षे केलें. त्या काळांत ५०० शिष्य झाले. त्याच्या मृत्यूनंतर श्रीगोविंद प्रभु १६ वर्षे हयात होते. नागदेव हा महानुभावाचा प्रथमाचार्य झाला. त्यानेंच मुख्य पंथप्रसाराचें कार्य केलें. हिंडत हिंडत शके ११९४ मध्यें चक्रधर बदरिकाश्रमीं निघून गेला.

शेवटीं हिमालय पर्वतांत जात असतां त्याचा श्रेष्ठ शिष्य नागदेव मात्र बरोबर होता. शेवटी एके दिवशीं त्यासहि मागें ठेवून श्रीचक्रधर स्वामी निघून गेला. पुढें त्याचें काय झालें किंवा त्यानें काय केलें याची प्रत्यक्ष माहिती कोणासहि नाहीं. (म. सा. १–६०)

पंथाचा संस्थापक या दृष्टीनें चक्रधरानें शिष्यांच्या आचाराविषयीं नियम घालून दिले होते. पूजेच्या तयारीपासून तों बाजारहाट करण्यापर्यंत मठांतील कामें शिष्यांस वांटून दिलेलीं असत. नियमांचें उल्लंघन करणारास अतिशय कडक शासन होई. आणि प्रसगी पंथांतून हकालपट्टीहि होई.

भिक्षावृत्तीचें विवेचन करतांना, कांहीं दंडक घातले होते. 'मौन्यें भिक्षा कीजे. क्षण एकू उभेआ असिजे. गोदोहोनमानें उभेया असिजे, भिक्षा करितां पायाची वासु पहावी, दाराचें ग्रासू न पहावी. हाताची वासु न पहावी.'

भिक्षेचीं घरें निवडूं नयेत; पण संपन्न, ओळखीचा, हिंसक, निंदक, अशा घरीं जाऊं नये ही निवड आहेच. भिक्षा केवळ प्राणधारणेस; इंद्रियार्थ नव्हे. 'जठरा प्राणाहुतीची पीडा हरे इतुके घेए.'

वसतिस्थान निवडतांनाहि ‘ निर्जनु स्थानीं इंद्रियमनातें संकोचौनि झाडातळीं ’ नामस्मरण करीत बसावें.

परंतु पंथप्रचारासाठीं समाजांत हिंडतांना ‘ प्रियवक्तेया होआवे, सत्यार्जवा होआवे, चतुर्विध भूत ग्रामां अभयो देआवे, राग क्रोध मद मत्सरु यांचा त्याग़ू यांचि नांवें संन्यासू कीं. विषयांचीं निवृत्ती होआवी, देहावरी अनास्था होआवी, परमेश्वराची आर्ति होआवी. ’

हें पंथांतील आचारविचारांचें स्वरूप संन्यासधर्मास जुळतेंच आहे. संन्यासधर्मानें राहून लोकसेवा करण्याची दृष्टि या उपदेशांत दिसते.

## ५ महानुभाव तत्त्वज्ञान

सृष्टींत जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चार मुख्य वस्तू असून जीव हे बद्धमुक्त, देवता ह्या नित्यबद्ध, परमेश्वर नित्यमुक्त आणि प्रपंच जड आहे. प्रपंच जड आणि देवता नित्यबद्ध; त्यामुळें त्यांच्या बाबतींत मोक्षाचा संभवच नाहीं. बद्ध असूनहि मुक्ततेची पात्रता फक्त जीवास आहे. त्यास नित्यमुक्त परमेश्वराच्या ज्ञानानेंच फक्त मोक्ष मिळूं शकतो. देवता अनित्य फळें देतात, आत्यंतिक मोक्ष देऊं शकत नाहींत. त्यामुळें शाश्वत आनंद देणारा मोक्ष मिळविण्यासाठीं परमेश्वराचीच उपासना केली पाहिजे. देवतांची उपासना करणें योग्य नाहीं. चक्रधरस्वामींनीं सांगितलेलें ब्रह्मविद्याशास्त्र हेंच मोक्षप्राप्तीचें एकमेव साधन. इतर शास्त्रें देवतांच्या उपासनांचें प्रतिपादन करतात म्हणून तीं परमेश्वरप्राप्तीस अयथार्थ अर्थात् अप्रमाण होत.

देहधारी जीवास पूर्वकर्मानुसार ज्ञान प्राप्त होतें आणि तें खुद्द ईश्वरावतार स्वमुखानें किंवा आचार्यमुखानें त्यास प्राप्त होतें. जीवोद्धारणासाठीं ईश्वर वेळोवेळीं अवतार घेतो.

ज्ञानप्राप्तीनंतर शास्त्राज्ञेप्रमाणें आचारधर्म पाळावयाचा असतो. ज्ञानप्राप्तीनंतर लगेच मोक्ष मिळत नाहीं. तर जीवास पुन्हां एकदां ‘ सुखीया श्रीमंतांच्या घरीं पुरुष होऊनि जन्म येतो. ’ त्या जन्मानंतर बारा वर्षांनीं ईश्वरावतार त्याला प्रत्यक्ष भेटतो.

पंथाचा संबंध फक्त ईश्वराशीं म्हणून अच्युत हेंच त्याचें गोत्र. गृहस्थाश्रमी अनुयायी असले तरी सर्व भर सन्यासावर आहे. संन्यास शक्य तों उमेदींत घ्यावा.

संन्यासधर्माप्रमाणें फाटकें वस्त्र व भिक्षान्न हींच अवीट व्हावींत. कसल्याही वस्तूचा संग्रह करू नये. मीठ व गीत हीं देखील वर्ज्य आहेत.

## अवतारकल्पना

महानुभाव दशावतार मानतात; परंतु त्यांत पूर्ण व अपूर्ण अवतार असे भेद करून फक्त श्रीकृष्णावतार पूर्ण मानतात. श्रीकृष्ण हाच पूर्ण परमेश्वरावतार; बाकीचे अवतार हे अपूर्ण आणि ते विष्णूचे अवतार म्हणजे एका दैवताचे अवतार होत. दैवतें हीं परमेश्वरापेक्षां खालच्या पायरीवर आहेत असें महानुभाव मानतात.

श्रीकृष्णाबरोबरच महानुभाव चार युगांचे चार अवतार मानतात' हंस ( कृतयुग ) दत्त ( त्रेतायुग ) श्रीकृष्ण ( द्वापारयुग ) व चक्रधर ( कलियुग ).

यांशिवाय कृष्णाचीं पांच रूपें असे पंचकृष्ण आहेत : १ स्वतः श्रीकृष्ण, २ दत्त, ३ चांगदेव राऊळ, ४ गुंडम राऊळ ( चक्रधराचे गुरु ५ चक्रधर.

( म. वा- इ. १-४१८ )

श्रीकृष्ण हाच फक्त परमेश्वराचा पूर्ण अवतार आणि भागवत–विशेषतः दशमस्कंम–श्रीकृष्णचरित्रपर म्हणून भागवत हा महानुभाव प्रमाण ग्रंथ मानतात आणि उद्धवास भक्तराज म्हणतात.

गीतेचा द्वैतपर अर्थ लावून ते गीताहि मानतात. डॉ. कोलते म्हणतात; ‘ श्रीदत्त, श्रीकृष्ण, श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभु, व श्रीचक्रधर या परमेश्वरावतारांस पंचकृष्ण म्हणून संबोधतात. ’ पांगारकर चार युगांचे चार अवतार आणि पंचकृष्ण यांत जो भेद करतात त्याच्याशीं कोलते सहमत नाहींत.

( नवभारत ऑगष्ट १९४८ )

# महानुभाव आणि वैदिकपंथ

महानुभाव वाङ्मयाच्या आधुनिक अभ्यासकांत दोन तट आहेत. एकाच्या मतें महानुभाव हा वैदिक आहे. दुसऱ्याच्या मतें तो अवैदिक आहे.

वैदिक पंथाशीं महानुभावाचें कांहीं साम्य आहे. त्यांच्या ग्रंथांतून श्रुतिस्मृति आणि उपनिषदें यांतील निवडक वाक्यें जवळ जवळ जशींच्या तशींच घेतलेलीं आहेत. भावे म्हणतात : 'महानुभाव पंथांतील लोकांचीं धर्मतत्त्वें हीं आपल्याशीं ( वैदिक ! ) जुळवून पाहता दोहोंत फारसें अंतर दिसत नाहीं.'

'जीव, देवता, ( विश्वरूपापासून मृत्तिकेपर्यंत ) प्रपंच आणि परमेश्वर अशीं चार तत्त्वें आहेत. जीव आणि ईश्वर यांचे संबंध भृत्य आणि स्वामी असे आहेत. यावरून महानुभावपंथ द्वैतवादी आहे.

( पां. १-४१९ )

महानुभाव पथाच्या आधुनिक अभ्यासकांनीं या बाबतींत अगदीं ताजा निर्णय असा दिला आहे कीं, महानुभावपंथ हा वेदांविषयीं आदर बाळगणारा असला तरी तो वेदांना प्रमाण मानणारा नाहीं. अर्थात् या दृष्टीनें अवैदिक पंथ आहे. कारण—

महानुभाव पंचकृष्ण किंवा परमेश्वराचे पांच अवतार यांचींच वचनें प्रमाण मानतात. वेदवचनें ते प्रमाण मानीत नाहींत. पाच अवतारांपैकीं, श्रीदत्तात्रेयाचीं वचनें उपलब्ध नाहींत. श्रीकृष्णवचनें म्हणजे गीता. गीतेंतील फक्त श्रीकृष्णाच्या मुखींचीं वचनें. श्रीगोविंदप्रभु यांचीं अगदीं थोडीं वचनें उपलब्ध आहेत. श्रीचक्रधराचीं वचनें भरपूर प्रमाणांत उपलब्ध आहेत. म्हणून शेवटीं 'प्रमाण' म्हणून गीतेंतील श्रीकृष्णाचीं वचनें आणि श्रीचक्रधराचीं वचनें ( सूत्रें ) यांनाच महानुभावांच्या दृष्टीनें प्रामाण्य आहे.

श्रीचक्रधरवचनें हींच महानुभावांची श्रुति. श्रुतिखेरीज, नागदेवाचार्यांचीं वचनें ( स्मृति ); रामेश्वर, परशुराम, नागाइसा, इत्यादिकांचीं वचनें व

त्यांचें निरूपण ते वृद्धाचार, ओंकारबास, हरिबास गुर्जरस्थ शिवबास इत्यादिकांचें निरूपण ते मार्गरूढ हे ' त्याऱ्ही ' सकल मार्गासी प्रमाणें. या शिवाय शिवबास, बहाळे नारोबास इत्यादिकांचें निरूपण तें वर्तमान. अशीं हीं पांच प्रमाणें महानुभाव मानतात. मुख्य प्रमाण चक्रधरवचनें.

वेदाविषयीं चक्रधर याचें असें मत होतें कीं, वेद हे 'इतर' म्हणजे ब्रम्हविद्याशास्त्रावेगळें शास्त्र आहे. वेद हें कर्मरहाटीचें शास्त्र म्हणून अप्रमाण अतएव त्याज्य होय. वेद हे अपरे शास्त्र म्हणजे ईश्वराच्या अलीकडचें देवतांसंबंधीचें शास्त्र ' वेदे करुनि मायेचें अस्तित्व सांधितलें ' मायेपलीकडच्या परमेश्वराची वेदास जाणीव नाहीं.

वैदिकाशीं दुसरा विरोध म्हणजे देवतांची उपासना ही परमेश्वरप्राप्तीच्या दृष्टीनें अप्रमाण होय.

माया उर्फ चैतन्य म्हणजे परमेश्वर नव्हे. ती सर्व देवतांची स्वामिनी म्हणजेच श्रेष्ठ देवता. वेदांना या मायेचें सपूर्ण ज्ञान नाहीं. वेदानें 'जीवाचें अज्ञानमुंचन नव्हे. '

आपला मार्ग हाच खराखुरा परमार्ग. इतर जीवांना इतर धर्मांतून काढावयाचें व या मार्गात आणावयाचें. ते इतर मार्ग कोणते तर, वेदागम, वगैरे.

" आचार्या नरकः प्रतारक म्हणौनि " ( विचारस्थळ ) असे चक्रधराचे उद्‌गार आहेत. संदर्भानें त्याचा अर्थ, वेदानुयायी आचार्यांना नरक प्राप्त होतात असा आहे.

महानुभाव पंथाचें अवैदिकत्व सिद्ध करून कोलते शेवटीं सांगतातः श्रीचक्रधरस्वामी ' वैदिक ' नसले तरी त्यांनीं वेदाला विरोध केलेला आहे; त्यांचा अनादर किंवा उपहास केलेला आहे असें मात्र नाहीं. वेदांनीं देवताप्राप्ति होते. देवता या परमेश्वराच्या शक्ती. एवढ्यापुरता देवता व त्यांच्या प्राप्तीचा मार्ग दाखविणारे म्हणून वेद श्रीचक्रधरास मान्य आहेत. त्यांनीं नागदेवभटाची वेदाध्ययनाची इच्छाहि पूर्ण केली.

पुन्हां ब्रम्हवादी वेदांत्याला पुढील सृष्टींत ज्ञानाधिकार मिळतो. परमेश्वराच्या ज्ञानाच्या अलीकडची ती एक योग्यतेचीच अवस्था आहे. या दृष्टीनें वेदानुयायी एक साधक म्हणून आदरणीय आहेच.

वेदांविषयीं अनादर न दाखविला आणि वेदानुयायींचाहि स्वीकार केला तरी वेदमार्गाचें अनुसरण जनतेनें करूं नये असें चक्रधरांनीं सांगितलें. या मताचाच त्यानें निर्भीडतेनें आणि निर्भयतेनें प्रचार केला.

महादाश्रम हा वैदिकांचा एक पुढारी होता. त्यानें वेदमार्गाचा चक्रधर उच्छेद करतो म्हणून यत्रासन तयार करून त्याचा खून करण्याचा प्रयत्न केला. या कामीं त्यानें हेमाडपंडितांचेंहि साह्य घेतलें. असा आणखी एक आधार कोलते यांनीं देऊन चक्रधराचें अवैदिकत्व सिद्ध केलें आहे.

महानुभाव वाङ्मयाचे दुसरे एक मान्यवर अभ्यासक श्री. य. खु. देशपांडे यांनीं ज्ञानेश्वरी दर्शन भाग १ ला या ग्रंथांत ज्ञानेश्वर आणि महानुभाव या लेखात वारकरी संप्रदाय व महानुभाव पंथ यांत साम्य दाखवून, महानुभाव पंथ हा अवैदिक,वर्णाश्रमविरोधी आहे अशा प्रकारचीं मतें हा गैरसमज आहे असें ठासून सांगितलें आहे.

(ज्ञा. द. १-१५७)

'महानुभावपंथ' हा श्री. बाळकृष्णशास्त्री महंत यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत श्री. य. खु. देशपांडे यांनीं हेंच मत पुन्हां मांडलें आहे. परंतु स्वतः लेखक श्री. बाळकृष्णशास्त्री महंत यांचें खाजगी मत महानुभाव अवैदिकच असें आहे असें आचार्य भागवत यांनीं आपल्या लेखांत नमूद केलें आहे. (नवभारत. ऑगष्ट १९४८ पृ. २२). वेदांना सरळ विरोध करण्याचें महंतांना धैर्य नाही. परंतु आपल्या ग्रंथांत वेदव्यासास चांडाळ ठरविण्याची 'धडपड' त्यांनीं केली आहे.

आचार्य भागवत यांच्या मतें महानुभाव हे अवैदिकच. त्यांना वैदिक म्हणणारे श्रीकृष्णप्रेमाचा आधार घेतात पण आचार्य भागवत म्हणतातः 'श्रीकृष्ण हा स्वतःच वैदिक नव्हे. आर्यांचा पुढारी इंद्र याच्याशीं कृष्णाचें

भांडण होतें. इंद्र व कृष्ण यांच्यांतील भांडण हा उच्चवर्णीय व नीच-वर्णीय यांच्यांतील लढा होता. त्या लढ्यांत कृष्णापुढें टिकाव न लागल्या-मुळें ब्राह्मणांनीं त्यालाच वैदिक करून घेतलें आणि इंद्राला बहिष्कृत केलें. ”

( नवभारत ऑगस्ट १९४८ पृ- २२ )

महानुभावास वैदिक मानणारे य. खु. देशपांडे, यांच्याबरोबर कोलते आजपर्यंत होते. परंतु कोलते यांनीं आपलें पूर्वीचें मत टाकून नवें मत स्वीकारल्याचें नवभारताच्या याच अंकांत स्पष्टपणें सांगितलें आहे.

य. खु. देशपांडे यांनीं वर सांगितलेल्या आपल्या लेखांत महानुभाव व वारकरी पंथ यांच्यांत खालील साम्य दाखविलें आहे:

(१) स्त्रिया आणि शूद्र यांना संन्यास व ज्ञानोत्तर भक्तीचा मार्ग बंद होता. वेदांचें हें ‘ कृपणत्व ’. दूर करून महानुभाव व ज्ञानेश्वर यांनीं भगवद्भक्तीचा मार्ग खुला केला. गीतेवर ज्ञानेश्वरीप्रमाणें महानुभावांच्याहि २०-२५ टीका आहेत.

(२) श्रीकृष्णभक्ति ही दोन्ही पंथांत प्रामुख्यानें आहे आणि श्रीकृष्ण-चरित्रपर वाङ्मय दोन्ही पंथांत आहे.

एकादश स्कंधावर एकनाथाप्रमाणें भास्कराचार्यांचाहि ग्रंथ आहे. वत्सलाहरण, रुक्मिणीस्वयंवर, शिशुपालवध इत्यादि भागवतांतील कथांवर रचलेले महानुभाव ग्रंथ आहेत.

( ३ ) दोन्ही पंथांत वर्णाश्रमधर्म पाळून संन्यास न घेतां मोक्ष मिळवितां येतो.

( ४ ) वर्णाश्रमपालनाचीं कांहीं उदाहरणें : चक्रधराचा हंसांबाशीं विवाह वैदिक पद्धतीनें झाला होता. श्रीगोविंदप्रभु यांच्यासमोर नागदेवाचार्यांचे पुत्र आणि आणखी इतर सहा बटू यांचें मौंजीबंधन झालें.

वर्णाश्रमधर्माप्रमाणें आचरण करूं नये असा महानुभावीय ग्रंथांत कोठेंहि कसलाच उल्लेख नाहीं. उलट संन्यास न घेतांच पंथानुयायी वर्ग

श्रीचक्रधरकालापासून विद्यमान कालपर्यंत वर्णाश्रम धर्म पाळीत आला आहे.

स्वत: योगी असूनहि ज्ञानेश्वरादिकांप्रमाणें श्रीगोविंदप्रभु, श्रीचक्रधर यांनींहि योगाचा उपदेश केला नाहीं. इतकेंच नव्हे, तर महानुभाव वाङ्मयांत योगाचें ( पातंजल योगाचें ) वर्णन नाहीं. 'अहिंसे, निस्संगु निवृत्ति भक्तियोगु '

( ऋद्धिपुरवर्णन ओ. ३० )

या दोन पंथांत फरक काय तो तत्त्वज्ञानाचा आणि त्याच्या तपशिलाचा आहे. उभयपंथ हे एकाच प्राचीन वेदमूलक सनातन धर्माच्या शाखा आहेत.

( ज्ञा. द. १-१५७ ).

पांगारकरांनीं याच मतास दुजोरा दिला आहे. ते म्हणतातः 'या पंथांत एकंदर हिंदुपरंपरेशीं विसगत अशा कांही चालीरीती रूढ झाल्या आहेत. त्या या पंथांतल्या समंजस लोकांनीं काढून टाकल्यास हा पंथ सनातन वैदिक धर्मांतलाच एक पंथ आहे असें सर्वांसच कबूल करावें लागेल. '

( म. वा. इ. १-४७९ )

महानुभाव व वारकरी पंथ यांच्यांतील साम्य पांगारकरांनी दोन्ही पंथांतील ग्रंथांतले समानार्थी उतारे देऊन दाखविलें आहे. परंतु ते सर्व वाचल्यावर असें दिसतें, कीं या पंथांतील भिन्नत्वावरून जे कलह माजले आहेत ते दूर व्हावेत आणि सर्व पंथांत ऐक्यभाव असावा, अशी सदिच्छाच या विवेचानाच्या मुळाशीं आहे. भिन्नत्वानें कलह माजण्याचें कारण नाहीं. तो असंमजसपणा आहे हें मान्य. परतु जर भिन्नत्व असलेंच तर तें केवळ ऐक्यभावाच्या तळमळीनें असिद्ध कसें होणार ?

महानुभाव व वारकरी या पंथांतले अनेक ग्रंथकार हे समकालीन होते. दोन्हीकडे एकाच प्रसंगावर काव्यलेखन होत होतें. गद्य नि निर्यमक

रचनाहि होत होती. मराठी भाषेचें ऐश्वर्य व सामर्थ्य दोघेहि वाढवीत होते. असें पाहिल्यावर पांगारकराच्या मनात सहज आलें कीं, ' (गोविंदप्रभु, ज्ञानेश्वर, चक्रधर, नामदेव ) हे चारी पुरुष एकत्र आले असते तर भारी मजा आली असती. कदाचित् ऋद्धिपूर पंढरपुरात तेव्हांच सामील होऊन गेलें असतें. अस्तु. जें मागें न झालें तें यापुढें व्हावें व महानुभाव महंत, त्यांचे ग्रंथ व त्यांचा पंथ पंढरपूरच्या महासागरांत एकमय होऊन जावा अशी माझी उत्कट इच्छा आहे. '

' म. वा. इ. १-४७६-७७ )

परंतु या उत्कट इच्छेला मान देऊनहि दोन्ही पंथांतले भेद असिद्ध कसे होणार ?

उपास्य व उपासनापंथ यांत दोघांचेंहि ऐकमत्य असल्यामुळें दोघेहि निःसंशय वैदिक भागवतधर्मीय आहेत असे पागारकर म्हणतात. आणि उपास्य आणि उपासनापंथ यांतलाच भेद दाखवून इतर अभ्यासक महानुभावास अवैदिक ठरवितात !

उपास्याच्या ऐक्याच्या मोठ्या आधारावर, श्रीकृष्ण अवैदिक आहे असें सांगून आचार्य भागवतानीं वैदिकांवरच मोठाच आघात केला आहे.

उपासनापंथांत तर भेद जास्तच स्पष्ट आहे. 'अपर' म्हणजे वेदप्राणित मार्गास महानुभावांचा विरोध नसला तरी ते त्यास दुय्यमच मानतात. चातुर्वर्ण्यास स्थान मिळालें तरी चक्रधराचा मुख्य कटाक्ष संन्यासमार्गावर आणि तो मार्ग स्त्रीशूद्रादि सर्वांना खुला करण्यावरच होता. आज मूर्तिपूजा होत असली तर मूळ प्रवर्तकाच्या उपदेशास ती विसंगतच आहे.

तसें पाहिलें तर कोणत्याहि पंथांत कालप्रवाहानुसार मुळांत नसलेले आचारविचारप्रवाह शिरतातच. परंतु तत्त्वज्ञानाचा विचार करतांना कोणत्याहि पंथाच्या लौकिकाचारांतील स्वरूपापेक्षां मूळच्या तात्त्विक भूमिकेचाच विचार करावा लागतो आणि तो केल्यास महानुभाव पंथ हा ' अवैदिक '. आहे हेंच मत जास्त तर्कशुद्ध आहे असें वाटतें.

दोन्ही पंथांत उपास्य, धर्मग्रंथ आणि मोक्षाचीं साधनें एकच आहेत असें य. खु. देशपांडे आर्जवून सांगतात. पण उभयपंथाचा ज्ञानेश्वरकालीं एवढेंच काय पण पुढेंही केव्हां संबंध आल्याचें दिसत नाहीं. ज्ञानेश्वर-कालींसुद्धां दोन्ही पंथ महाराष्ट्रभर पसरले होते. या वस्तुस्थितींत बराच अर्थ आहे आणि तो म्हणजे परंपरेस जास्त जवळचा असा भागवत धर्म प्रभावी ठरत गेला आणि महानुभावपंथाची आधीं उपेक्षा आणि नंतर पंथीयांची त्यांच्या आचारवैचित्र्यानें अवहेलना होत गेली.

आचार्य भागवत यांच्या मताप्रमाणें महानुभावपंथप्रवर्तक चक्रधर याच्या ठिकाणीं सामाजिक क्रांति करण्याइतकें सामर्थ्य असलें तरी तें वैचारिक स्वरूपांतच राहिलें. प्रत्यक्ष आचारांत, व्यवहारांत तें निष्प्रभ ठरलें. इतकेंच नव्हे तर य. खु. देशपांडे यांनीं दिलेल्या वृत्तांतावरून असें दिसतें कीं, चक्रधरास स्वतःच इतर पंथीयांशीं सामोपचाराचेंच धोरण स्वीकारावें लागलें. जास्तींत जास्त एवढें तरी नक्की म्हणतां येईल कीं, चक्रधरानें तात्त्विकदृष्ट्या निराळेंपण सिद्ध केलें त्यापेक्षां त्याच्यानंतर पंथीयांनीं आचारांत जें भिन्नत्व दाखविलें त्यामुळें तात्त्विक भिन्नत्व विकोपास गेलें.

## महानुभावपंथाचे आणखी कांहीं टीकाकार

चक्रधराविषयीं श्री. भावे म्हणतात : "महंताला आणि धर्मसंस्थापकाला साजेल अशी त्याची राहणी असे. त्याचें आचरण फार कडक असे. आपल्या पंथाविषयीं आदर, प्रेम आणि अभिमानहि त्याच्या ठिकाणीं फार उत्कट असे. पण इतर धर्माचा किंवा इतर पंथाचा उपहास तो करीत नसे व तसा कोणी केलेला त्याला आवडत नसे.

दुसऱ्या पंथांतील पवित्र ठिकाणांची, तीर्थांची किंवा त्यांतील पूज्य मानलेल्या पुरुषांची अवहेलना करावी किंवा थट्टा करावी हें त्याला बिलकूल खपत नसे. अशा वेळीं तो त्या अपराध्यास कडक शासन करी किंवा केव्हां केव्हां तर तो त्याला आपल्या जवळून घालवूनहि देई."

[ म. सा. १-६२ ]

वाटेल त्याला चक्रधराच्या गोटांत प्रवेश मिळत नसे. कांहीं निर्बंध पाळून पंथदीक्षेच्या कसोटीस उतरल्याखेरीज कोणालाहि पंथांत प्रवेश मिळत नसे. असे जे पांचपंचवीस निर्बंध असत त्यांत आप्तेष्टांचा संबंध तोडणें, आपली ओळख इतरास राहणार नाहीं अशा रीतीनें राहणें, भिक्षावृत्तीनें राहणें, याबरोबर कांहीं प्रांतांतील वास्तव्याविषयींहि निर्बंध असत. "कानड देशा, तेलंग देशा न वचावें महाराष्ट्रीं असावें." अशी चक्रधरानें शिष्यास आज्ञा केली होती. या आज्ञेचा अर्थ भावे असा लावतात कीं, कन्नड व तेलंगण हे देश, विषयी वृत्तीचे म्हणून वर्ज्य केले गेले.

[ म. सा. १-६४ ]

श्रीचक्रधरासंबंधीं प्रा. न. र. फाटक यांनीं जें सांगितलें आहे त्यावरून ( चित्रमय जगत् जुलै, १९४८ ) त्याच्या आचरणांत स्वैरवृत्ति बरीच दिसून येते.

अनेक प्रकारचे चमत्कार त्याच्याबद्दल नमूद केले आहेत. पाप-पुण्य, नीति-अनीति यांविषयींच्या प्रचलित कल्पनांशीं त्याचें वर्तन विसंगत दिसतें.

हिंदु शास्त्रांतील व्रतवैकल्यें तो पाळीत नसला तरी त्याचा त्यानें निषेध केला नाही.

चक्रधराच्या आचारविषयक वचनांत संन्यासी लोकांसाठीं रचलेल्या पूर्वीच्या संस्कृत ग्रंथांतील वचनांचा अनुवाद भरलेला दिसतो. त्यानें संन्यास धर्माची एक नवी संघटना निर्माण केली. एवढेंच श्रेय फार तर त्याच्या पदरीं टाकतां येईल. ( न. र. फाटक. चित्र. जुलै १९४८ पृ. ४६४ ). संन्यासधर्माचा पुरस्कार करतांना चक्रधरास वैराग्याची आवश्यकता वाटत नसे. किंबहुना वैराग्याविषयीं कसोटी न पाहतां, विचार न करतां त्यानें सर्रास येईल त्याला ( पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि ) संन्यासाची दीक्षा दिली. तो देवळांत रहात होता; पण त्यानें देवतांचें पूजनवंदन केलें नाहीं. हिंदू देवतांविषयीं तो उदासीन होता. आपल्याशीं 'संबंध' आलेल्या वस्तु वा स्थानें हींच स्मरणीय, वंदनीय व

पूजनीय आहेत असा त्यानें उपदेश केला. त्यामुळें देवतापूजनाऐवजीं चक्रधराच्या सहवासानें पावन झालेल्या ओट्या-गोट्यांचें पूजन सुरू झालें-

मूर्तिपूजेस विरोध करणारा, मूर्तिपूजकांची निंदा करणारा हा पंथ. पण त्यांत श्रीकृष्णमूर्ति, शिवलिंग, पितळी वा पत्र्यांचे मुखवटे व मूर्ति यांना स्थान मिळत गेलें.

भावे म्हणतात : 'मूर्तिपूजा ही विभूतिपूजेची बहीणच आहे. महानुभाव पंथांत विभूतिपूजा तर फारच पसरलेली आहे. अशा स्थितींत विभूतिपूजेमार्फत त्यांच्यांत मूर्तिपूजा शिरली हें साहजिकच झालें.'

या मूर्तिपूजेबद्दल महानुभावाचें समर्थन असें कीं, आम्ही वाटेल त्या दगडाच्या मूर्ति करीत नाही. चक्रधरस्वामीच्या स्पर्शानें किंवा इतर मार्गानें पाषाणाशीं संबंध आला त्या'संबंधी' पाषाणाचीच पूजा करतों. परंतु प्रत्यक्ष असें दिसतें. कीं, संबंधी पाषाणाबरोबर जे 'संबंधी' नाहींत अशा पितळी किंवा पत्र्यांचे मुखवटे व मूर्ति यांनाहि मंदिराच्या ओट्यावर पूजास्थान प्राप्त झालें.

चक्रधराच्या महानुभावपंथाविषयी महाराष्ट्रांत फारसा आदर निर्माण झाला नाही. याचें कारण त्यांनीं ज्या पद्धतीनें संन्यासधर्माची नवी संघटना निर्मिली होती ती प्रचलित लोकमतास स्वीकार्य वाटणें शक्य नव्हतें. त्याच्या संन्यासमार्गात वैराग्याऐवजीं विचित्रपणाच जास्त दिसूं लागला. विटाळशीचा विटाळ न मानणें हा आचार अशा विचित्रपणाचें उदाहरण होय. याविषयीं आचार्य भागवतांनीं, मोटा क्रांतिकारक, विलक्षणबुद्धिप्रधान, आजपर्यंत कोणत्याहि संतास वा सुधारकास जो सांगण्याचें धैर्य झालें नाहीं' असा अभिप्राय व्यक्त केला आहे. ( नवभारत, ऑगस्ट १९४८ ) स्त्रियांना संन्यासधर्माची दीक्षा देण्याचा सपाटा लोकनिंदेस विशेष कारणीभूत झाला. काळा पोषाख, उलटी काठी, मुंडन, पुढें प्राचीन कुलदैवतांचा उच्छेद करून तेथें आपले गोटे स्थापन करण्याची महानुभावांनीं केलेली दंडेली, यांमुळें लोकक्षोभच जास्त वाढला.

त्यांचा संन्यास शास्त्रांत बसणारा नाहीं, मुंडन शास्त्रोक्त विधीनें होत नाहीं, संन्यास ही गोष्ट कांहीं हिंदुधर्मात नवीन नव्हती. त्याचें एक शास्त्र

आहे, विधि आहे. तो झुगारण्याचा उपक्रम मात्र नवीन होता. महानु-भावांच्या *संन्यासाचें वैराग्य हें अधिष्ठान नव्हतें. तें लोकांना मानवलें नाहीं.*

विशेषतः महानुभावांनीं मुसलमानापासून रक्षण होण्यासाठीं पीराची पूजा आणि फकीर वापरतात तसें काळें वस्त्र ( स्याहपोष ) स्वीकारल्यावर त्यांना जिझिया कर माफ झाला व हिंदू त्यांना विधर्मी मानूं लागले.

महानुभाव शके १२८५ पर्यंत तरी काषायवस्त्र घेत असत. त्यानंतर मागें सांगितलेल्या प्रसंगीं त्यानीं कृष्णवस्त्रें स्वीकारलीं. श्री. य. खु. देशपांडे म्हणतातः 'अलीकडे काषायवस्त्रें परिधान करण्याची वृत्ति या लोकांत वाढत आहे. पंजाबांतील महानुभावांत तर काषायवस्त्राचीच प्रथा आहे.'

यावरून टीकेस कारण झालेलें हें वस्त्रांतर हें व्यावहारिक धोरणाचें निदर्शक होतें. स्वपंथरक्षणाचा तो एक मार्ग संकटकालीं स्वीकारण्यांत आला होता असें दिसतें.

मुनीव्यास यानें मुसलमान बादशहाकडून आज्ञापत्र मिळवून पैठण, त्र्यंबक, इत्यादि क्षेत्रांत देवळाच्या आवारांत 'ओटे' बांधले. अशा कृत्यांनीं हिंदूंच्या मनांत मानभावाविषयीं जास्तच तिरस्कार माजला.

त्यांनीं आपल्या वाङ्मयाचें सांकेतिक लिपींत लेखन करून आपले ग्रंथ कटाक्षानें 'गुप्त' राखले तर ज्ञानेश्वरादि साधुसंतांनीं संस्कृतांत दडलेलें ज्ञान सर्व सामान्य माणसासाठीं खुलें केलें! या गुप्ततेमुळें, स्वजनाविषयींच्या अवहेलनेमुळें महानुभाव पंथ महाराष्ट्रांत भागवत धर्मापुढें टिकाव धरूं शकला नाहीं.

महानुभाव पंथाच्या अधःपातास आरंभ कृष्णंभट नांवाच्या एका महंतापासून झाला असें भिडे यांनीं सांगितलें आहे.

पैठणप्रांतीं चक्रधराचा यादवांच्या राजघराण्यांत प्रवेश झाला. त्याच वेळीं पैठणचा कृष्णंभट कुळकर्णी यानें पंथदीक्षा घेतली आणि स्वतःस कृष्णावतार समजून स्वैर वर्तनास आरंभ केला. यामुळें यादव राज्यांतून कृष्णंभटाबरोबर चक्रधर आणि त्याचा पंथ यांचीहि हकाल-पट्टी झाली.

या प्रसंगामुळें चक्रधरानें महाराष्ट्र समूळ नाश पावेल असा शापच दिला. कारण महानुभावांचा द्वेष केल्यावर ईश्वर या राष्ट्राचा अभिमान सोडील व " ईश्वरें अभिमान सांडलेया तें राष्ट्र समूळेंचि नासतें पावें, ऐसें भवीष्य सांघीतलें. "

( सूत्रपाठ विचारप्रकरण )

महानुभावांनीं चातुर्वर्ण्यावर केलेले आघात हें महानुभावांच्या द्वेषभावाचें अतिशय महत्त्वाचें कारण भावे यांनीं दिलें आहे. यामुळें समाजांतील वरच्या वर्गांतहि महानुभावांविषयीं अनादर माजला. चातुर्वर्ण्य हा महाराष्ट्राचा अतिशय जिव्हाळ्याचा विषय आहे. त्याच्यावर आघात करणाराची गय होणें शक्य नाहीं. मग तो कितीहि थोर असो !

प्रवर्तकाचें व्यक्तित्व हें कोणत्याहि पंथाचें मुख्य सामर्थ्य असतें. ज्ञानेश्वरादिकांच्या पुढें महानुभावाच्या प्रचारकाचें व्यक्तित्व फारच दुबळें ठरतें ! इतरांना आदर्श होण्याऐवजीं लोकांच्या आदर्शविषयक भावनांना धक्के दिल्यासारखें वर्तन चक्रधरादिकांचें होत गेलें

परंतु चातुर्वर्ण्यउच्छेदाविषयीं या पंथाचा कटाक्ष होता असें दिसत नाहीं. य. खु. देशपांडे सागतात: ' चक्रधराच्या शिष्यवर्गात संन्यासहि न न घेतलेले आणि चातुर्वर्ण्य पाळणारे, वेदाविहित कर्म करणारे, इतर वर्णांचें अन्नहि न घेणारे बरेच शिष्य होते.

( भिक्षेबद्दल जातगोत न पाहता चारहि वर्णांकडून भिक्षा स्वीकारावी अशी चक्रधराची आज्ञा होती. )

महानुभावांविषयीं महाराष्ट्रांत तीव्र अनादर निर्माण होण्याची मीमांसा अशी आहे. पंथांतील व्यक्तींच्या वैयक्तिक आचरणानें समाजांत अनादर निर्माण झाला असला तरी त्यांनीं मराठी वाङ्मयांत घातलेली भर आणि त्यांचें तत्त्वज्ञान हीं उपेक्षणीय तर नाहींतच. उलट वाङ्मयाच्या दृष्टीनें मराठी वाङ्मयाची त्यांनी समृद्धिच केली. आज त्याचें इतक्या दिवस दडलेलें वा दडाविलेलें वाङ्मय बरेंचसें सुगम स्वरूपांत प्रकट झालें आहे. त्यावरून त्यांच्या वाङ्मयकार्याचें स्वरूप स्पष्ट दिसतें. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकास तें वाङ्मय स्वागतार्हच आहे.

" महानुभावपंथांत इतरांस न रुचतील अशा काहीं बाबी अवश्य असतील. नव्हे आहेतच; पण तेवढ्यासाठीं त्या पंथाचें वाङ्मय एकजात त्याज्य समजण्याइतकी संकुचित बुद्धि दर्शविणें कितपत इष्ट आहे ? महानुभाव वाङ्मयाचें ऋण कुणी कितीहि नाकारलें तथापि त्यांचें गद्यग्रंथ-विषयक ऋण सहजासहजीं नाकारतां येण्यासारखें खचित नाही. "

( वा. ना. देशपांडे स्मृतिस्थळ प्र. २७ )

विरोधकांपासून आपलें वाङ्मय सुरक्षित ठेवण्याच्या हेतूनें असो वा अन्य हेतूनें, असो नागदेवाच्या नंतर सांकेतिक लिपींत लेखनास आरंभ झाला. आधी दोन लिप्या शोधून काढण्यांत आल्या. त्या म्हणजे सकळ लिपी आणि सुंदरी लिपी.

शके १२७५ मध्यें रवळो व्यास यानें सकळ लिपी काढली. शके १२८५ सुंदरी लिपी निघाली. यानंतर पारमांडल्य, वज्रलिपी, अंकालिपी, सिंहलिपी, इत्यादि लिप्या निघाल्या. अशा एकंदर २५ लिप्या निघाल्याचें य. खु. देशपांडे यांच्या आढळांत आलें. परंतु बहुतेक ग्रंथ सकळ लिपींतच आहेत.

या सांकेतिक लिप्यांचा उपक्रम इतका प्रभावी झाला की, आज सरळ देवनागरी लिपींतील महानुभाव ग्रंथ सहसा उपलब्ध होत नाहीं.

सांकेतिक लिपीचा थोडासा परिचय होण्यासाठी तुलनात्मक आराखडा पहा:

| बाळबोध | सकळी | सुंदरी | पारमांडल्य |
|---|---|---|---|
| अ | स | अ | त |
| आ | सा | आ | ता |
| इ | षि | उ | दि |
| क | य | न | १ |
| ग | ळ | ज | ५ |
| झ | भ | फ | रु |
| ट | त | ठ | ३ |
| क्ष | उ | ज्ञ | झ |

या सांकेतिक लिपीच्या उपक्रमानें वाङ्मयाच्या अभ्यासकांस एक प्रकारें मोठा फायदाच झाला. मूळ ग्रंथ भाषादृष्ट्या बरेचसे मूळ स्वरूपांत उपलब्ध होणें हा तो फायदा होय. य. खु. देशपांडे म्हणतात: " मला सर्वांत जुनी मिळालेली पोथी शके १४९८ मधील सकळ लिपींतील आहे. " भास्करकृत एकादशस्कंद म्हणजे उद्धवगीता या ग्रंथाची ती पोथी आहे. यामुळें निदान श. १४९८ त मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें हें कळण्यास तें एक महत्त्वाचें साधन उपलब्ध झालें. ही पोथी महानुभाव पंथीय महार गृहस्थाच्या संग्रही होती ही गोष्टहि बरीच उद्बोधक नाहीं का ?

महानुभाव वाङ्मयाचे पंथीय व पंथाबाहेरील अभ्यासक महानुभावीय वाङ्मय बाळबोध लिपींत प्रकाशित करूं लागले आणि मराठी वाङ्मयांतील हें अज्ञात दालन खुलें झालें.



# महानुभाव वाङ्मय

महानुभाव वाङ्मयांतील ग्रंथांपैकीं **सात ग्रंथ** अतिशय महत्त्वाचे मानले जातात. ते :

१ शिशुपालवध ( भास्कर ) शके ११९५
२ उद्धवगीता अथवा एकादशस्कंध (भास्कर) शके ११९६
३ वत्सहरण ( दामोदर पंडित ) शके १२००
४ रुक्मिणीस्वयंवर ( नरेंद्र ) शके १२१३
५ सह्याद्रिवर्णन ( रवळो उर्फ राघो व्यास ) शके १२२४
६ ज्ञानप्रबोध ( पंडित विश्वनाथ ) शके १२५३
७ ऋद्धिपुरवर्णन ( नारायणपंडित ) शके १२८५

हे सातहि ग्रंथ ओवीमध्यें रचिलेले आहेत.

या ग्रंथांचें स्वरूप पाहिल्यास एकंदर ग्रंथभांडारांतून याचीच निवड कांहीं विशेष कारणामुळें झाल्याचें दिसत नाहीं. हे कालानुक्रमें पहिले सात आहेत असेंहि नाहीं. त्यांतले तीन तर स्पष्टपणें आख्यानक कवितेसारखे आहे. चक्रधराचें, महानुभावाचें तत्त्वज्ञान यांतील कोणत्याहि ग्रंथांत पूर्णपणें संकलित झालें आहे असेंहि नाहीं. परंतु 'साती ग्रंथ' म्हणून वरील ग्रंथांचा उल्लेख होत असतो.

परिचय पुढें करून दिला आहे.

चक्रधरानें एकहि 'ग्रंथ' असा लिहिला नाहीं. त्याची वाङ्मयीन रचना म्हणजे शके ११८६ मध्यें पैठण येथें गणपतमठीं गायिलेली एक चौपदी. उपलब्ध आहे. ती चौपदी योगाचरणावर आहे.

चक्रदेवाचे पट्टशिष्य नागदेवाचार्य यांची धाकटी बहीण उमांबा हिचीहि एक चौपदी याच सुमाराची आहे ( महानु. म. वा. पृ. १२ )

## लीलाचरित्र ( इ. स. १२६० )

श्रीचक्रधरानें वेळोवेळीं केलेला उपदेश, त्याच्या जीवनांतील 'लीला,' महींद्रभट उर्फ माहींभट्ट यानें संकलित केल्या. तो ग्रंथ '**लीलाचरित्र**' या नांवानें प्रसिद्ध आहे.

कालानुक्रमानें पाहतां आज उपलब्ध असलेल्या ग्रंथांत **लीलाचरित्र** हा ग्रंथ महानुभाव वाङ्मयांतील पहिला ग्रंथ आणि **मराठींतील पहिला चरित्रग्रंथ** असें म्हणतां येईल.

महींद्रभट उर्फ माहींभट्ट हा अतिशय विद्वान् होता. तो अहमदनगर जिल्ह्यांत सारोळा या गांवचा राहणारा. त्यानें वादविवादांत अनेक पंडितांस जिंकलें होतें. 'आकाशांत प्रभाकरसूर्य व पृथ्वीवर मी विद्यासूर्य' असें त्यास वाटूं लागलें. एकदां देगांव गांवाकडे जात असतां वाटेंत चक्रधराची गांठ पडली. चक्रधराशीं वाद करीत असतां महींद्रभट्टाचा गर्व मावळला आणि त्यानें चक्रधराचें शिष्यत्व स्वीकारलें. चक्रधराच्याच प्रत्यक्ष सेवेंत त्यानें आपलें राहिलेलें आयुष्य घालविलें.

**लीलाचरित्रां**तील लीलांचें संकलन इ. स. १२६० मध्यें झालें. महीभटानें जागोजाग हिंडून आणि चक्रधराच्या सहवासांत आलेल्या अनेक व्यक्तींना भेटून या लीला गोळा केल्या. लीलांतील विविधस्थळीं व विविधप्रसंगीं चक्रधराच्या तोंडून जे उद्गार निघाले असतील त्यांचा 'शोध' करून ते शब्द लीलांत नमूद करण्याची कसोशी **लीलाचरित्रांत** घेतली आहे. जेथें चक्रधराच्या उद्गारांबद्दल निश्चितपणा आढळला नाहीं तेथें इतरांनीं सांगितलेले उद्गारहि नमूद केले आहेत. हा संग्रह नंतर नागदेवाचार्य यांस दाखवून माहींभटानें अधिकृत म्हणतां येईल असा पाठ तयार केला. तेंच आज उपलब्ध झालेलें **लीलाचरित्र** होय.

या ग्रंथांत चक्रधराच्या १५०९ लीला किंवा कथा दिल्या आहेत. या कथांतून चक्रधराच्या उपदेशाचीं सूत्रेंहि आलीं आहेत. चक्रधराच्या चरित्राचे एकंदर ४ काल पाडले आहेत. **लीलाचरित्र** या ग्रंथांत

तत्कालीन मराठी गद्याचें स्वरूप दिसून येतें. लहान लहान वाक्यें, समर्पक अशा मोजक्या शब्दांची सहज झालेली योजना, इत्यादि गुण-विशेष या गद्यांत आढळतात.

लीलाचरित्राचें बाळबोध स्वरूप पुढील एका लीलेवरून लक्ष्यांत येईल. पुढील लीलेत उल्लेखिलेला महादेव म्हणजे देवगिरीचा महादेवराय होय. आणि बाइ म्हणजे आद्य मराठी कवयित्री, चक्रधराची शिष्या महदंबा उर्फ महदाईसा ही होय. चक्रधर तिच्याशीं विशेष संवाद करीत. यावरून तिची योग्यता दिसून येते.

तथा गमन ॥ एकु दीस रायें आइत केली : गोसावीयाचेया दरिसना निगाला : तंव पाटाचा हाति पडिला : तथा भेला : तो अपशकुन जाला : म्हणौनि परतला : तथा प्रतविला : पाल्हा डांगीया आला : तेणें सांगितलें : जी जी : रावो येत होता : तवं हाती पडीला : मग रावो परतला : एकु दीस : मागौता रावो नीगाला : तवं पाउसू पडीला : मग मागौता परतला : तिसरिये वेळे : रावो निगालाचि : सर्वज्ञें म्हणितलें : बाद : महादेवो पात्र : एथीचेया दर्शना एइल : राज्य संपादील : आपण सेवक होउनि वर्तैल :..................

( लीलाचरित्र पूर्वार्ध लीला ४४ )

लीलाचरित्रांत ऐतिहासिक व सामाजिक दृष्टयाहि कांहीं महत्त्वाचे उल्लेख आहेत. उदा० भिल्लम यादव देवगिरीस येण्यापूर्वी श्रीनगर ( सिन्नर जि. नाशिक ) येथें रहात होता. कन्हर उर्फ कृष्णदेव यादव आपला मुलगा महादेवराय यांसह चक्रधराचे भेटीस लोणार ( जि. बुलढाणा ) येथें आला. चक्रधरानें गांवोगांवीं संचार केला आणि तेथील सर्वसामान्य जनतेस त्यानें उपदेश केला. त्यामुळें त्यांना समजेल अशा सोप्या भाषेंत त्यांच्या दैनंदिन जीवनांतील प्रसंगांच्या आधारें सर्व विवेचन तो करी. तत्कालीन सामाजिक चालीरीती या प्रसंगांत व्यक्त झाल्या आहेत.

**दृष्टांतपाठ** ( इ. स. सु. १२७० )

चक्रधरानें वेळोवेळीं आपल्या उपदेशांतील तत्त्वाच्या स्पष्टीकरणार्थ जे दृष्टांत दिले त्यांचें संकलन या ग्रंथांत केलें आहे.

हा ग्रंथ केशव व्यास उर्फ केशिराज बास यानें रचला. कन्हरदेवराय जाधव यांचे अनंतभट्ट नांवाचे कोषाधिकारी होते. त्याना दोन मुलें होतीं. गोपाळ व केशव उर्फ केशिराज. केशिराजाच्या अंगीं लहानपणीच वैराग्य बाणलें. वडिलांनी विवाह करून दिला तरी केशिराजाची वृत्ति पालटली नाही. शेवटी पत्नीनेंच सांगितलें की, ' आतां हे योगिये जाले ! '

केशिराजानें नागदेवाजवळ राहून त्याची मर्जी संपादन केली. तो मोठा संस्कृत पंडित होता. लीलचारित्रांतील लीलांचा त्यानें संस्कृत अनुवाद केला. नागदेवानें शाबासकी दिली. म्हणून त्यांनें आणखी संस्कृत रचना करण्याची इच्छा व्यक्त केली. त्या वेळीं नागदेव म्हणाला : " माझिया म्हातारिया नागवतील " बायाबापड्यांचा उद्धार संस्कृत रचनेनें कसा होणार ? दुसऱ्या एका प्रसंगी, केशिराज बोलतां बोलतां 'अस्मात् तस्मात्' करूं लागले तेव्हां नागदेव म्हणाला : तुमचा 'अस्मात् कस्मात् नेणो : मज चक्रधरें निरूपिली मऱ्हाटी तियाचि पुसा. यापुढें केसोबा संस्कृतबंध न करीतीचि ! '

बायाबापड्यांना आपलीं तत्त्वें, सिद्धांत सुगम व्हावेत यासाठींच स्वतः चक्रधर अतिशय उद्बोधक दृष्टांत देत असे.

**दृष्टांतपाठ** या ग्रंथांत प्रत्येक दृष्टांताचे तीन भाग आहे. उद्धरण सिद्धान्त अथवा सूत्र, नंतर त्याचें स्पष्टीकरण करणारा दृष्टांत आणि शेवटीं या दोहोंचें सार सांगणारें दार्ष्टांतिक. सूत्र आणि दृष्टांत हा चक्रधरोक्त असा भाग आहे. भावे म्हणतातः ' सूत्रांवर स्पष्टीकरणार्थ ११४ दृष्टांत केशवराज सूरींनें सांगितले आहेत ( म. सा. १-१०५). केशिराजाचा भाग म्हणजे प्रत्येक दृष्टांताच्या शेवटीं दिलेलें दार्ष्टांतिक होय.

असे ११४ दृष्टांत **दृष्टांतपाठां**त आहेत.

**ग्रंथरचनेचें स्वरूप पुढील एका दृष्टांतावरून कळेल.**

११२ **शरणागताचा दृष्टांत. सूत्र** : परमेश्वरू ज्ञानियासी अनिष्टनिवृत्ती करीति ।। १ ।। **दृष्टांत**—कव्हणी शरणागत मरणाभेण रामासि शरण रीगे। रावो तयातें पाठीसी घाली: मरणासि राखे परि राज्य नेंदि । राज्य ते पुत्रासीचि दे ।। ( एवढा भाग हा श्रीमुखांतील म्हणजे चक्रधरोक्त आहे. यापुढें केशीराजाचें भाष्य म्हणजे दार्ष्टांतिक असें : )

**दार्ष्टांतिक**—तैसे परमेश्वरू सकळ देवता-मळ कर्मापासौनि वेगळा करीति : परि राज्य तें भक्तासीचि देति ।।

**लीळाचरित्र व दृष्टांतपाठ** यांतून चक्रधरांचीं सिद्धान्तसूत्रें निवडून तीं सूत्रपाट म्हणून स्वतंत्रपणें संकलित करण्यांत आलीं आहेत. सूत्रपाठावर चक्रधर शिष्यांनीं भाष्यें रचिली.

केशवराजांनीं दार्ष्टांतिक भागांत मूळ सूत्र व दृष्टांत यांवर विशेष 'भाष्य' असें फारसें केलें नाहीं. मुळापेक्षा जास्त विस्तार केल्याचीं फार थोडीं ठिकाणें आहेत. ( उदा० दृष्टांत १४ डोळेयाचा दृष्टांत; दृष्टांत ४० सुरीयेचा दृष्टांत ) एकाद्या ओळींतच दार्ष्टांतिक संपावें अशींहि कांहीं स्थळें आहेत. दार्ष्टांतिकात पुष्कळसा भाग सूत्र व दृष्टांत यांचें सारसर्वस्व सांगितल्यासारखा आहे.

केशिराजानेंच दृष्टांतपाठावर एक लापणिका लिहिली आहे. तीमध्यें चक्रधराच्या सूत्रांतील आशय दिला आहे. चक्रधराच्या तोंडून निघालेल्या वचनांची अनेकांनीं अनेक प्रकारें अशा रीतीनें मांडणी, चर्चा, सार सांगून त्याचा उपदेश जिवंत राखण्याचा प्रयत्न केला.

दृष्टांतांतून तत्कालीन ग्रामीण जीवन ( २८-२९-४१-४९ ) शहरी जीवन ( ८-१०-१६-३६-५७-५८-७२-७३-७४-७७-७८-८१) यांची ओळख होते. परमेश्वराविषयींच्या आर्ततेची ओळख करून देण्याच्या निमित्तानें स्त्रीजीवनांतील विरह आणि प्रेम या भावनांचा आविष्कार दृष्टांतांतून झालेला आहे. विवाहबाह्य प्रेमाचेहि उत्कटतेच्या आविष्कारासाठीं दृष्टांत दिलेले आहेत. मातेच्या ठिकाणचें वात्सल्य आणि स्त्रीजीवनांतील विशेष प्रभावी वृत्ति मुमुक्षूच्या ठिकाणीं असाव्यात असें तत्संबंधींच्या दृष्टांतांतून मुद्दाम सांगितलें आहे.

दृष्टांतपाठांतील चक्रधरोक्त भागांत भाषावैभवापेक्षां भावनेची समृद्धि प्रभावी आहे. अवतारी परमेश्वरास जीवांचें उद्धरण करण्याचें व्यसनच असतें. त्याच्या अंतःकरणाची कोवळीक या दृष्टांत सांगण्याच्या पद्धतींत व्यक्त झालेली आहे. त्याचप्रमाणें आर्त मुमुक्षूच्या अतःकरणास लागलेली साक्षात्काराची हुरहूरहि या ग्रथांत व्यक्त झालेली आहे.

श्रीमुखोक्त **सूत्रें** व दृष्टांत **लीळाचरित्रांत** आलेच आहेत. **दृष्टांतपाठांतला** हा चक्रधरोक्त भाग व पुढील केशिराजाचा भाग यांत अर्थात् वाङ्मय-गुणाच्या दृष्टीनें अंतर पडणें अपरिहार्य होतें. केशिराजाची भाषा संस्कृत-संस्काराची पंडितप्रिय आहे. चक्रधरोक्त भागांत पारिभाषिक शब्दादि पांडित्याचा भाग सहसा आढळत नाहीं.

**चक्रधर-सिद्धांतसूत्रें** ( इ. स. १२७२ ते १३०३ )

लीळाचरित्रांत लीळांच्या बरोबर चक्रधराचीं सूक्तासारखीं जीं वचनें आलीं त्याचें संकलन गोपाळ पंडित उर्फ आनेराज बास आणि केशव बास या भावांनीं केलें. हें संकलन चक्रधरनिर्वाणानंतर इ. स. १२७२ ते इ. स. १३०३ या कालांत झालें. एकूण १८६२ सूत्रें संकलित केलीं आहेत. [ च. सि. सू. ( भवाळकर नेने ) उपोद्घात पृ. ४ ] तीं महानुभावांना वेदवाक्याप्रमाणें प्रमाण वाटवींत हें साहजिकच आहे. नागदेवाचार्य त्यांस ' शास्त्रवचनरूप परमेश्वरू ' म्हणत असत.

चक्रधर-सिद्धांतसूत्रांत परमेश्वर, देवता, धर्म, आचार, परमेश्वर-प्राप्तीचे विविध मार्ग, इत्यादि विषय आले आहेत. युगधर्म, विद्यामार्ग, संहार, संहरण, महावाक्य, इत्यादि प्रकरणें आहेत. आचार, आचार-मालिका, विचारमालिका, हीं प्रकरणें २००-२५० सूत्रांचीं आहेत. पहिलीं प्रकरणें केवळ सिद्धांतपर अशीं १५-२० सूत्रांची आहेत.

परमेश्वर आणि देवता हीं निराळीं आहेत. धर्म व आचार यांच्या साधनांनींहि ईश्वरप्राप्ति होत नाहीं. परमेश्वरें परमेश्वरू पाविजे. ईश्वर-स्वरूपाचें निर्वचन केल्यावर परमेश्वरप्राप्तीचा मार्ग सांगितला तो असा—

विकारविकल्पु शुन्यु : स्वभावमात्रें : निरालंबी; देवतास्मरणें जो जन्म क्षेपी तेयासि परमेश्वरू पुनरपि आपुला सबंधु देति.

परमेश्वरी कृपा कशी होत जाते हें उद्धरण प्रकरणांत सांगितलें आहे.

ज्ञान हेंच अज्ञानाचें एकमेव मोचक यावर चक्रधरांचा कटाक्ष आहे.

सूत्रांत जी अल्पाक्षरांत सारवत्ता लागते तिची खालील सूत्रांवरून कल्पना येईल :

माया जीवातें विकरे संचरे बीए प्रसवे हालवी डोचली उगळी लोटी ( १६–४ )

अनुसरलेयांचें आगंतुक कुंडे : अनारब्ध मुके : प्रारब्धा भोगीं अयो ( २५–४ ).

स्वदेशसंबंधु ज्याज्य : स्वग्रामुसंबंधु त्याज्य संबंधियांचा सबंधु : तो विशेषतां त्याज्य ।।१।। संबंधीं अधिकारु नाहीं ।।२।। संबंधीं विकारु : विकारी रसु: रसीं अभिमूप्र: सेवा निवृत्ति ।।३।। —आचार प्रकरण

## शिशुपालवध ( —इ. स. १२७३ )

सांसारिक रसिकांना अतिशय प्रिय असा हा ग्रंथ भास्करभट्ट बोरीकर यानें लिहिला. भास्करास कवीश्वराचार्य म्हणतात. तशाच तोलाचें त्याचें कवित्व आहे.

भास्कराचा जन्म निजामप्रांतीं कासारबोरी येथें झाला. पैठण येथें थोडें अध्ययन झाल्यावर तो काशीस गेला. तेथून परत येत असतां तो सरकारी अधिकाऱ्यांच्या अवकृपेमुळें उज्जनीस तुरुंगात पडला. तेथून त्याची चक्रधरकृपेनें सुटका झाली आणि तो चक्रधराच्या चरणीं लागला. चक्रधराच्या सहवासांत तो गुरुबंधूंच्या बरोबर राहूं लागला. तरी त्याची मूळची रसिकता आणि कवित्व आपला प्रभाव दाखवीत राहिलीं. त्याचें कवित्व शिशुपालवधांत पूर्णपणें प्रकट झालें.

महानुभाव पंथांत न बसण्यासारखा हा ग्रंथ आहे. ग्रंथ पूर्ण झाल्यावर भास्करानें तो आपल्या गुरुबंधूस-भावेदेवव्यास यास—दाखविला.

त्या वेळीं भावेदेवव्यास म्हणाला, 'हा ग्रंथ निका जाला असे. परि निवृत्ता जोगा नव्हेचि : हा शृंगारिया प्रवृत्तांजोगा असे.'

भावेदेवव्यासाच्या या अभिप्रायात शिशुपालवधाचें वर्णन अगदीं बरोबर आलें आहे. कवीनें या ग्रंथाच्या आरंभीं या ग्रंथाविषयींची आपली भावना व आत्मविश्वास व्यक्त केली आहे.

साहित्याचिये सेजे । बोलाचा रंगू उपलविजे । तैसें काव्य कीजे । म्हणे कवी भास्करू ॥ साहित्याचिया खेडकुळिया । सुदेशियां बोलाचियां चिपुळिया । सिंपणें खेळती सावलिया रसवृत्तीसी । पुनवाचा रसाळा । गर्व सांडवीन कोकीळां । कलहंसा अबकळा करीन मी ।

अशा प्रतिज्ञेनें भास्करानें आरंभ केला. शिशुपाल वधी कथा । भक्तिरसाची त्रिपथा । मुक्तिवनितेची दूतिका । ज्ञानाजनाची शलाका । असें त्याला वाटलें खरें. परंतु शेवटीं प्रत्यक्ष काव्य रचतांना त्याची अभिजात रसिकताच प्रभावी ठरली. मुक्तिदायक ज्ञानापेक्षां जीवनदायक शृंगारवीरादि रसांचाच परिपोष काव्यांत झाला. त्यांतल्या शृंगाररसाच्या विविध अवतारांचें मनसोक्त सेवन रसिकांस शिशुपालवधांत लाभतें. एकूण १०८७ ओव्यांपैकीं वीररस फक्त शेवटच्या २०० ओव्यांत आहे.

तरी कवी शेवटीं म्हणतोः— हा शिशुपाळवधू । आइकतां तुटे भवबंधू ।

परंतु हा आपला शिष्टसंप्रदायच झाला. देवादिकांच्या विशेषतः कृष्णाच्या कथांच्या निमित्तानें मनमुराद रसास्वाद घ्यावा आणि शेवटीं समारोपांत 'भवबंधू तुटे' असें सांगून मोकळें व्हावें ही आख्यायिका, कवितांतील रूढि भास्करापासून तर सुरू झाली नाहीं ना ? रुक्मिणीची कृष्णभेटीविषयींची आतुरता वर्णन करतांना भास्करानें जें कवित्व केलें तें वाचून पांगारकर म्हणतातः "उच्च संस्कृतीला हा विनोद शोभण्यासारखा नाहीं. तशांत कृष्णरुक्मिणी म्हणजे उपास्य देव ! मायबापांचा शृंगारविनोद वर्णन करणें हा दोष."

म. वा. इ. १-४३४.

परंतु भास्करानें श्रीकृष्ण आणि रुक्मिणी यांचें इतकें बेमालूम मानुषी-

करण केलें आहे कीं, त्या व्यक्तींविषयींच्या देवत्वाच्या भावनांची आठवणहि होत नाहीं. वरील निषेध व्यक्त करण्यापूर्वी स्वतः पांगारकरांनींच शिशुपालवधाचे रसाळ असे उतारे विस्तारपूर्वक दिले आहेत. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं प्रदीप्त झालेली प्रणयोत्कटता कवीनें रुक्मिणीच्या भावनेइतक्याच सूक्ष्मपणें रंगाविली आहे. श्रीकृष्णाचें स्वरूप वर्णन करतांना एकदम भव्य दिव्य असें वातावरण निर्माण होतें. परंतु त्याच्या तोंडीं घातलेले उद्गार एकदम भवलोकींच्या माणसासारखे वाटतात! स्वर्गीय आणि मानवी यांचें असें येथें मिश्रण झालें आहे. कैवल्याचा पुतळा खरा; पण त्यानें मायावेष धरिल्यावर तें काम बरोबर वठलेंच पाहिजे! रुक्मिणीशीं एकांतात नर्मविनोद करणाऱ्या रसिक श्रीकृष्णाचें रूप म्हणजे त्याला पाहून—पुरुषा उपजती डोहाळे। कामिनीपणाचें। पण तो श्रीकृष्ण कांटिया कांटी झाडावी अशा निश्चयानें ज्या वेळीं शिशुपालवधासाठीं निघाला त्या वेळीं तो पुरुषसिंह आहे. त्या प्रसंगीं युद्धाच्या तयारीचें, सैन्य, रणवाद्यें, इत्यादिकांचें वर्णन करतांना भास्कराच्या लेखणीची भरारी कांहीं निराळीच! साता पाताळाचे दरे। थरथरताती असा रणकर्कश तेथें आहे. त्या वर्णनांतले शब्दसुद्धां रणवाद्यासारखा खणखणाट करणारे आहेत. पण लढाईची धामधूम आटोपल्यावर श्रीकृष्णाच्या विरहानें घायाळ झालेलें अंतःपुर आलें आणि सोळा सहस्र अंतःपुरांतले उपचार वर्णन करतां करतां—स्थळ होईल अपार। तरि रसु आवरे ना। असें कवीस झालें!

शिशुपालवध झाला, श्रीकृष्ण विजयी झाले आणि त्यांना अग्रपूजेचा मान मिळाला. काव्याचा शेवट अशा रीतीनें वीररसपूर्ण अशा २०० ओव्यांनीं झाला आहे.

शिशुपालवधाबद्दल नागदेवाचार्यांनीं सौम्य शब्दांत कानउघाडणी केली आणि भास्कराचें मन खट्टू झालें! पण नागदेवाचार्यांबद्दल त्याला विलक्षण आदर होता. म्हणून 'निवृत्ताजोगा' ग्रंथ लिहिण्याचें त्यानें ठरविलें. तो ग्रंथ म्हणजे उद्धवगीता. यापुढें त्यानें आपलें मन अशाच निवृत्तिपर ग्रंथलेखनांतच गुंतविण्याचा कठोर निश्चय केला.

**उद्धवगीता**— ( इ. स. १२७५ )

भागवतांतील एकादश स्कंधांत उद्धवास केलेला हा उपदेश भास्करानें ८२७ ओव्यांत सांगितला आहे. काव्याच्या आरंभीं काव्य आणि रसिक यांचें माहात्म्य अतिशय कल्पकतेनें वर्णन केलें आहे. त्यांत पुन्हां यादवकुळ तिळकासारखा विषय ! रसिकांना विनंति करण्याची जरूरच नाहीं ! ते आपोआप धांवत येतील आणि रसिकाला पाहून कवित्वास भरतें येणारच ! भास्कराचा हा विश्वास साधार आहे. शिशुपालवधानें त्यानें तें सिद्ध केलेंच ! पण उद्धवगीतेंत त्याच्या रसिकतेची गळचेपी झालेली दिसते. विरक्तासाठीं लिहिण्याचें व्रतच तर घेतलें. एक प्रकारें तें 'शिशुपालवधा' चें प्रायश्चित्त होतें. वैराग्यास अनुकूल म्हणून पुरुरवा-उर्वशी अशी कथा मिळाली आणि पुरुरव्यास उर्वशीनें ढकलून दिल्यावर त्याला जो संताप आला त्यात स्त्री 'निंदेस कवीला भरपूर वाव सांपडला ! स्त्री म्हणजे : कपटाची, कसवटी, अनृत्याची माहावटी, उकलली पुटी, महाभुजंगाची, पापाची उत्तरवेढ, नरकाची राजवाट !

पण तिची कांती तरी–?

मांसापिंडा भवंती वोरवरिली फाटकिया कांती ! लोक जिला रमणी म्हणतात ती म्हणजे श्लेष्मयांचा बांधा ! कैसें जग विडंबिलें ! हें सगळें निघालें कशावरून ? तर उद्धवास श्रीकृष्णाच्या वियोगाचें दुःख झालें तें पाहून श्रीकृष्णानें पटविलें कीं, वियोग हा मोहाचा, आसक्तीचा परिणाम ! संसार असा मोहमय आहे. त्यांत स्त्रिया म्हणजे कपटाची कसवटी !

श्रीकृष्ण निजधामास जाणार हें ऐकून उद्धवास झालेलें विरहाचें दुःख व कृष्णानें केलेलें सांत्वन या प्रास्ताविक भागाचा विस्तार २५० ओव्यांत केला आहे. पुढें २५० ओव्यांत दत्तात्रयानें केलेल्या चोवीस गुरूंचें वर्णन आहे. या वर्णनांत ऋष्यशृंगाची कथा कवीनें पदरची घातली आहे. पिंगळेचा पुरुषामुळें अधःपात झाला या मुळांतील कथा-भागास ही पुस्ती जोडून स्त्रीहि पुरुषास अधोगतीस नेते हें ऋष्यशृंग-कथेनें दाखविलें आहे.

दोन्ही कथा देऊन कवीनें समारोप केला कीं, एवं उभयविध साधनवंतांसीं एकेक विघ्नत्व असे ऐसें जाणावें !

'मूळ एकादशाचें तात्पर्य एकीकडे आणि हें भास्कर काव्य दुसरीकडे !' ( पांगारकर म. वा. इ. १-४४२ ) असें येथें झालें आहे.

संसारपाशाचें उदाहरण म्हणून कपोताची कथा सांगितली आहे. आपलीं पिलें जाळयांत अडकलेली पाहतांच आईनें जाळयांत आपणहून उडी घातली आणि तिच्या मागोमाग बापानेंहि उघड उघड मृत्यूच्या दाढेंत-त्या जाळयांत उडी घेतली ! या कथेंत कपोतकपोतींची भेट, सहवास, ओढ, इत्यादि संसारपूर्व चित्र व नंतर संसारांत ओढवलेला हा दारुण प्रसंग हे भाग अतिशय उत्कटपणें रंगविले आहेत. परंतु वात्सल्याचें इतकें उत्कट उदाहरण मायापाशाच्या निषेधास कसें लागू पडणार ?

**स्त्रिये अधीन ये संसारीं ।**
**कवण नव्हे ?**
**बाप ! मोहाचा फांसा । कवणातें न बद्धी ?**

हें भाष्य या कथेस विसंगतच वाटतें.

**वीचाराचीये कडाडी । घालुनि वैराग्याची**
**करावी कोरडी । या कलेवराची ( २०० )**

शमदमादिकांचा चेंदामेंदा केला कीं मग श्रीकृष्ण म्हणतात,

**ब्रम्हसाक्षात्कारीं रीगावां । तुज मी करीन**

भास्कराच्या मनांत शिशुपालवधाविषयीं नागदेवाचा अभिप्राय ऐकून आलेली चीड उद्धवगीतेंत व्यक्त होत आहे असें वाटतें ! परंतु संसाराचा उबग येण्यासाठीं वर्णन करतांनाहि कवीचें कवित्व प्रगट झालेंच आहे. भास्कर हा हाडाचा कवीच ! तत्त्वज्ञानप्रचारांत तो तितका रमूंच शकत नाहीं असें दिसतें.

संस्कृतांतील कथांचे अनुवाद हेतुपुरस्सर करीत असतांहि कवीची मूळची वृत्ति, त्याचें व्यक्तित्व त्यांत कसें प्रगट होतें व प्रभावी ठरतें याचें भास्करभट्ट हे मराठी वाङ्मयाच्या आरंभकालांतलें उदाहरण आहे.

रुक्मिणीस्वयंवरकथा हा अनेक कवींचा अतिशय आवडता विषय आहे. अनेकांनीं या कथेचे अनुवाद केले. आणि या एकाच कथेच्या अनुवादांत अनुवादकांच्या वृत्तिभेदामुळें विविधता आली आहे. शिशुपालवधाच्या शेजारीं एकनाथाचें रुक्मिणीस्वयंवर ठेवून पाहिल्यास हें स्पष्ट दिसतें.

उद्धवगीतेनंतर भास्करानें चक्रपाणिचरित्र, दत्तात्रयचरित्र, गीताटीका हे गद्यग्रंथ आणि पूजावसर, ईशस्तुति, विरहाष्टक असे पद्यग्रंथ लिहिले. ईशस्तुतींतील श्लोक निर्यमक आहेत. मराठींतील अनेक वृत्तात्मक पद्यश्लोकरचेनचा आद्य मान महानुभावपंथी ग्रंथकारास देणें योग्य व अवश्य आहे ( म. सा. १–९२ ).

## वच्छहरण ( इ. स. १२७८ )

महानुभावांनीं विशेष मानिलेल्या सात ग्रंथांपैकीं हा एक ग्रंथ आहे. या ग्रंथाचा कर्ता दामोदर पंडित हा होय. तो केशवराजाचा आप्त होता. दोघांचे स्नेहसंबंध इतके जिव्हाळयाचे होते कीं, त्यांनीं आपापल्या ग्रंथांत एकमेकांचें नांव कर्ता म्हणून नमूद केलें आहे. वच्छहरणांत केशवराजाचें व केशवराजाच्या रत्नमालास्तोत्रांत दामोदरपंडिताचें नांव आहे.

दामोदरपंडित हा अतिशय विद्वान् होता. त्याला संगीताची अतिशय आवड होती. दामोदरपंडिताच्या पत्नीनें महानुभाव पंथाची आधी दीक्षा घेतली. नंतर कांहीं दिवसांनीं दामोदरानें शके ११९४ त महानुभाव पंथ स्वीकारला. नागदेवानें त्यास गायनाची बंदी केली होती. परंतु त्याच्या तोंडून ईशस्तुतिपर असें एक पद ऐकत असतां नागदेवाचार्यहि सद्गदित झाले आणि त्यांनीं दामोदरपंडितास गायनास परवानगी दिली.

बच्छहरण हा ग्रंथ ५०५ ओव्यांचा आहे. भागवताच्या दशमस्कंधांतील १२,१३ व १४ अध्यायांच्या आधारावर तो रचिला आहे. दशमस्कंधांत १२ व्या अध्यायांत असुरवधाची आणि १३ व १४ व्या अध्यायांत वत्सहरणाची कथा आहे. या कथानकावरचें हें पहिलें काव्य होय ( प्रा. द. सी. पंगु : बच्छहरणप्रस्तावना ).

दामोदर पंडितांचें देहावसान शके १२०० मध्यें झालें. यावरून श. ११९४ ते १२०० या काळांत बच्छहरणाची रचना झालेली असावी.

या लहान काव्यांत विशेषतः वर्णनात्मक असे पुष्कळ चांगले भाग आहेत. श्रीकृष्णाच्या स्वरूपाचें वर्णन अतिशय कल्पकतेनें विस्तृत केलें आहे. वृंदावनाचें व कालिंदीचें वर्णनहि असेंच आकर्षक झालें आहे. या बरोबरच हटयोगाचेंहि वर्णन आहे. त्यावरून पातंजल योगाचा कवीनें अभ्यास केल्याचें दिसतें.

या काव्याखेरीज दामोदर पंडितानें निरनिराळया ६० चौपद्या रचिल्या आहेत. चौपद्यांतील वेदांताला रागदारीचें सुंदर अवगुंठन घातलें आहे.

मूर्तिप्रकाश ( इ. स. १२८४ )

सूत्रपाठांचें चिकित्सकपणें संपादन करणारा केशवव्यास यानें हा ग्रंथ शके १२०६ मध्यें लिहिला. चक्रधराच्या मूर्तीचें आणि गुणांचें अतिशय आकर्षक वर्णन या ग्रंथांत केलें आहे. कवीस चक्रधराचा प्रत्यक्ष सहवास लाभला होता. त्या सहवाससुखाचा लाभ या काव्याच्या द्वारां त्यानें वाचकांस करून दिला आहे.

**वानिता श्रीचक्रधराचा मूर्तिमयंकु**
**आनंदें डुलवीन त्रिभुवनीचा लोकु**
**सुमना करीन संतोखु । सभेचिया ।**
**चातुर्यानें सोरसें छेदीन महामूर्खांचें पिसें**
**कवितालते लेववीन घोसें सारस्वतफळाचें**

अशा आत्मविश्वासानें कवीनें हा ग्रंथ लिहिला आणि त्याप्रमाणें तो उतरलाहि !

सूत्रपाठ सिद्ध करणारा लेखक अतिशय प्रतिभावंत कवीहि होता, हें केशवव्यासाच्या या ग्रंथावरून दिसतें.

गद्यराज ( इ. स. १२९० )

दशमस्कंधाची ही श्लोकबद्ध टीका हयग्रीव व्यास यानें लिहिली आणि त्यास नांव मात्र गद्यराज हें दिलें. यांत एकंदर २८० श्लोक आहेत.

हयग्रीव व्यास गोदावरीच्या कांठीं राक्षसभुवन येथें राहणारा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. वडिलांच्याप्रमाणें हयग्रीवहि पंडित होता.

महानुभाव पंथ स्वीकारण्यापूर्वीच तो दशमस्कंधाचा नित्यपाठ करी.

काशीयात्रेस जात असतां वऱ्हाडांत शिरपूर येथें आनेराज व्यास त्यास भेटला व त्याच्याशीं चर्चा करीत असतां त्यास महानुभावांचा परमेश्वरधर्म पटल्यावर त्यानें श. १२३१ मध्यें त्या पंथाचा स्वीकार केला.

धवळे : ( पूर्वार्ध इ. स. १२८६ )

आद्य मराठी कवयित्री महदाइसा हिनें रचिलेलीं हीं स्त्रीगीतें आहेत. त्यांपैकीं एक भाग ( पूर्वार्ध ) श. १२०८ मध्यें निर्माण झाला.

आद्य मराठी कवयित्री महदाइसा हिचा जन्म वेदशास्त्रसंपन्न देशस्थ घराण्यांत झाला. महदाइसाची आजी पंडितसभेंत अजिंक्यपत्र मिळविण्याइतकी विद्वान होती. आजीचें नांवहि महदाइसाच ! या घराण्यांत बायेनायेक याच्या पोटीं ही आद्य मराठी कवयित्री जन्मास आली. बायेनायेक हा रावसगांवीं रहात असे. बायेनायेकाचा भाऊ माधवभट हा विवाह झाल्यावर लवकरच वारला. त्याच्या लहान मुलांचें बायेनायेकानेंच संगोपन केलें. माधवभटांची मुलगी उमाइसा आणि मुलगा नागदेव हीं महदाइसाप्रमाणेंच महानुभावांत अतिशय मान्यता पावलीं.

महदाइसा आणि उमाइसा या दोघींना वैधव्य आलें. महदाइसेच्या पतीचें नांवगांव उपलब्ध नाहीं.

नागदेव लहानपणीं अतिशय उनाड होता. तो माथेफिरूसारखा वागत असे. म्हणून त्याची आई वैतागून महदाइसा व उमाइसा यांच्यासह रावसगांवीं एका गुंफेंत राहूं लागली. तेथें चक्रधराचा शिष्य 'दादोस' यानें या स्त्रियांना उपदेश केला. पुढें नागदेवहि निवळला आणि आई-जवळ राहूं लागला.

'दादोस'मुळेंच या मंडळीस चक्रधराचें प्रथमदर्शन पाटवध येथें झालें. चक्रधराचें दर्शन झाल्यापासूनच महदाइसेस त्याच्याविषयीं विलक्षण ओढ वाटूं लागली. चक्रधराशीं अनेक कारणांनीं संवाद करीत राहणें हा जणू तिला एक छंदच जडला. यामुळें चक्रधराकडून तिनें आत्मचरित्रपर असा बराच भाग वदविला. चक्रधर बद्रिकेदारकडे निघून गेल्यावर ती ऋद्धि-पूर येथें चक्रधरगुरु गोविंदप्रभु यांच्या सान्निध्यांत राहूं लागली. नाग-देवहि तिच्याबरोबर राहण्यास आला. गोविंदप्रभु शके १२०८ मध्यें समाधिस्थ झाले.

या दोघा भावंडांनीं महानुभाव पंथाची फार मोठी सेवा केली. पंथ प्रवर्तकांच्या सहवासाचा त्यांना दीर्घकाळ लाभ झाला होता. आणि त्या श्रेष्ठ पुरुषांनीं आपलें हृद्गत त्यांच्याजवळ अनेक प्रसंगीं प्रकट केलें होतें.

नागदेव हा चक्रधराचा पट्टशिष्य. परंतु तो म्हणे: ही म्हातारी माझ्या धर्माची रक्षक आहे. तिच्या वाणीचा सिद्धवाणी असा उल्लेख करीत असत. ती शके १२३४ च्या पूर्वी केव्हां तरी मरण पावली, असें बा. ना. देशपांडे यांचें अनुमान आहे. परंतु तिचा जन्मशके ११९३ हा आहे. तेव्हां शके १२३४ मध्यें ती 'म्हातारी' ठरूं शकत नाहीं. श्री. ज. र. आजगांवकर यांच्या मतें महदाइसाचा मृत्यु शके १२४३च्या पुढें झाला असला पाहिजे. (म. सं. क. पृ. ७) आपल्या मतास श्री. ज. र. आजगांवकर आधार असे देतात: गोविंदप्रभूच्या विवाहकालीं महदाइसा हिनें धवळ्यांचा पूर्वार्ध रचला. गोविंदप्रभूंचा निधन शक शके १२०८ हा निश्चित आहे. महदाइसेचें वय त्या वेळीं १२–१३ वर्षांचें ठरतें. त्यानंतर तिचा 'म्हातारी' असा उल्लेख होईपर्यंत; ती

हयात होती. म्हणजे मृत्युसमयीं ती ५० चे तरी पुढें असावी. यावरून तिचा मृत्यु शके १२४३ च्या पुढेंच केव्हां तरी झाला असावा.

( म. सं. क. पृ ७ ).

धवळे—धवळा हा शब्द धव + ल असा झाला आहे. त्याचा अर्थ ' लग्नांत गावयाचें वरविषयक गीत ' असा होतो. महदाइसा गोविंद-प्रभूच्या विवाहप्रसगीं करवली होती. श्रीकृष्णरुक्मिणीविवाहप्रसंगीं आपण करवली झालों अशा भूमिकेनें तिनें गाइलेल्या धवळयांत श्रीकृष्णभक्तीचें भावसंपन्न स्वरूप दिसतें.

धवळयांचा पूर्वार्ध ज्या प्रसंगी रचला गेला त्यासंबंधीं मतभेद दिसतो. कांहींच्या मतें, गोविंदप्रभूंना वृद्धापकाळीं विवाहाची इच्छा झाली; त्याप्रमाणें त्यांचा विवाह झाला. त्या प्रसंगीं हे धवळे गाइले. दुसरें मत, गोविंदप्रभु श्रीकृष्णविवाहाचा उत्सव साजरा करीत होते असें आहे.

पहिलें मत श्री. ज. र. आजगांवकर यांचें आहे. त्यांच्यामतें धवळयांचा प्रसंग हा गोविंदप्रभूंच्याच विवाहाचा आहे.

वा. ना. देशपांडे यांचा मतें हा प्रसंग गोविंदप्रभूच्याच विवाहाचा होता. त्यांनीं ऋद्धिपुर चरित्रांतलाच उतारा दिला आहे. तो :

श्रीप्रभु म्हणति : ( स्वतः चा ) वीवाहो करावा. मग म्हाइंभटें आवघी वऱ्हाडाची आइती केली.

( आ. म. क. प्र. ११ )

पांगारकर यांच्या मतें तो गोविंदप्रभूचा विवाहोत्सव नसून त्यांनीं श्रीकृष्ण-विवाहाचा उत्सव साजरा केला आणि महदंबेस कृष्णाची करवली म्हणून गाणीं म्हणण्यास सांगितलें.

( म. वा इ. १–४४६ )

वा. ना. देशपांडे यांनीं उद्धृत केलेला वर दिलेला उतारा पाहिल्यास " श्रीप्रभु म्हणतिः (स्वतःचा) वीवाहो करावा " या ठिकाणीं 'स्वतःचा' हे शब्द कंसांत अर्थात् श्री. वा. ना. देशपांडे यांचे आहेत. ते मूळांतले नाहींत ! तेवढ्या शब्दानें प्रसंगाचें स्वरूपच बदललें !

श्री. आजगांवकर यांनीं ऋद्धिपुरचारित्रांतीलच उतारा (मूळ आणि त्याचा अनुवाद) दिला आहे. परतु मूळ उतारा म्हाइंभटीं केशवनायकः विठ्ठल नायकः परमेश्वर नायकः रुपनायकः मुख्य आवघे लोक पाचारिले. येथूनच आरंभ आहे. आणि अनुवादांत, एकदां गांवांत लग्नसमारंभाचा धूमधडाका चाललेला पाहून आपणहि लग्न करावें असें गोविंदप्रभूस वाटलें...परमेश्वर नायक नांवाचा मनुष्य मुलगी देण्यास तयार झाला... असा जो भाग अनुवादांत आहे त्याचा मूळ भाग उद्धृत केलेला नाहीं.

(म. सं. क. ९)

आजगांवकराच्या मताप्रमाणें गोविंदप्रभूंचाच विवाहसमारंभ चालू होता. त्यांच्या माहितीप्रमाणें—

गोविंदप्रभूंना एकदां विवाह करण्याची इच्छा झाली. त्यांना वृद्धपणींहि परमेश्वर नायक माणसानें मुलगी दिली. लग्न झाल्यावर गोविंदप्रभु, महादाइसा जवळ होती तिला म्हणाले, " काये गाये जी. आवो कांहीं गा "

गोविंदप्रभूंनीं आग्रह केल्यावर महादाइसा म्हणाली, "धवळे म्हणूं ! " नागदेव भागवताचे धवळे म्हणूं लागला. परंतु महदाइसा गाईना. तिला प्रभूनें पुन्हां आग्रह केला. ते म्हणाले,

'कृष्ण रुक्मीणी गजरथतुरें' या थाटाचें एखादें गाणें म्हण. पण महदाइसेस गाणें येत नव्हतें. शेवटीं चक्रधराचे पायास मनोमन वंदन करून ती गाऊं लागली. चक्रधरकृपेनें झालेल्या स्फूर्तीनें तिच्या मुखांतून जें काव्य बाहेर पडलें तेंच धवळे या नांवानें प्रसिद्ध आहेत. 'चक्रधराचे सीरीं धरूनिया चरण' असे शब्द तिच्या मुखांतून बाहेर पडले. तोच काव्याचा आरंभ झाला. 'लागला नीरुता जीवीं' असें म्हणून तिनें काव्य संपविलें. पुढें वृद्धापकाळीं महदाइसेनें आणखी धवळे म्हटले. म्हणून वरील भाग हा धवळयांचा पूर्वार्ध ठरला. तो ८३ कडव्यांचा आहे.

रुक्मिणीस्वयंवर या विषयावर मराठींत अनेक काव्यें झालीं परंतु धवळे हें त्या विषयावरील पहिलें काव्य आणि तें आद्य मराठी कवयित्रीनें रचिलेलें आहे.

कवयित्रीच्या स्त्रीसुलभ मनाचे विशेष गुण या काव्यांत आहेत. त्यांतला पहिला विशेष म्हणजे साधेपणा. भाषा, विचार, विकार, या बाबतींतली स्वाभाविकता कोणत्याहि १०।५ ओळी वाचल्या तरी दिसून येते. प्रसंगानुसार भावनांचे चढउतार येथें आढळतात. परंतु कोणत्याहि भावनेचा विस्तारपूर्वक आविष्कार झालेला नाहीं. 'शिशुपाळु वरु' असें ऐकिल्याबरोबर रुक्मिणीनें कृष्णाचा धांवा केला. तो केवळ ७।८ ओळींतच संपला आहे. रुक्मिणीचा निरोप घेऊन ब्राह्मण द्वारकेस आला. द्वारका नगरी पाहिल्यावर त्याला जो आनंद आणि आश्चर्य वाटलें तें

**कोडी संख्या कळस तेथ मिरवताय गगन**

एवढयाच शब्दावरून व्यक्त झालें आहे. पुढचीच ओळ : वानुं नेणीजे हे रचना, अशी आली आहे. अशा रचनेंत जी गतिमानता दिसून येते तिच्यामुळें एकामागून एक प्रसंग डोळयापुढून सरकत जातात. श्रीकृष्णाचें दर्शन होतांच

**केसी संभ्रमीत जाली माडावरुनियां**
**घालूं पाहे झेंप**

या एकाच ओळींत तिची उत्कंठा वर्णन केली आहे.

गोविंदप्रभूची आज्ञा झाल्याबरोबर त्या लगीनघाईत भराभर येईल तसें, जुळवितां येईल तसें जुळवून हें धवलगीत गायिलें आहे. तेथें विचार करण्यास, रचना करण्यास ना वेळ ना साधन ! हें लक्ष्यांत ठेऊन धवळे वाचले म्हणजे या आद्य कवयित्रीच्या शीघ्र कवित्वाचें आणि त्याबरोबर तिच्या उत्कट कृष्णप्रेमाचें कौतुक वाटतें. विवाहांतील लौकिक सोहळयांचें इतक्या तन्मयतेनें वर्णन स्त्रीखेरीज कोण करूं शकणार? त्यांतहि ही स्त्री कवयित्री आहे. रुखवत देऊन आलेल्या विद्याधरींना रुक्मिणीनें विचारलें "कृष्ण कसा दिसला ग ?"

त्या किती चतुर होत्या पहाः—

**सर्वांगीं न देखों तुमचा वो कांतु**
**देखियलें जें आंग तेथौनि न ढळतीचि लोचन**

आणि लगेच त्या दचकून म्हणाल्याः

**तुझा पती आम्हां पिताः दुजा नाठवे विचारु**

स्त्रीमनाचे हे कंगोरे स्त्रीमनाखेरीज कोण ओळखणार ?

आद्य कवयित्रीचें हें आद्य काव्य असें अत्यंत चित्तवेधक असें आद्य मराठी स्त्रीगीत आहे.

धवळ्याखेरीज महदाइसेनें पुन्हां एकदां रुक्मिणीस्वयंवरच गाइलें आहे. तें मात्र स्वयंस्फूर्तीनें रचिलेलें आहे. तेंच मातृकी-रुक्मिणी-स्वयंवर होय. त्याचीं ११० कडवीं आहेत. या काव्यांत धवळ्यापेक्षां पुष्कळच रचनाकौशल्य, कल्पनाविलास आहे. कारण तें रचतांना 'लगीनघाई' नव्हती.

मातृकी-रुक्मिणीस्वयंवर धवळ्यांचा पूर्वार्ध झाल्याबरोबर काव्य-स्फूर्तीच्या त्याच भरांत लिहिलें असावें. कारण एक तर त्यांत काव्य-शक्तीस बहर आलेला दिसतो. शिवाय त्यांत स्वयंवरकथा धवळ्यापेक्षां पूर्ण आहे. 'जालें हें संपूर्ण रुक्मिणीसैंवर' असे समाधानाचे उद्गार या काव्याच्या शेवटीं आहेत. धवळ्यांतलें कृष्णवर्णन तितकेंसें जमलें नाहीं. तेंच या काव्यांत पहा :

**कांसे पीतांबरु : कंठीं कुंदमाळा**
**कांतु शोभे सांवळा : रुक्मिणीचा**

असें वर्णन करीत करीत शेवटीं

**चांपेगौर कांती : चांपयाच्या द्दति**
**चांपोलीं साजती : चक्रपाणी**

असें तें संपन्न होत गेलें आहे. रुक्मियाला श्रीकृष्णानें शासन केलें तें सांगतांना 'भादरिला माथा' असें महदाइसा रोखठोक लिहिते. त्याच्याच पुढल्या 'इक्षितु' सर्वज्ञ हांसोनि असा संस्कृत क्रियापदाचाहि सहज उपयोग करून टाकते.

धवळयांचा पूर्वार्ध हा ज्ञानेश्वरीपूर्वी चार वर्षांचा काळ होय. त्या वेळची समाजस्थिति या स्त्रीगीतांतील सहज आलेल्या उल्लेखांवरून दिसते. त्या वेळचीं वाद्यें, वाहनें, यांत उल्लेखिलीं आहेत. तंबू, आंगवले (शरीर-रक्षक ) तुरुंग, यांचे उल्लेख आहेत. कुर्डी, सांखळया, हे पुरुषाचे व चाळ हे स्त्रियांचे अलकार विशेष होते. औक्षण, केळवाण, रुखवत, बाशिंग, इत्यादि सोहळे महदंबेच्या काळींहि होते.

असें हें आद्य मराठी स्त्रीगीत आहे.

धवळयांच्या उत्तरार्धाचा विचार कालानुक्रमें पुढें केला आहे.

महानुभावांच्या वाङ्मयाचा परामर्श घेतां घेतां ज्ञानेश्वरीपर्यंत आलों. म्हणून ऋद्धिपुराकडून आतां अलंकापुरी ( आळंदी ) कडे वळलें पाहिजे.

पंढरपुरास जें ' मंदीर ' उभें राहिलें, ज्याचा तुकोबा 'झालासे कळस' त्याचा पाया ज्ञानदेवें घातला. महानुभाव वाङ्मयाचा प्रवाह चालूच राहिला. परंतु इंद्रायणी, भीमा, चंद्रभागा यांच्या कांठीं हरिनामाचा गजर होऊं लागला आणि महानुभाव पंथ आणि वाङ्मय हीं त्या गजरांत हळू हळू गडप होत गेलीं.

महानुभाव पंथाचा प्रवर्तक चक्रधर याच्यापासून ज्ञानेश्वरापर्यंतचा काळ म्हणजे देवगिरीच्या यादवांच्या भरभराटीचा काळ होय. भोंव-तालच्या वातावरणाची प्रसन्नता वाङ्मयावर परिणामकारक झाल्याचें दिसतें. याची ओळख महानुभावांच्या वृत्तांतांत थोडीशी झालीच. ज्ञाने-श्वरांच्या ठिकाणीं त्या प्रसन्नतेचा उत्कर्ष झाला आहे.



# ७. ज्ञानेश्वर

( इ. स. १२७५—१२९६ )

**भक्त त्र्यंबकपंत । मूळ पुरुष आदि**

असें नामदेवानें ज्ञानेश्वराच्या कुलासंबंधीं लिहिलें आहे. हा त्र्यंबकपंत कुलकर्णी, यजुर्वेदी ब्राह्मण, यादवांच्या राजवटींत बीड प्रांताचा कारभारी होता. त्याला दोन मुलगे होते. गोविंद आणि हरिहर. हरिहर लढाईत मरण पावला. पुत्रवियोगामुळें त्र्यंबकपंतांनीं संन्यास घेतला आणि गहिनीनाथाचा उपदेश घेतला.

ज्ञानेश्वराच्या पूर्वी त्यांच्या कुलांतील पहिला भगवद्भक्त त्र्यंबकपंतच होय. ( श्रीज्ञा. ३७ ) त्यानंतर गोविंदपंत—त्रिंबकरावांचा वडील मुलगा—कुलकर्णी म्हणून काम पाहूं लागला. गोविंदपंतास ५५ व्या वर्षापर्यंत संतान झालें नाहीं. वृद्धापकाळीं गहिनीनाथांच्या आशीर्वादानें त्यांस पुत्रप्राप्ति झाली. त्या मुलाचें नांव विठ्ठल असें ठेवण्यांत आलें. मुंज झाल्यानंतर विठ्ठलानें वेदाध्ययन पूर्ण केलें. अध्ययन पूर्ण झाल्याबरोबर वडिलांची परवानगी घेऊन तो तीर्थयात्रेस गेला. तीर्थयात्रेसाठीं त्यानें देशभर संचार केला.

विशेषतः कृष्णजीवनाशीं संबंधित अशीं द्वारका इत्यादि क्षेत्रें पाहिल्यानंतर त्यांनीं त्र्यंबकेश्वरीं वास्तव्य केलें. त्र्यंबकेश्वरानंतर ते श्रीक्षेत्र आळंदी ( अलंकापुरी ) येथें इंद्रायणीच्या तटीं आले. आळंदीस त्या वेळीं शिवपीठ होतें.

कांहीं दिवसांनीं सिद्धोपंत कुलकर्णी यांच्या मुलीशीं विठ्ठलपंतांचा विवाह झाला आणि ते सासऱ्याकडे आळंदीसच राहूं लागले. परंतु संसारांत मन रमेना. पंढरीच्या वारीचे दिवस आले. यात्रेकरूंच्या झुंडी पंढरपुराकडे निघाल्या आणि विठ्ठलपंतहि त्यांच्याबरोबर पंढरपुरीं गेले. पंढरपुराहून ते रामेश्वरीं गेले आणि कांहीं दिवसांनीं घरीं म्हणजे सासरीं परत आले.

मध्यंतरीं इतक्या दिवस विठ्ठलपंत आईबापाकडे गेलेच नव्हते. वृद्ध आईबाप मुलाची वाट पहात होते. विठ्ठलपंत रामेश्वरची यात्रा केल्यावर

घरीं गेले. पुढें आईबाप मरण पावले. सासऱ्याच्या विनंतीवरून विठ्ठल-पंत आपेगांवीं राहावयास गेले. सिद्धोपंतच संसाराचा बहुतेक भार सांभाळीत. विठ्ठलपंतांचें वैराग्य दिवसेंदिवस वाढतच गेलें. रखुमाबाईस मूल झालें नव्हतें. त्यामुळें तसा मायापाशहि उत्पन्न झाला नव्हता.

शेवटीं एक दिवस विठ्ठलपंतांनीं पत्नीशी जवळ जवळ भांडण करूनच संन्यासाची परवानगी मिळविली! पत्नी रागाच्या भरातच 'जा' 'जा' म्हणाली आणि विठ्ठलपंतांनीं तीच पत्नीची अनुज्ञा समजून काशी गांठली ! तेथें श्रीपादस्वामीकडून त्यांनीं संन्यास व उपदेश घेतला व चैतन्याश्रम हें नाव धारण केलें.

रुक्मिणीबाईस मात्र आशा वाटे कीं, पति आज ना उद्यां परत येईल ! त्यांनीं कडक व्रतवैकल्यें सुरू केलीं.

तीर्थयात्रेच्या निमित्तानें हिंडत असणारे श्रीपादस्वामी आळंदीस आले असतां रुक्मिणीबाईनी त्यास वंदन केल्यावर त्यांनीं 'पुत्रवती भव' असा आशीर्वाद दिला. बाईची खरी परिस्थिति कळल्यानंतर गुरूनें शिष्यास संसारांत परत जाण्याची आज्ञा करून धीर दिला.

**—अविधी कर्माचें न धरावें भय ।**
**यासी आहे साह्य जगदीश**
**स्वदेशा जाऊनी करावा आश्रम**
**सुखरूप स्वधर्म चालवावा ॥**

चैतन्याश्रमानें पुन्हा संसारांत पाऊल टाकलें. अशा प्रकारें विठ्ठल-पंतांनीं संन्यास घेतल्यावर पुन्हां संसारास सुरुवात केली. हें त्यांचें कृत्य धर्मास धरून नव्हतें. म्हणून गांवकऱ्यांनीं त्यास वाळींत टाकलें. त्यामुळें त्यांना फारच यातना सहन कराव्या लागल्या.

संन्याशाच्या संसारांत लोकांकडून अतिशय छळ होऊं लागला. जन-निंदेचा उपसर्ग टाळण्यासाठीं विठ्ठलपंतांनीं गांवाबाहेर झोंपडींत मुक्काम केला. अशीं बारा वर्षें काढिलीं. बारा वर्षांनीं चार मुलें झालीं. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ता हीं तीं चार अलौकिक बालकें होत.

मुलांच्या सहवासांत जननिंदेची पर्वा न करतां त्यांचे दिवस आनंदानें जात होते. मुलांना विठ्ठलपंतांनीं अतिशय चांगलें शिक्षण दिलें असलें पाहिजे. बालवयांतच तीं व्युत्पन्न झालीं. त्यांच्या जन्मसिद्ध अलौकिकत्वा-प्रमाणेंच विठ्ठलपंतांचा सहवासहि महत्त्वाचा ठरला असला पाहिजे.

आपल्या विधिबाह्य आचरणाच्या दोषापासून मुक्त होण्यासाठीं विठ्ठलपंतांनीं नंतर उग्र तपश्चर्या करण्याचा बेत केला. आणि त्र्यंबकेश्वरीं जाऊन ब्रम्हगिरि पर्वतावर तपश्चर्येस आरंभ केला.एक दिवस निवृत्तिनाथा-दिकांसह ब्रम्हगिरीस प्रदक्षिणा घालीत असतां वाघाच्या भीतीनें निवृत्तिनाथ एका गुहेंत शिरले व तेथें त्यांची व गहिनीनाथाची भेट झाली! त्यांस गहिनीनाथाचा उपदेश झाला! निवृत्तिनाथांनीं ज्ञानदेवास उपदेश देऊन त्यासहि पूर्णत्वास नेलें! मुलांच्या कल्याणासाठीं प्रायश्चित्त म्हणून वडील तपश्चर्या करीत होते त्या वेळीं इकडे निवृत्तिनाथानें आणि ज्ञानदेवानें स्वानंदसाम्राज्य संपादिलें! ज्ञानदेवानें सोपान आणि मुक्ता-बाई यांसहि 'आपणा सारिखें' केलें!

निवृत्तिनाथाचें मुंजीचें वय झाल्यावर विठ्ठलपंतांस स्वस्थ बसवेना. त्यांनीं शेवटीं आळंदीच्या ब्रम्हवृंदांना विनंति केली; क्षमा मागितली; शुद्ध करून घेण्याची तळमळून विनंती केली! परंतु ब्रम्हवृंदानें शास्त्राचा गंभीर विचार करून निर्णय दिला—

## देहांत प्रायश्चित्त!

विठ्ठलपंतास त्याचें भय वाटलें नाहीं. त्यानें लगेच प्रयागीं जाऊन देहत्याग केला! आणि मागोमाग रुक्मिणीबाईहि गेल्या!

आपल्या देहदंडानें समाज मुलांचा स्वीकार करील अशी विठ्ठल-पंतांना आशा होती. परंतु एवढ्यानें मुलें 'पावन' ठरलीं नाहींत! समाजानें त्यांचा स्वीकार केला नाहीं. म्हणून निवृत्तिनाथांनीं स्वतः ब्रम्हवृंदास विनंति केली. ब्रम्हवृंदांनीं या वेळीं निर्णयः दिलाः 'पैठणास जाऊन शुद्धिपत्र आणा!' पैठणकर ब्रम्हवृंदास आळंदीच्या ब्राम्हणांनीं एक पत्रहि दिलें.

निवृत्तिनाथास या यातायातीची आवश्यकता वाटेना. आणि त्या भावंडांचेंहि समाजाच्या मान्यतेवांचून कांहींच अडलें नव्हतें. तरी ज्ञानेश्वरानें सांगितलें—

**कुळीचा कुळधर्म अवश्य पाळावा**
**सर्वथा न करावा अनाचार**

शेवटीं सर्व भावंडें पैठणास गेलीं. तेथें शास्त्रसंपन्न ब्राम्हणांनीं निर्णय दिला:

**नाहीं प्रायश्चित्त**
**तीव्र अनुतापें करावें भजन**
**गो, खर आणि श्वान वंदूनिया**
**वंदावें अंत्यज ब्रम्हभावनेसी**

ब्राम्हणांनीं पुन्हां बजावलें:

**न वाढवा संसृति-काम-बंड**

हा निर्णय सर्व भावंडांनीं मान्य केला. तो पाळतांना त्यांना कसल्याहि यातना झाल्या नाहींत ! कारण त्यांची यापूर्वीच ती तयारी झालेली होती.

सभा विसर्जन पावण्यापूर्वी रेड्याच्या पाठीवरचे वळ ज्ञानदेवाच्या पाठीवर वठणें हा प्रसिद्ध चमत्कार घडला. आणि ब्राम्हणांचेहि डोळे दिपून त्या वेळीं शुद्धिपत्राचा प्रश्न तसाच राहून गेला. ( श्रीज्ञा.पृ.५९ )

परंतु पैठणांत असेच, रेड्याकडून वेद वदविणें इत्यादि कांहीं चमत्कार झाले आणि ब्रम्हवृंदानें

**हें परलोकीचें तारूं देवत्रय यासी**
**प्रायश्चित्त काय यासी द्यावें कोणी**

असें वाटून शुद्धिपत्र देऊन टाकलें ! ( श्रीज्ञा. पृ. ६० )

शुद्धिपत्र यादव राज्यांतील प्रसिद्ध पंडित, हेमाद्रि याचा मित्र बोपदेव यानें 'ग्रथित' केलें होतें. शुद्धिपत्र 'ग्रथित' केलें तरी देण्याचा प्रसंगच आला नसावा असें एक मत आहे.

शुद्धिपत्रप्रसंगानंतर कांही दिवस प्रवास केल्यावर ज्ञानेश्वरादि भावंडें नेवासें येथें आलीं. त्या ठिकाणींच **भावार्थदीपिका** (ज्ञानेश्वरी) आणि **अनुभवामृत** ( अमृतानुभव ) हे ग्रंथ निर्माण झाले. ज्ञानेश्वरानें प्रवरा-तीरीं महालया-मंदिरांत ज्ञानेश्वरी सांगितली आणि सच्चिदानंदबाबानें ती लिहून काढिली. ( श. १२१२ )

नंतर आळंदी येथें सर्वजण परत आले. वाटेंत योगराज चांगदेवाच्या पत्राच्या निमित्तानें ज्ञानदेवानें **चांगदेवपांसष्टी** लिहिली ( श्रीज्ञा. ६२ )

पारसनीस व मोडक यांच्या मतें चांगदेवाची भेट तीर्थयात्रेनंतर झाली ( ज्ञाने. १६ अ. प्र. १८ )

पुढें सर्व मंडळी पंढरपुरास गेली आणि तेथें नामदेव, नरहरि सोनार, चोखा मेळा, विठोबा खेचर, गोरा कुंभार, इत्यादिकांसह तीर्थयात्रेस आरंभ केला.

भिडे यांच्या मतें ज्ञानेश्वरीच्या प्रवचनाच्या वेळींच नामदेव हजर असावेत आणि त्यांच्याच संसर्गानें ज्ञानदेवहि त्या विठ्ठलपंथांत श. १२१३ च्या सुमारास उघडपणें सामील झाले.

( म. भा वा. इ. १०७-१०८ )

शके १२१५ पासून शके १२१८ पर्यंत तीर्थयात्रा करून ज्ञानदेव शके १२१८ मध्यें पंढरपुरीं परत आले. तीर्थयात्रेच्या काळांत ज्ञानेश्वरांची अभंगरचना झाली.

तीर्थयात्रेंत कोणकोणत्या स्थलांना भेट दिली हें त्या काळांत रचलेल्या अभंगांवरून कळतें. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळ्या स्थलांचीं नांवें दिलीं आहेत. श्री. न. चिं. केळकर यांनीं सर्व उल्लेखांचा विचार करून सुसंगत यादी दिली आहे. त्यांत उल्लेखिलेल्या स्थळांत पुढील स्थळें आहेतः—

कऱ्हाड, तेरगांव, आवंढ्या नागनाथ, धार, उज्जैन, प्रयाग, काशी, इंद्रप्रस्थ, गया, अयोध्या, गोकुळ वृंदावन, द्वारका, गिरनार, इत्यादि. (ज्ञा. स. २४६)

भिडे यांनीं पंजाबचाहि उल्लेख केला आहे. (म. भा. वा. इ. १००)

शके १२१८ त सर्व मंडळींसह ज्ञानेश्वर पंढरपुरीं परत आले. यात्रेचें मावंदें झालें. नंतर ज्ञानेश्वरांस वाटूं लागलें कीं, आपलें जीवितकार्य संपविण्याचा क्षण आला !

त्याप्रमाणें त्यांनीं आळंदी येथें जाऊन संजीवनसमाधि घेण्याचा संकल्प केला.

आळंदी येथें शके १२१८ कार्तिक वद्य त्रयोदशीस गुरुवारीं दुपारीं (१५ आक्टोबर १२९६) सिद्धेश्वराच्या देवळाच्या उजवे बाजूस समाधिस्थान निश्चित करण्यांत आलें.

समाधींत प्रवेश करण्यापूर्वी १०८ ओव्यांनीं ज्ञानदेवानें भगवंतास 'नमन' केलें. तेच त्यांचे अखेरचे बोल !

नंतर ज्ञानदेवानें समाधिस्थानांत प्रवेश केला आणि निवृत्तिनाथांनीं वर शिळा घातली. ज्ञानेश्वराचा जीवनग्रंथ २१ वर्षांनीं समाप्त झाला.

ज्ञानेश्वराच्या नंतर एक महिन्यानें सोपानदेवानें सासवड येथें, सहा महिन्यांनीं मुक्ताबाईनें तापीतीरीं माणगांव येथें, आणि मुक्ताबाईनंतर एक महिन्यानें निवृत्तिनाथांनीं त्र्यंबकेश्वर येथें जगाचा निरोप घेतला. ज्ञानेश्वरांनंतर आठ महिन्याच्या आंत या अलौकिक व्यक्ती दिवंगत झाल्या !

**आतां ऐसें कोणी होणें नाहीं**

असें नामदेवानें हृदय पिळवटून उद्गार काढले !

## कालनिर्णय

निवृत्तिनाथादिकांच्या जन्मकालाबद्दल दोन मतें आहेतः

एक मतः—

निवृत्ति श. ११९०.
ज्ञानदेव श. ११९३.
सोपानदेव श. ११९६.
मुक्ताबाई श. ११९९.

दुसरें मतः—

निवृत्ति श. ११९५.
ज्ञानदेव श. ११९७.
सोपानदेव श. ११९९.
मुक्ताबाई श. १२०१.

पहिलें मत भावे ( म. सा. १–११८ ) दांडेकर ( श्रीज्ञा. ४८ ) इत्यादिकांचें आहे.

दुसरें मत पांगारकर ( म. वा. इ. १–४९७ ) भिडे ( म. भा. वा. इ. ८४ ) न. चिं. केळकर ( ज्ञा. स. २४६ ) इत्यादिकांचें आहे.

पाहिल्या मतास मुख्य आधार जनाबाईचा पुढील अभंग आहेः

**शालेवाहनं शके अकराशें नव्वद**
**निवृत्ति आनंद प्रकटले**
**ऱ्याण्णवाचे शकीं ज्ञानदेव प्रकटले**

दुसऱ्या मतास नामदेव, विसोबा खेचर, सच्चिदानंदबाबा यांचे अभंग हे आधार आहेत. शिवाय जनाबाईच्याच अभंगाचा दुसरा पाठ आधार म्हणून देण्यांत येतो. जनाबाईच्या अभंगाच्या दुसऱ्या पाठांत

**शके अकराशें पंचाण्णव वत्सरीं**
**निवृत्ति उदरीं प्रकटले**
**सत्याण्णवाव्या सालीं ज्ञानदेव जाले**

असे शब्द आहेत.

दांडेकर यावर म्हणतात कीं जनाबाईचा ( आणि इतरांचेहि आधार-भूत ) अभंग प्रसिद्ध गाथ्यांत आढळत नाहींत ( श्रीज्ञा. ५० ).

दांडेकर आणि भावे यांनीं एकच अभंग उद्धृत केला असूनहि भावे यांच्या ग्रंथांत ' त्र्याण्णवाचे शकीं ' असे शब्द आहेत तर त्याच अभंगांत दांडेकर यांच्या पुस्तकांत 'त्र्याण्णवाच्या सालीं' हे शब्द आहेत. 'सालीं' या शब्दावरून फारशी भाषेचे संस्कार दिसतात म्हणून हा पाठ त्याज्य ठर-विला ( पां. सं. पृ. ८ ) तरी शकीं या शब्दाच्या पाठाचें निराकरण तेवढयानें होत नाहीं. परंतु नामदेव, विसोबा खेचर आणि सच्चिदानंदबाबा आणि परंपरा यांच्या आधारावर ज्ञानेश्वराचा जन्म शके ११९७ हा मानतां येईल एवढेंच.

ज्ञानेश्वराच्या समाधिकालाबद्दलहि मतभिन्नता आहे. नामदेव व इतर ज्ञान-देवकालीन संत शके १२१८ हा समाधिकाल देतात. भावे, पांगारकर, भिडे हाच शक मानतात. दांडेकर समाधीचा काल शक १२१५ हा मान-तात. ( श्रीज्ञा. ६६ ) दांडेकर यांच्या मताप्रमाणें ज्ञानेश्वराचा जन्म शके ११९३ व समाधि शके १२१५ म्हणजे ज्ञानेश्वराची हयात २२ वर्षांची ठरते परंतु ज्ञानेश्वरीच्या रचनाकालीं ज्ञानेश्वर १९ वर्षांचे होते हें मानणें ' सयुक्तिक ' आहे असें वाटतें. म्हणून ज्ञानेश्वरानें इ. स. १२९६ मध्यें समाधि घेतली. आणि त्यांचा जन्म इ. स १२७१ मध्यें झाला. व त्यांची हयात २५ वर्षांची होती असें मानलें म्हणजे त्यांच्या जीवन-वृत्तांतील सर्व घटनांची संगति नीट लागते असें प्रा. पारसनीस व मोडक यांचें मत आहे.

( ज्ञा. अ. १६ प्रस्ता. ५ )

## ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्र आणि ज्ञानेश्वरी

ज्ञानेश्वरांचा जीवनकाल इ. स. १२७५ ( किंवा इ. स. १२७१ ) ते इ. स. १२९६ हा होय. याच कालांत देवगिरीस रामदेवराव यादव राज्य करीत होता. रामदेवरावाची कारकीर्द इ. स. १२७१ ते १३०९ अशी झाली.

ज्ञानेश्वरींत समाजस्थितिदर्शक उल्लेख आले आहेत. त्यावरून व्यावहारिक दृष्ट्या सर्वत्र आबादीआबाद होती असें दिसतें. विद्या व कला यांची समृद्धि होती. रामदेवरावाचा पंतप्रधान हेमाद्रिपंत हा स्वतः ग्रंथकार व शास्त्रकार होता. त्याच्यामुळें अनेक विद्वानांना व कलावंताना राजाश्रय मिळत होता. बोपदेव हा एक पंडित त्या काळीं होऊन गेला. ज्ञानेश्वरांदिकास मिळालेलें म्हणून जें शुद्धिपत्र प्रसिद्ध आहे त्यावर बोपदेवाचें शिक्कामोर्तब आहे. त्यावरून त्यास समाजांत किती मान होता हें दिसतें.

रामदेवासंबंधीं ज्ञानेश्वराचे उद्गार असे आहेतः

**तेथ यदुवंशविलासु**
**जो सकळकळानिवासु**
**न्यायानें पोषी क्षितीषु**
**श्रीरामचंद्र**

—ज्ञा. १८–१८०५

रामदेवरावानें सत्तावन ब्राह्मणांना तीन गांवें दान दिलीं. त्यांत पुढील अटी घातल्या होत्याः ‘ गांवांत वेश्या राहूं देऊं नये, जुवा खेळूं नये, हत्यारें वापरूं नयेत, व सत्कर्मांत वेळ घालवावा. ” यावरून रामदेवाची धर्मनिष्ठा दिसून येते. रामदेव धार्मिक होता. परंतु राजकारणपटु अथवा योद्धा नव्हता. त्यामुळें अल्लाउद्दीनापुढें त्याचा निभाव लागला नाहीं. ( श्रीज्ञा. ५ )

परचक्राशीं यशस्वीपणें झगडण्याचें सामर्थ्य रामदेवकालीन स्वराज्यांत नव्हतें हें लवकरच दिसून आलें.

अविच्छिन्न अशा सुस्थितींत समाज होता. ज्ञानेश्वराच्या काळीं सोनें, रत्नें, [illegible] गोष्टी ज्ञानेश्वरासारख्या मुक्तासहि उपमेदाखल सहज आठवतात, यावरून या वस्तु सर्वसामान्य माणसाच्याहि नित्य परिचयांत असाव्यात असें दिसतें. सोन्याचा भाव १५–१५॥ असा होता, असा ज्ञानेश्वरींतच स्पष्टउल्लेख आहे. द्राक्षाच्या वेलीस चांगला बहर यावा म्हणून

मुळाशीं दूध घालीत असत हें समृद्धीचें आणखी एक उदाहरण होय. शिल्प व चित्रकला यांची बरीच प्रगति झाली होती. हेमाडपंती देवालयें हें वास्तुशास्त्रांतलें एक विशेष उदाहरण होय.

वैचारिक बाबतींत, धार्मिक आचारविचारांच्या बाबतींत मात्र निराळी स्थिति दिसते. धर्माच्या तात्त्विक भागाच्या अंतरंगाचा विसर पडलेला होता. बाह्य आचार, कर्मकांड यावर सगळा भर होता आणि तोहि वरिष्ठ वर्गातच होता. खालच्या समाजांत तर सर्व प्रकारें अज्ञान आणि रूढि यांचेंच प्राबल्य होतें.

उच्चवर्णीयांकडून समाजांतील बायाबापड्यांची उपेक्षा होत होती. त्यांची नागवणूक चालू होती. हें पाहून त्यांच्यासाठीं, त्यांना समजेल व जमेल असा मार्ग त्यांच्या म्हणजे मऱ्हाठी भाषेंत सांगण्याचा उपक्रम महानुभावांनींच केला होता. बायाबापड्यांचें प्रत्यक्ष उद्धरण महानुभावांनीं किती प्रमाणांत केलें हा वादग्रस्त विचार बाजूस ठेविला तरी महानुभाव पंडितांच्या ‘ मऱ्हाठी ’त लिहिण्याच्या व्रतामुळें मराठी वाङ्मयाची वृद्धि झाली यांत शंका नाहीं.

‘ ज्ञानेश्वरीपूर्वी उत्तम विचार सुवेषांत मराठींत मांडतां येतील अशी तिची वाढ झाली होती व या कामीं महानुभावियांनीं वाङ्मयाची बरीच सेवा करून तिच्या अभिवृद्धीस मदत केली होती.’

( श्री ज्ञा. २७ ).

समाजांत वैदिक पंथाबरोबर अवैदिक पंथांचेंहि प्राबल्य होतें. तेराव्या शतकाच्या आरंभीं जैन धर्मास पुनः भरती येऊन ती लाट थेट दक्षिणेपर्यंत पोहोचली होती. त्यामुळें रामानुज, चक्रधर, इत्यादिकांनीं आचार व तत्त्वज्ञान यांत अहिंसेस श्रेष्ठत्व दिलें होतें.

लिंगायतपंथप्रवर्तक बसव बाराव्या शतकांत होऊन गेला. वेद न मानणारा, ब्राम्हणांचें श्रेष्ठत्व न जुमानणारा, वर्णाश्रमव्यवस्थाविरोधी, अहिंसेचा पुरस्कर्ता, संन्यास व तप हीं अनावश्यक मानणारा, विटाळ न जुमानणारा असा हा द्वैती धर्मपंथ त्या काळीं होता. बसवानें आपला

उपदेश कानडी या देशी भाषेंत करून दक्षिणेंत धर्मप्रसार केला आणि प्राकृत लोकांसाठीं प्राकृतांत उपदेश करणाऱ्याच्या कार्यास साहाय्य केलें.

' अकराव्या शतकापासून ते तेराव्या शतकापर्यंत जे जे पंथ निघाले त्या त्या सर्वांनीं अहिंसेस डोक्यावर घेतलें. ' (श्रीज्ञा. १७).

वैदिक पंथांत रामानुजीय भागवतधर्म विशिष्टाद्वैताचा पुरस्कर्ता होता. रामानुज अकराव्या शतकांत होऊन गेले. द्वैत आणि वैष्णवी दीक्षेंतील कट्टर ' सोवळेपणा ' यावर वैष्णवांचा जास्त भर होता. त्यामुळें सर्वसामान्य माणसापासून वैष्णव पुष्कळच दूर राहिले होते.

भागवतधर्माचेंच दुसरें रूप, वारकरी पंथ, ज्ञानेश्वरापूर्वीच प्रभावी होतें. पंढरपूर हें त्या पंथाचें आदिपीठ होतें. त्या आदिपीठावर रामदेवरावाची कृपा होती. श. ११९५ मधील शिलालेखांत विठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धारास देणग्या देणाराची नांवें आहेत. त्यांत रामदेवराव व हेमाडपंत यांची नावें आहेत. रामदेवरावाच्या मागें 'पांढरीफडमुख्य' असें अर्थपूर्ण विशेषण जोडलें आहे.

जैन लिंगायत व महानुभाव असे हे तीन अवैदिक ( प्रा. दांडेकर महानुभावपंथ अवैदिक माननात. ) ( श्री ज्ञा. १३ ) पंथ नाथादि वैदिक पंथाबरोबर प्रचलित होते.

या प्रत्येक धर्मपंथाचीं मूळ तत्त्वें व प्रत्यक्ष आचारांत त्यांचीं झालेलीं रूपांतरें हीं पाहून ज्ञानेश्वरांनी आपले विचार समाजापुढें मांडले.

अवैदिक पंथांतील अहिंसातत्त्वाचा अतिरेक आणि विकृति पाहूनच त्यांनीं 'अहिंसा'पदावर मुद्दाम विपर्यांतराचा दोष पत्करून इतकें विवेचन केलें. अहिंसेच्या विकृत कल्पनेनें आलेली निष्क्रियता पाहून अहिंसा हें कर्म नाही, अंतःकरणप्रवृत्ति आहे हें त्यांना मुद्दाम सांगावेंसें वाटलें.

वर्णाश्रमधर्माच्या तिरस्काराची वृत्ति पाहूनच त्यांनीं कुळीचा कुळधर्म, स्वधर्म अधिकार जाती परत्व भेद, ' उचित तें शुद्ध ज्याचें तया ' यावर भर दिला.

वैदिकांच्या कट्टरपणाचा परिणाम म्हणजे स्त्रीशूद्रादिकांची झालेली

उपेक्षा. ती दूर करण्यासाठीं द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती हें सांगितलें आणि वेदांचेंहि कृपणत्व घालविणारी गीता भावार्थासाठीं निवडिली.

वेदांचें खरें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यासाठीं त्यांनीं संन्यासप्रवण अवैदिक आणि कर्मठ वैदिक यांच्या परस्पर विरोधी आघातापासून समाजाचें संरक्षण केलें.

बसव आणि चक्रधर यांनीं सुरू केलेला उपक्रम म्हणजे देशी भाषांत स्वमतप्रसार. तो ज्ञानेश्वरांनीं घेतला आणि मर्‍हाठियेचिया नगरीं ब्रह्म-विद्येचा सुकाळ केला.

या गोष्टीचा परिणाम पुढें दिसून आला. महाराष्ट्र स्वराज्यसुखास आंचवला तरी स्वधर्मास मात्र परकीय अमलाच्या वरवंट्याखालीं देखील पारखा झाला नाहीं. ( श्रीज्ञा. २१ )

या समन्वयाच्या कार्यात त्याना नाथपंथ व भागवत संप्रदाय उर्फ वारकरी पंथ यांचा उपयोग झाला.

नाथपंथाची शिकवण त्यांच्या घराण्यांतच मुरली होती. आत्मानुभव-प्रधान सर्वसंग्राहक असा हा पंथ होता. नाथपंथाचा अनुग्रह झालेलीं ज्ञानदेवाचा आजा व आजी पंढरपुरासहि यात्रेसाठीं प्रतिवर्षी जात. नाथपंथ व वारकरी पंथ यांचें उपास्य दैवत श्रीकृष्ण तें विठ्ठलरूपानें पंढरीस उभें होतें. हा ऐसपैस भरभक्कम पाया पाहून ज्ञानदेवानें त्यावर

## उभारिलें देवालया.

ज्ञानेश्वर आणि त्यांच्या नंतरच्या साधुसंतांच्या शिकवणुकीची उभारणी अशी परिस्थितीच्या पार्श्वभूमिवर झालेली दिसते.

### ज्ञानेश्वरी ( श. १२१२ )

गीतेवरील ही अद्वितीय ओवीबद्ध टीका आहे. ज्ञानेश्वरीस 'भावार्थ-दीपिका' हें अर्थपूर्ण नांव प्रचलित आहे. ज्ञानेश्वरी, ज्ञानदेवी, भावार्थ-दीपिका, इत्यादि नांवें प्रत्यक्ष ज्ञानेश्वरींत नाहींत.

**केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें**

एवढाच ज्ञानेश्वरींत उल्लेख आहे. नामदेवानें या ग्रंथाचा उल्लेख ज्ञानदेवी, ज्ञानेश्वरी, गीताटीका, अशा तीन नांवांनीं केला.

ज्ञानेश्वरीच्या रचनाकालाचा उल्लेख ज्ञानेश्वरीच्या शेवटीं :

**शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।**
**सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ।**

( ज्ञा. १८--१८११ )

असा आहे. ही ओवी ज्ञानेश्वराची नाहीं. ती सच्चिदानंदबाबानें मागाहून घातली आहे. परंतु त्यावरून आणि रामदेवरावाच्या उल्लेखावरून (ज्ञा. १८–१८०३, १८०६) ज्ञानेश्वरीचा रचनाकाल, लेखनकाल निश्चित झाला.

आज मात्र श. १२१२ तील अस्सल ज्ञानेश्वरी उपलब्ध नाहीं. जास्तींत जास्त जुनी प्रत अद्याप निश्चित झालेली नाहीं. अधिकृत अशी शुद्ध प्रत तयार करण्याचा पहिला प्रयत्न एकनाथानें केला. एकनाथ हा मराठी वाङ्मयाचा आद्यसंशोधक–संपादक म्हणतां येईल !

## भाष्यकार ज्ञानेश्वर

गीतेच्या ( १८ अध्यायावर ) ७०० श्लोकांवर ज्ञानेश्वरानें मूळ अध्यायसंख्या वा क्रम न बदलतां ९००० ओव्यांची टीका लिहिली.

गीतेंतीलच विषय ज्ञानेश्वरींत आले. परंतु ७०० श्लोकांचा ९००० ओव्या इतका विस्तार होतांना स्वतंत्र, खास ज्ञानेश्वराचें शिक्कामोर्तब झालेला असा भाग पुष्कळच आला. या विस्ताराचें स्वरूप पाहिल्यास ज्ञानेश्वरानें अनेक भाष्यकारांचीं भाष्यें वाचून स्वतःच्या मनाशीं कांहीं 'भावार्थ' निश्चित केला आणि गीतेच्या संगतीनें तो, वेळप्रसंगीं मूळाचें अवास्तव बंधन न पाळतां व्यक्त केला असें दिसतें. मूळच्या एका श्लोकावर एकच ओवी असल्याचीं उदाहरणें आहेत. गीता १–१८ व २२ यावर,

३–४१ व ४२ यावर एकेकच ओवी आहे. पुन्हां त्यांतमुळांतील शब्दहि क्वचित् सुटले आहेत. याच्या उलट एका श्लोकाचें निमित्त घेऊन शेंपन्नास ओव्याइतकी स्वतंत्र रचनाहि केलेली आढळते. उदा० गीता अध्याय ११–५ या श्लोकांत 'नाना' एवढें एक पद दिसल्याबरोबर श्रीकृष्णरूपाचें 'नानात्व' वर्णन करण्यांत विशेषणांची प्रचंड मालिका २८ ओव्या· इतकी लांबली आहे. 'अहिंसा' या एका पदावर ( गीता १३–७ ) ओ. २१८ ते २३८ पर्यंत भाष्य आहे.

सारांश, ज्ञानेश्वरी हा ग्रंथ गीतेच्या निमित्तानें ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र स्पष्ट करणारा ग्रंथ आहे. गीतेप्रमाणेंच भाष्यकारांच्या मतांवर त्यांनीं स्वतःचें स्वतंत्र विवेचन केलें आहे. शंकराचार्यांनीं 'संपत्ति' याचा अर्थ 'संपदा' एवढाच केला तर ज्ञानेश्वरानें—

**जेथ एक एकातें पोखी।**
**ऐसे बहुत पदार्थ येकीं।**
**संपादिजती ते लोकीं**
**संपत्ति म्हणिजे**

अशी संपत्तीची व्याख्या केली. गीता १३–६ तील धृति, गीता १४-२४ तील धीरः या शब्दांवरील भाष्यांत ज्ञानेश्वराची अत्यंत सखोल विचारसरणी आणि व्यापक दृष्टि दिसून येते.

१६ व्या अध्यायांतील दैवी व आसुरी संपत्तीवरील भाष्य, गीता व शांकरभाष्य यांच्याशीं ताडून पाहिल्यास असें स्पष्ट दिसतें कीं, ज्ञानेश्वरांनीं या संपत्तीविषयीं स्वतंत्रपणें बरेंच चिंतन केलें आहे. उत्तम आणि अधम पुरुषाचीं अतिशय जिवंत आणि मूलगामी चित्रें त्यांनीं रेखाटलीं.

ज्ञानेश्वरींतील स्वतंत्र स्थळांची विस्तृत यादी ज्ञानेश्वरीसर्वस्व या ग्रंथांत ( ज्ञा. स. पृ. २५०–२५२ ) दिली आहे तीं अभ्यासकानें जरूर पहावी.

वेद व गीता यांचे संबंध, वेदांचें सापेक्ष महत्त्व, गणेश, सरस्वती, संत, गुरु, श्रोते यांचीं नमनें, श्रीकृष्ण व अर्जुन यांचे काल्पनिक प्रसंग,

संभाषणें, प्रेमजन्य देहस्थिति व भावना, कर्मयोगी व स्थितप्रज्ञ यांचीं विस्तृत वर्णनें, योगप्रक्रिया, विश्वरूपदर्शन-प्रसंग, दैवी व आसुरी संपत्ति यांच्या घटकांच्या व्याख्या, ज्ञान-अज्ञानादि गुणांच्या व्याख्या, गुरुपूजा, आचार्योपासना, मार्ग चुकलेले योगी–भक्त–याज्ञिक, मायनदीचें वर्णन, अश्वत्थवृक्ष, भक्तांची स्थिति, इत्यादि ठिकाणीं त्याची स्वतंत्र बुद्धि व प्रतिभा, गीतेच्या एखाद्या शब्दाच्या निमित्तानें प्रगट झाली आहे.

**गीतेवीणहि रंगू दावी**
**तो लोभाचा प्रबंधु ओवी । केला मियां**

(ज्ञाने. १८-१७४१)

या ओवींतील ‘गीतेवीण’ या शब्दाचा अर्थ बंकटस्वामी गीताग्रंथ असा करतात. तो लक्षांत घेतल्यास, ‘गीता बाजूस ठेविली तरी माझी मराठी टीका स्वतंत्रपणें अर्थबोध देईल’ ही ज्ञानेश्वराची ग्रथकर्तृत्वाची जाणीव सार्थच झाल्याचें दिसतें. [न. चिं. केळकर, बंकटस्वामींचाच अर्थ स्वीकारतात. गीता म्हणजे गाणारा हा साखरेबोवांचा अर्थ ते स्वीकारीत नाहींत. (ज्ञा. स. २५३)]

समाजांतील उपेक्षितांविषयींचा कळवळा या ग्रंथद्वारां दिसतो, तसाच मराठीविषयींचा आणि ग्रंथकर्तृत्वाविषयींचा अभिमानहि ठिकठिकाणीं दिसतो. (ज्ञा. ६–१४, ६–१६, १४–११,)

गुरु, गीता, श्रोता, कृष्णार्जुनसंबंध, हे विषय आले कीं, तेथें त्यांच्या मनोवृत्ति एकदम उचंबळून येतात आणि कवित्वास भरती येते. अतिशय हृदयस्पर्शी असें काव्य त्या त्या ठिकाणीं निर्माण करूनहि आपलें समाधान होत नसल्याचें कवीच सांगतो! वाचकांस समाधानाची तेवढी कोटीच माहित नाहीं तेव्हां त्यांचें मन अपूर्व रसास्वादाच्या सेवनानें धुंद होत जातें! असा अनुभव ज्ञानेश्वरीत येत नाहीं अशीं स्थळें दाखविणें कठिण आहे.

पुन्हां या कल्पनाविहारांतहि कवीची विशेष वृत्ति व्यक्त झाली आहे. नीतिमीमांसा हा त्यास अतिशय महत्त्वाचा विषय वाटे. त्यामुळें अ. १३

व १५ मध्यें मूळाचा थोडासा आधार मिळाल्याबरोबर नीतीचें तेथें स्वतंत्र विवेचन आलें आहे. आणि इतकें करूनहि “ गीतेवरील टीका लिहून आपली ग्रंथलेखनाची भूक भागली नाहीं हें ज्ञानेश्वरांनीं पुढें अमृतानुभव किंवा अनुभवामृत ग्रंथ लिहून प्रत्ययास आणिलें. ” ( ज्ञा. स. २५७ )

## ज्ञानेश्वरांचें अध्ययन

ज्ञानेश्वरांच्या अध्ययनाची साक्ष ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं आहे. केवळ गीता पुढें ठेऊन अनुवाद केला नाही, तर त्यापूर्वीं अनेक ग्रंथांचें अध्ययन आणि विविध तत्त्वप्रणालींचें चिंतन त्यांनी केल्याचें दिसतें.

मंगलाचरणांतच वेद, उपनिषदें, षड्दर्शनें, मीमांसा, भागवत, शंकराचार्यांचे ग्रंथ, योगवासिष्ट, पुराणें, स्मृति, इत्यादि ग्रथांचे जे उल्लेख आहेत ते त्याच्या अध्ययनाचे सूचक आहेत. प्राचीन ग्रथाबरोबर तत्कालीन धर्मपंथांतील मताचाहि त्यांना परिचय होता. ज्ञानेश्वरांची आयुर्मर्यादा मनांत आली की, हें अध्ययन आणि चिंतन वयाच्या १५ किंवा फार तर १९ व्या वर्षापर्यंत कसें झालें याचें आश्चर्य वाटतें ! हें कांहींतरी अद्भुत वाटतें आणि अद्भुत हेंच त्याचें खरें वर्णन आहे.

लहानपण लौकिकदृष्टया मोठें स्वास्थ्यांत गेलें असेंहि नाहीं. निवृत्तिनाथाच्या जन्मापूर्वीच वडिलांचा समाजाकडून छळ सुरू झाला. समाजाची विनंती करतां करतां परित्यक्तासारखें जीवन सर्व कुटुंब घालवीत होतें. वडिलांनीं देहपात केला. आई त्यांच्या मागोमाग गेली आणि या बालकांना समाजाच्या दुराग्रहास तोंड द्यावें लागलें.

या वनवासांत अध्ययन कसें झालें असेल ? परंतु अध्ययनाचा पुरावा ग्रंथांत आहे हें निःसंशय. उदा. ज्ञाने० १३-६८ मध्यें वेदाच्या बृहत्सामसूत्राचा उल्लेख, ज्ञाने. १३–८६८ ते ८७२ मध्यें ‘ ज्ञेय ’ या मूळ पदाचें विवरण करतांना झालेलें नासदीय सूक्तार्चे स्पष्टीकरण, ज्ञाने. १३ व्या अध्यायांत ९६० ते १०२४ या भागांतून आणि अ. १४ मध्यें ९१ ते १४१ या भागांतून आलेलें सांख्यमतविवेचन, ज्ञाने. अ. ९–२८१ ते २९३ मध्यें कठ ( २–३–३ ) आणि तैत्तिरीय ( २–८ )

या उपनिषदांतील मंत्रांचें स्पष्टीकरण, ज्ञाने. १३–२१७ ते २४० मध्यें अहिंसापदावरील भाष्यांत जैनमताचें आणि हिंसक असे याज्ञिक व आयुर्वेदी यांच्या मताचें केलेलें खंडण, इत्यादि ठिकाणीं ज्ञानेश्वराच्या व्यापक अध्ययनाची आणि चिकित्सक वृत्तीची साक्ष पटते. भागवताशीं ज्ञानेश्वरांचा दृढ परिचय आहे. भागवत अ. ७–१–३० याचें सरळ भाषांतर ज्ञाने. ९–४६५ ते ४६९ मध्यें आहे.

पांगारकर म्हणतात : ' किंबहुना भागवतांतील सिद्धांत ज्ञानेश्वरींत आल्यामुळेंच ज्ञानेश्वरी भागवतधर्मीयांस मान्य झाली आहे.'

( म. वा. इ. 1–५२1 )

**सूर्यापुढें प्रगटे । प्रकाश जैसा**
**तैशी दशेची वाट न पाहतां**
**वयसेचिया गांवा न येतां**
**बालपणींच सर्वज्ञता**
**वरी तयातें**
**तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें**
**मनचि सारस्वतें दुभे ।**
**मग सकळ शास्त्रें स्वयंभें**
**निघती मुखें**

या ज्ञानेश्वरांच्याच शब्दांनीं त्यांच्या अद्भुत ज्ञानाचा उलगडा करतां येईल.

**अमृतानुभव** अथवा **अनुभवामृत** ( शके १२१४ )

८०६ ओव्या व ५ श्लोक अशा विस्ताराचा हा ग्रंथ ज्ञानेश्वरीनंतर लिहिलेला आहे. ग्रंथांत ज्ञानेश्वरानें अनुभवामृत असाच ग्रंथनामाचा उल्लेख केला आहे.(अमृ० १०,१९,२०,२४,२५,२९) सर्व विषय १० प्रकरणांत विभागला आहे. शिव व शक्ति यांचें ऐक्य, शब्दमंडण व खंडण, अज्ञान व ज्ञान

यांचा निरास, स्फूर्तिवाद किंवा चिद्विलास हा सिद्धांत आणि ज्ञानाज्ञानातीत स्थितीचा स्वानुभव अशी विषयविभागणी या ग्रंथांत आहे.

या ग्रंथांत शांकरमताचाच आविष्कार केलेला आहे. परंतु तो करतांना ज्ञानेश्वराच्या मनांत इतरांना, प्राकृतांना कांहीं पटविण्याचा प्रसंग नव्हता. त्यामुळें ज्ञानेश्वरींतलें अत्यंत प्रभावी असें विस्तारपूर्वक प्रवचन येथें नाहीं. ज्ञान्याच्या भूमिकेवरून ज्ञान्यांसाठीं लिहिलेला हा ग्रंथ आहे.

योगवाशिष्ठाशीं या ग्रंथाचें पुष्कळ साम्य आहे. ‘ अमृतालाहि लाळ उठवील’ असें अनुभवामृत आहे खरें; परंतु तें अमृत लाभण्याची लायकी तशाच तोलाचा ‘ श्रीमंत ’ सेवक असेल त्यालाच लाभणार !

या ग्रंथाच्या या स्वरूपामुळेंच त्याच्यावर टीका, भाष्य लिहिण्याची स्फूर्ति अनेकांना झाली. तरी या भाष्यकारांच्या मदतीनेंसुद्धां अमृतानुभवांतील ‘अमृत’ सुलभ झालें नाहीं. गीतेवर भाष्य लिहिणारा ज्ञानेश्वरच असें कार्य करूं शकणार !

ज्ञानेश्वरांचें स्वतंत्र विवेचन अमृतानुभवाच्या सातव्या प्रकरणांत विशेषतः आलें आहे. शंकराचार्यांचें मानीव अज्ञान कसें अयुक्त आहे हें या प्रकरणांत दाखविलें आहे.

## चांगदेवपासष्टी ( श. १२१६ )

एका प्रसंगाच्या निमित्तानें स्फुरलेलें हें एक स्फुट प्रकरण आहे. तापीतीरवासी हटयोगी चांगदेव यांनीं ज्ञानदेवास एक पत्र पाठविलें. परंतु तें पत्र म्हणजे फक्त कोरा कागद होता ! कारण पत्राचा आरंभ करतांनाच आशीर्वाद लिहावा की नमस्कार लिहावा याचा निर्णय होईना !

हा ‘ कोरा ’ कागद ज्ञानदेवानें ‘वाचला’ आणि ६५ ओव्या उत्तर म्हणून लिहिल्या. या ६५ ओव्या म्हणजे स्वानुभवाचें चित्रण होय. द्वैतापासून अद्वैतापर्यंत या लहानशा पत्रांत भरारी मारलेली आहे. ‘गोडीनें गोडी चाखावी ’ अशा पद्धतीनें ज्ञानदेवांनीं या पत्रद्वारें चांगदेवाशीं संवाद केला. हीं ‘ मौनाचीं भलीं अक्षरें ’ अमृतानुभवापेक्षांहि सामान्यास अगम्य, निदान दुर्गम्य तर आहेतच !

## अभंग

ज्ञानेश्वराचे अभंग हे अनेक दृष्टीनें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या पेक्षां निराळे आहेत. त्यामुळें ते वादाचे विषय झाले आणि अभंगकार ज्ञानेश्वर अगदीं निराळा असावा येथपर्यंत कांहींनीं मतें व्यक्त केली.

अभंगाचें आजचें प्रचलित स्वरूप भाषादृष्ट्या पुष्कळच बदललें आहे. तरी त्यांतील अंतरंग हे भावार्थदीपिकाकाराचेंच अंतरंग आहे यांत मुळींच शंका नाहीं. उलट अभंगात ज्ञानदेवाचेंच अत्यंत मनोहर असें ' सगुण 'रूप दिसत असल्यानें त्याचें आकर्षण कांहीं निराळेंच आहे.

ही अभंगरचना तीर्थयात्रेच्या काळांत झालेली आहे. भाविकांच्या मेळाव्यांत सर्वसामान्य जनसंमर्दांत हरिगुणगायन करतांना तेथें सगुणोपासनेचाच उत्कर्ष होणें साहजिक होतें.

कृष्णाच्या सगुणस्वरूपांतील दर्शनाचा मनमुराद आनंद अभंगांत लुटतां येतो.

**लक्ष लावुनि अंतरीं**
**कृष्णा पाहती नरनारी**
**लावण्यसागरु हरी**
**परमानंदु**
**छंदे छंदे वेणु वाजे**
**त्रिभुवनीं धनु गाजे**
**उतावळें मन माझें**
**भेटावया**

असें म्हणतां म्हणतांच हें रूप धारण करणारा, गाई राखणारा ' गोवळा ' ' ब्रह्मविद्येचाच पुतळा आहे ', ब्रह्माचें हें साकार रूप आहे याचा विसर भावार्थदीपिकाकारास कसा पडेल ?

अभंगाच्या तीन चतुर्थांश भागांत सगुणरूप वर्णन करावें आणि तें रूप हें परब्रम्हच आहे हें शेवटीं मुद्दाम सांगावें असें अभंगाचें स्थूल

स्वरूप आहे. सगुणाकडून निर्गुणाकडे जावयाचें आहे याची आठवण अशा रीतीनें वारंवार दिली आहे.

कृष्णावतारी लौकिक जीवनांत घडलेले प्रसंग, विशेषतः गोपगोपींची कृष्णासाठीं होणारी तळमळ, ही ज्ञानेश्वरानें गोकुळाशीं समरस होऊन व्यक्त केली आहे.

**माथां मोरपिसा वेठी**
**गंधस्थळीं पडे दीप्ती**
**स्वयें विस्मित श्रीपती**
**तेजःपुंज**
**तरुघोंस खोंविले शिरीं**
**वेणु ठेवुनि अधरीं**
**नंदरायाचा खिल्लारी**
**वोज काय सांगु गे माय**

अशा ओळींनीं गोपाळकृष्णाचें ध्यान मूर्तिमंत उभें केलें आहे. भगवंताचें प्रत्यक्ष दर्शनसुख श्रोतृवर्गातील भाविकास देण्याचें सामर्थ्य ज्ञानेश्वरांच्या अभंगवाणींत आहे.

सगुणोपासकास देवाच्या सहवासाची वाटणारी ओढ, विरहाच्या असह्य यातना, आणि शेवटीं सहवासाचा, दर्शनाचा, अनुपमेय आनंद या सर्व स्थितींचीं भावचित्रें अभंगांत आहेत.

सामान्य लोकांच्या जीवनांतील प्रसंग, अनुभव आधारास घेऊन त्यांतून रूपकाच्या आश्रयानें ब्रह्मज्ञानाची ओळख पटविणें अशीहि रचना ज्ञानेश्वरांनी केली आहे. यांनाच भारुडें म्हणतात.

आंधळ्याचें वर्णन करावयाचें परंतु ‘ ज्ञानदृष्टी हारपली, दोन्ही नेत्र आंधळे ’ हें खरें अंधत्व दाखवावयाचें !

कान्ह्याच्या घोंगडीबद्दल बोलतां बोलतां ती शुद्ध सत्त्वगुणें विणली, षड्गुणगोंडे रत्नखचित शोभली असें सांगत मग आपली तापत्रयानें

विणलेली, नवाठायीं फाटलेली घोंगडी किती भिकार आहे हें दाखवावें म्हणजे ऐकतां ऐकतां निराळीच घोंगडी डोळ्यांसमोर उभी राहते.

हें सगळें कोणासाठीं होतें ? सर्वसामान्य अजाण सांसारिकासाठींच नाहीं का ?

ज्ञानदेवाचे हरिपाठाचे अभंग नित्यपाठांत असतात. ते २७ अभंग हीं अविस्मरणीय सुभाषितें झालीं आहेत.

**देवाचिये द्वारीं । उभा क्षणभरी**
**तेणें मुक्ति चारी । साधियेल्या**

अशी सुबोध, सुगम रचना हरिपाठांतहि आहे.

या सुगम शब्दांतील गंभीर अर्थ पागारकरासारख्यांना कळतो. देवाचिया द्वारीं म्हणजे देवळाच्या द्वारीं नव्हे. देव कळला पाहिजे, त्याचें द्वार कळलें पाहिजे ! तें द्वार म्हणजे सद्‌गुरूची सेवा ! असा गहन अर्थहि वरवर सरळ दिसणाऱ्या उद्गारांत आहे. परंतु ज्यांच्यासमोर हे अभंग प्रकट झाले त्याना त्यांतील गहन अर्थापेक्षां सरळार्थाचेंच आकर्षण असलें पाहिजे. त्या सरळ शब्दांचा परिणाम होण्याचें रहस्य, गहनार्थाच्या आकलनापेक्षां ते ज्ञानेश्वराच्या मुखांतून येत यांतच असावें.

अमृतानुभव सांगणारा ज्ञानयोगीच आपल्या ब्रह्मपदावरून वाळवंटांत येऊन उभा राहिला आणि अभंग म्हणूं लागला आहे. अभंगांत आणि ज्ञानेश्वरींत तात्त्विकदृष्ट्या, मूळसिद्धांतदृष्ट्या कितीतरी साम्य आहे. '

( म. वा. इ. १-५९९, ६०० )

अभंगाच्या या स्वरूपामुळेंच अनेक नामधारी ज्ञानदेवांनीं ( निर्हेतुकपणें, भोळ्या भावानेंच; परंतु ) आपले अभंग ज्ञानदेवाच्या अभंगांत मिसळून दिलेले दिसतात.

ज्ञानदेव स्वतःच, बापरखमादेवीवरू, निवृत्तिदास, ज्ञानोबा, इत्यादि पांचसहा नांवानें अभंग पुरा करीत.

ज्ञानदेवाच्या नांवावर असलेल्या १००० अभंगांत अनेकांचे अभंग ग्रंथनिविष्ट झाले आहेत !

## ज्ञानेश्वर एक कीं दोन ?

ज्ञानेश्वराचे अभंग आज मूळ स्वरूपांत उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, या ग्रंथांचें स्वरूप अभंगापेक्षां साहजिक, प्रासंगिक सहज-स्फूर्त उद्गारांसारखें आहे.

या आणि इतर कांहीं गोष्टींवरून ज्ञानेश्वरी लिहिणारा ज्ञानेश्वर आणि अभंगकार ज्ञानेश्वर एक कीं दोन याविषयीं बराच वाद माजला. अभंगाचा परिचय करून घेतल्यावर त्याचा थोडा परामर्श घेणें जरूर आहे.

दोन ज्ञानेश्वर मानणारांनीं ज्यावर भर दिला तो आधार म्हणजे ज्ञानेश्वरी व अभंग यांतील कांहीं विरोधदर्शक गोष्टी, हा होय.

परंतु अभंग व ज्ञानेश्वरी यांच्यांतील साम्यस्थळें इतकीं स्पष्ट आणि महत्त्वाचीं आहेत कीं तीं एकाच माणसाचीं आहेत हें स्पष्ट दिसतें.

असें उद्बोधक साम्य पुढील बाबतींत आढळतें :

पांगारकर, रानडे, केळकर, इत्यादिकांनीं हें साम्य दाखविलें आहे.

( १ ) शब्द—

दोन्ही ठिकाणीं येणाऱ्या शब्दांपैकीं कांहीं—

वेज, न होनि, आफाविले, माथुला, अतिसो, पारूषणें, सूदले, साउमा, निडारले, पाढियंते, विक, पातैजोनी, पारिखे.

( २ ) दृष्टांन्त—भ्रमर, चकोर, चातक, राजहंस, इ.

( ३ ) कल्पना—शुकनालिकान्याय, बहुरुपी, चित्रीचे लेप, इ.

अशीं कांहीं साम्यें अभंग आणि ज्ञानेश्वरी यांत आहेत.

अभंगांतील विठ्ठल हा शब्द वादास मुख्यतः कारणीभूत झाला. ज्ञानेश्वरींत विठ्ठल शब्द आलेला नाहीं विठ्ठल आणि ( नाथपंथाचें दैवत ) शिव यांत विरोध नाहीं हें सिद्ध करण्यास पंढरपूर येथील विठ्ठलमूर्तीचा उल्लेख करण्यात येतो. पंढरपुरास विठ्ठलाच्या डोक्यावर शिवलिंग आहे.

परंतु श्री. ग. ह. खरे यांनीं बरेंच शास्त्रशुद्ध संशोधन करून असें दाखविलें आहे की, विठ्ठलमूर्तीबद्दल जे अभंग आहेत ते आज पंढरपुरास असलेल्या मूर्तीशीं जुळत नाहींत. विठ्ठलाच्या मूर्तीवर शिवलिंग नाहीं. शिवलिंग म्हणून संबोधतात तो वास्तविक अत्यंत साधा असा मुकुट आहे.

( श्रीविठ्ठल आणि पंढरपूर पृ. १९ व ३७ )

विठ्ठलाच्या अनुल्लेखाचा खुलासा असा करतां येतो कीं, विठ्ठलाच्या उपासनेचें वातावरण ज्ञानेश्वराच्या जीवनात ज्ञानेश्वरी लेखनानंतर, पंढरपुरास गेल्यावर आलेलें आहे. ज्ञानेश्वरीत विठ्ठलाचा उल्लेख नसला तरी विठ्ठलभक्तीविषयीं विरोधी असेंहि ज्ञानेश्वरीत कांहीं नाहीं. शिव, विष्णु आणि विठ्ठल यांत ज्ञानेश्वर भेद करीत नाहीत.

अभंग आणि ज्ञानेश्वरी यांच्यातील भाषेची तुलना केल्यास अभंगाची भाषा बरीच अर्वाचीन वाटते. परंतु याचें कारण असें कीं, अभंग हे मुखावाटे प्रसृत होत असतां त्यांची भाषाहि बदलत गेली. तसें ज्ञानेश्वरीचें होण्याचा संभव नव्हता.

या सर्व विवेचनावरून ज्ञानेश्वर एक कीं दोन या वादाचा निर्णय ज्ञानेश्वर एकच असा निश्चित लागलेला आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नसावी.

ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्ठी, अभंग, यांखेरीज योगवासिष्ठ, उत्तरगीता, प्राकृतगीता, पंचीकरण, गायत्रीटीका, शुकाष्टक स्वात्मानुभव, समास, अशी ज्ञानेश्वराच्या नांवावर मोडणाऱ्या ग्रंथांची यादी सांगण्यांत येते. प्रा. दांडेकर यानीं ती यादी दिली आहे. आणि शेवटी प्रमाणांची कसोटी लावून ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टि, नमन ओ. १०८, हरिपाठाचे २७ आणि इतर ९७२ अभंग एवढीच ज्ञानदेवाची निर्विवाद ग्रंथरचना आहे असें स्पष्ट मत नमूद केलें आहे. ( श्रीज्ञा. पृ. ७७ ) 'नमन' या सदराखालीं येणाऱ्या १०८ ओव्या हेच ज्ञानदेवाचे अखेरचे शब्द ! ( श्री. ज्ञा. पृ. ७७ )

## ज्ञानेश्वराचा भक्तिपंथ

**जे पुरुषार्थ सिद्धी चौथी**
**घेऊनि आपुलिये हातीं**
**रिगाला भक्तिपंथीं**
**जगा देत**
**कैवल्याचा अधिकारी**
**मोक्षाचीं सोडी बांधी करी**

—ज्ञा. १२-२१९, २२०

परमेश्वरप्राप्तीचा सोपा मार्ग सामान्य लोकांना दाखवावा, पटवावा या हेतूनें ज्ञानभक्तियोग किंवा भक्तियोग सांगणें हा ज्ञानेश्वरांचा हेतु आहे.

ज्ञानेश्वर स्वतः नाथपंथाचे असल्यानें गुरुभक्तीचें महत्त्व त्यांना स्वतःच पटलें होतें. गुरूच्या मार्गदर्शनाप्रमाणें भक्तिमार्गानें आपल्या जीवनाचें सार्थक करण्याचा मार्ग गीतेच्या आधारें ज्ञानेश्वरानें स्त्रीशूद्रादिकांस, उच्चवर्णीयांनीं उपेक्षिलेल्या उपेक्षितास दाखविला.

या मार्गानें चातुर्वर्ण्यविहित कर्माचा त्याग करावा लागत नाही ही सर्वसामान्य अशा संसारिकाच्या दृष्टीनें मोठी सोय होती. चातुर्वर्ण्यविहित कर्माचें पालन करण्याविषयीं ज्ञानेश्वराचा कटाक्ष शुद्धिपत्रप्रकरणीं निवृत्तिनाथांशीं झालेल्या संवादांतच व्यक्त झाला आहे.

अशा मार्गाचा शोध ज्ञानेश्वराच्या मनांत वडिलांच्या मृत्यूनंतरच चालू झाला असावा. पोरकेपण आल्यावर पुन्हां समाजानेंहि टाकलेलें! द्विजत्व नष्ट झालेलें. विशेषतः मुक्ताबाईचा प्रश्न होता. तिला गुरूची प्राप्ति कशी होणार? म्हणून शेवटीं सर्वांनीं नाथपंथाची दीक्षा घेतली आणि गैनीनाथाकडून मंत्रोपदेश घेतला.

(म. सा. १-१३०)

ज्ञानेश्वराची मतें नाथपंथास पूर्णपणें जुळणारीं नव्हतीं. शांकरमतांत स्त्रीशूद्रादिकांस मोक्षाची वाट नाहीं. म्हणून निराळ्या पंथाचा शोध ज्ञानेश्वरानें चालविला. ( म. सा. १–१३० ) तो शेवटीं भगवद्गीतेंत सांपडलें. कारण वेदाचें कृपणत्व गीतेनें दूर केलें आहे असें ज्ञानेश्वरास दिसून आलें.

वेळचें धार्मिक जीवन ज्ञानेश्वरांनीं पाहिल्यावर त्यांस असें दिसून आल का, उच्च ज्ञानाचीं कपाटें ' प्राकृत ' माणसांस, स्त्रीशूद्रादिकांस बंद होतीं. समाजांत अनेक देवदेवतांचें स्तोम माजलें होतें. विचारशून्य किंबहुना अविचारप्राय असे आचार, धर्माच्या नांवाखालीं चालले होते. या सामाजिक जीवनांतील संकटाचा अनुभव ज्ञानेश्वरास आपल्या घरांतच आला होता.

अवलोकन व अनुभव यांनूत त्यांना प्राकृत माणसाच्या जीवनांतील यातनांची स्पष्ट कल्पना आली आणि त्यांच्यासाठीं होणाऱ्या तळमळींतून ज्ञानेश्वरी निर्माण झाली. कारण स्त्रीशूद्रादिकांना जवळ करणारा असा ग्रंथ म्हणजे भगवद्गीता. म्हणून त्यांनीं भाष्यासाठीं गीतेची निवड केली.

**वेद संपन्न होई ठाईं**
**परि कृपणू आन नाहीं.**
**जे कानिं लागला तिहिं**
**वर्णांचिया**

( ज्ञाने० १८–१४५७ )

**येरां भवव्यथा टेलियां**
**स्त्रीशूद्रादिकां प्राणियां**
**अनवसर मांडूनिया**
**राहिला आहे.**

ज्ञा. १८-१४५८

तरी मज पाहातां तें मागील उणें
फेडावया गीतापणें ।
वेद वेठला भलतेणें
सेव्य होआवया

ज्ञा. १८—१४५९,

यालागि मागिली कुटी
भ्याला वेद गीतेच्या पोटीं
रिगाला आतां गोमटी
कीर्ति पातला.

ज्ञा. १८—१४६५,

म्हणौनि वेदाची सुसेव्यता
हे मूर्त जाण श्रीगीता

ज्ञा. १८—१४६६

वेद आणि गीता यांतील हा फरक हें ज्ञानेश्वराचें भाष्य आहे. गीतेंतील

सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः
गीता १८—६६

या श्लोकावर चिंतन करीत असतां ज्ञानेश्वरास वाटलें कीं, तत्कालीन धर्ममार्तंडांनीं ज्यांची उपेक्षा केली त्यांच्या उद्धाराची हमी घेणारा त्यांचा कैवारी 'अहं त्वा मोक्षयिष्यामि' असें छातीठोकपणें सांगत आहे. भगवान् श्रीकृष्णानें दिलेला हा निर्वाळाच ज्ञानेश्वरानें आपल्या भोंवतालच्या उपेक्षितांना कळविला. सर्व धर्मान् परित्यज्य हें इतरेजनांच्या बाबतींत परिस्थितीनेंच घडवून आणलें होतें. धर्ममार्तंडांनीं त्या उपेक्षितांना मुळीं खऱ्या धर्मापासून मुकविलेंच होतें. ते आपला उद्धारकर्ता शोधीत होते.

ज्ञानेश्वरानें तो त्यांना मिळवून दिला. “ मज पाहतां, मागील उणें फेडावया वेद वेढला, भलतेणें सेव्य होआवया ! ” असें श्रीकृष्णाचें आश्वासन ज्ञानेश्वरानें ‘ प्राकृत ’ जनास कळविलें.

उच्चवर्णीयांकडून कोंडमारा होत असला तरी हरकत नाहीं. चातुर्वर्ण्याप्रमाणें जो धर्म प्राप्त झाला असेल त्याचेंच आचरण करावें. स्वे स्वे कर्ण्यण्यभिरतः संसिद्धिं लभते नरा : ! धर्ममार्तंडांनीं केलेल्या कोंडींतून येथें वाट सांपडली असें ज्ञानेश्वरास वाटलें. आणि म्हणून त्यांनीं गीता ग्रंथांतील भावार्थ ‘ भलत्यां ’ना कळावा म्हणून ही भावार्थदीपिका लिहिली.

कुळ उत्तम नोहावें
जाती अंत्यजही व्हावें
वरि देहाचेनि नांवें
पशूचेंही लाभो।

परंतु

जयांचेनि वाचे माझे आलाप
दृष्टि भोगी माझेंचि रूप
जयाचे मन संकल्प
माझाचि वाहे
माझिया कीर्तीविण
जयांचें रिते नाहीं श्रवण
जया सर्वांगीं भूषण
माझी सेवा
ऐसा आघवांचिपरी पांडवा
जिहीं आपुल्या सर्वभावा
जियावयालागीं वोलावा
मीचि केला

**ते पापयोनीही होतु कां**
**ते श्रुताधीतही न होतु कां**
**परि मजसी तुकितां तुका**
**तुटी नाहीं**

ज्ञाने० ९

**गृहस्थाश्रमु न सांडितां**
**कर्मरेखा नोलांडितां**

ज्या मार्गाचें आचरण करतां येतें असा मार्ग गीतेच्या आधारें दाखविणें हा ज्ञानेश्वरी-लेखनाचा हेतु आहे.

## योगमार्ग कीं भक्तिमार्ग?

ज्ञानेश्वरींत योगमार्गाचाच पुरस्कार केला आहे असें एक विशेष मत प्रचलित आहे. तर ज्ञानेश्वरांनीं भक्तिमार्गच सांगितला असें सर्व साधारण मत आहे.

योगमार्गास अनुकूल व प्रतिकूल आणि भक्तिमार्ग हा योगमार्गापेक्षां सोपा आणि पुन्हां तेंच फळ देणारा आहे, अशीं वर वर पाहतां विसंगत वाटणारीं वचनें ज्ञानेश्वरींत आहेत. त्यामुळें वादास वाव मिळतो.

वादाचा निष्कर्ष काढण्यापूर्वी या दोन्ही प्रकारांचीं कांहीं वचनें पाहिलीं पाहिजेत.

योगमार्गाचा निषेध ( ? ) करणारीं कांहीं वचनें:-

**योगाचियां वाटा**
**जे निगाले गा सुभटा**
**तयां दुःखाचाचि वांटा**
**भागा आला**

ज्ञाने. १२-६९

वांचूनि योगाचेनि बळें
अधिक कांहीं मिळे
ऐसें नाहीं आगळे
कष्टचि तया

ज्ञाने. १२–५९

भक्तियोगाचें विवेचन करतांना १८ ओव्यांत योगमार्गाचें अभिदिव्य सांगितल्यावर वरील ओवी लिहिली आहे.

'योगासारिखें सोहोपें' कांहीं नाहीं !

परंतु ज्ञानेश्वरींत 'योगासारिखें सोहोपें' कांहीं नाहीं असेंहि म्हटलें आहे. योगाचा मार्ग कसा आहे ? :—

यमनियमांचे डोंगर
अभ्यासाचे सागर
क्रमूनि हे पार
पातले ते

ज्ञाने० ५–१५९

तिहीं आपणपें करूनि निर्लेप
प्रपंचा घेतलें पाप
मग साचाचेंचि रूप
होऊनि ठेलें

ज्ञाने० ५–१६०

ऐसें हिताचें जें जें नीकें
तें सदाचि एआं दुखें
यऱ्हवि सोहोपें योगासारिखें
कांहीं आहे

ज्ञाने० ६-३६३

ऐसी वैराग्याची आंगी
बाणूनियां व्रजांगी
राजयोगतुरंगीं
आरूढला

ज्ञाने. १८-१०४१

इत्यादि वचनें योगमार्गाची शिफारस करणारीं आहेत. योगाचें माहात्म्य सांगतांना त्याच्या काठिण्याचीहि स्पष्ट कल्पना दिली आहे.

ताहानें ताहानचि पियावी
भुकेलेयां भूकचि खावी

ज्ञाने. १२-६३

किंबहुना–

हा अग्निप्रवेशु नीच नवा
भ्रतारेंविण करावा
तो हा योगु

ज्ञाने. १२-६६

परंतु अशा अग्निप्रवेशाची शिफारस साधारण जनापुढें कोण करील ?

**या मतांचा समन्वय** : योगमार्गाचा निषेध आणि शिफारस अशी ही विसंगति वरील वचनांत दिसते. त्यावरून ज्ञानेश्वराच्या शिकवणुकीबद्दल दोन मतें झालीं आहेत.

" कोणीहि निराग्रही मनुष्य समग्र ज्ञानेश्वरी रहस्य समजण्याच्या बुध्दीनें एकवार जरी वाचील तरी तो ज्ञानेश्वरीनें पातंजलयोगाभ्यास हाच सर्वोत्तम मोक्षपथ सांगितला असें म्हणण्याचें धाडस करील असें मला वाटत नाहीं. "—असें पांगारकर म्हणतात.

म. वा. इ. १-६७६

ज्ञानेश्वरांनीं जो योग सांगितला तो अध्यात्मयोग उर्फ अद्वैतभक्ति होय, असा पांगारकरांनीं स्पष्ट खुलासा केला आहे.

म. वा. इ. १–६७९

योगमार्गाचें श्रेष्ठत्व वर्णन करणाऱ्या भागासंबंधीं पांगारकर म्हणतात:

" ज्ञानेश्वरांनीं ६ व्या अध्यायांत प्रसंगानुसार आपला जो योगानुभव सांगितला तो ते स्वतः योगेश्वर होते, समोर श्रोत्यांत श्रीगुरु निवृत्तिनाथां-सारिखे योगविद्यापारंगत होते व त्यांचा नाथसंप्रदाय हा मूळचा योगपरंपरेचा होता या तीन कारणांमुळें सांगितला. "

योगमार्गाचीं ज्ञानेश्वरींत जीं स्थळें आहेत, त्यांत अ. ६ मध्यें (ओ. १६२ ते ३२६ ) कुंडलिनी जागृत करणें यासारखा केवळ स्वानुभवगम्य असा भाग आहे. याशिवाय आणखी ५।६ ठिकाणीं उल्लेख आहे. एकूण २३०–२३५ ओव्याच योगमार्गाची ओळख करून देणाऱ्या, योगमार्गा-नुकूल आहेत.

असा भाग हा स्वानुभवाचा आविष्कार करणारा आहे. ज्ञानदेव व निवृत्तिनाथादि अधिकारी मंडळींचें हें आपापल्या पुरतें खाजगी हितगुज आहे. स्वानुभवाची आठवण झाल्यावर एक प्रकारें तद्री लागून हें विषयांतर झालें आहे. पण मुख्य विषय भक्तियोग हाच. भक्तिपंथानें जाणाऱ्यांना सांगितलेंच आहे,

**जे भक्तिपंथा वोटंगले**
**ते नेणतीच हे व्यथा**
**आंत सुख वाढे । तेथें सहजचि योग घडे**
**नाभ्यासितां**

'नाभ्यासितां घडणारा' हा योग म्हणजे भक्तियोग किंवा अभ्यासयोग.

**एकवटलिया भावना**
**सर्वांभूतीं अभिन्ना**
**मातें भजे**

भूताचेनि अनेकपणें
अनेक नोहें अंतःकरणें
केवळ एकत्वचि माझें जाणें
सर्वत्र जो

ज्ञाने० ६-३९३-३९४

'साम्यापरौती जगीं प्राप्ति नाहीं.' हें अभ्यासयोगाचें सार भक्तिपंथानें हातीं लागतें.

वायु जैसा गगना
सर्वांगीं असे

ज्ञाने. ९-२६०

तैसा मी जेतुला आघवा
तेंचि तुक तयांचिया सद्भावा
तरि न करितां पांडवा
भजन जाहालें

ज्ञाने. ९-२६१

ज्ञानेश्वरांनीं 'पंथराज' (ज्ञा. ६-१५२) म्हणून ज्याचा उल्लेख केला आहे तो कसा आहे ?

तेथ प्रवृत्तितरुच्या बुडीं
दिसती निवृत्तिफळाचिया कोडी
हा मार्ग जै देखिजे
तैं तहान भूक विसरिजे
रात्रिदिवस नेणिजे
वाटे इये

ज्ञाने. ६- १५३-१५७

परंतु अशा प्रकारचा मार्ग सर्वांसच साधत नाहीं चहूंकडे जळत असलेल्या वणव्यांतून बाहेर निघण्यास देवाच्या भक्तीवांचून साधनच नाहीं. अंत्यज असो, स्त्रिया असोत, शूद्र असो अगर पशूही असो, ज्यास माझी भक्ति लाभली त्यास माझा साक्षात्कार ठरलेलाच.

यालागीं दुष्कृती जरी जाहाला
तरी अनुतापतीर्थीं न्हाला
न्हाउनी मजआंत आला
सर्वभावें

ज्ञाने. १८-४२१

तात्पर्य, योग आणि भक्ति हे दोन्ही मार्ग एकाच ठिकाणीं नेतात. योगानें ज्ञान स्वावलंबनानें होतें. भक्तिनें ' कर्मे साम्यदशा ' आली कीं श्रीगुरू 'आपैसा भेटे' आणि मग आत्मसिद्धि श्रीगुरूकृपालब्धिकाळीं पावे

( ज्ञाने. १८-९६६ व ९८४ )

कां पूर्वापार सरिता
भिन्न दिसती वाहतां
मग सिंधूमिळणीं ऐक्यता
पावती शेखीं

ज्ञाने० ३-३९

तैसी दोनीही मतें
सूचिती एका कारणातें
परी उपास्ति ते योग्यते
आधीन असे ३-४०

## सगुण आणि निर्गुण

सगुणोपासना व निर्गुणोपासना यासंबंधीं ज्ञानेश्वराचा अभिप्राय ' उपास्ति योग्यते आधिन आहे ' असाच आहे.

**अद्वैतीं भक्ति आहे**
**हें अनुभवाचि येणें; नव्हे**
**बोला ऐसे** ज्ञाने० १८-११५१

**मज आणि ब्रम्हा भेद नाहीं**
ज्ञाने० १४-४०९

वस्तुतः मूळचें निर्गुणच साकार होतें. त्यांत मूलतः भेद असा नाहींच.

**जें निजस्वरूप माझें**
**तें हें चतुर्भज कोंभेली** ( ज्ञाने० ६-३२४ )

भक्ताला सगुणोपासनेच्या सुखापुढें मोक्षाचीहि पर्वा नाहीं. फार काय परमेश्वरास सुद्धां त्या वैभवाची ओढ आहे.

भक्तासाठा

**मज विदेहा देह धरणें घडे**

हें खरेंच परंतु

**किंबहुना आवडे । निरूपम** ( ज्ञाने० १२-२२१ )

हेंहि तितकेंच खरें.

परंतु आपल्या आराध्यदेवतेच्या सगुणस्वरूपाबद्दल प्रीति व्यक्त करणारीं वचनें हीं भक्तीची उत्कटता दाखविणारीं आहेत. हे उद्गार सगुणाकडून निर्गुणापर्यंत प्रवास पूर्ण केल्यानंतर अद्वैताची प्रचीति अंगीं बाणल्यानंतरच्या अवस्थेचे आहेत.

सगुणोपासनेंत मग्न होणाऱ्यांचें, पाषाणच देव मानणाऱ्यांचें अज्ञान अभंगांतहि पुढील ओळींत स्पष्ट दिसतेंचः

**देव आहे जैसा । तैसा नेणवे सहसा**
**भांबावला कैसा । विश्वजनु**
**तो निरशून्य निरूपम । निजंजन निर्वाण**
**ते दशा पाषाण । केंवि पावती** ( अभंग ११ )

**मायोपाधि तेंचि । जाहले सगुण ।**
**येर तें निर्गुण । जैसें तैसें** ( अ. ८९२ )

**सिद्धांतीचें सार । आत्मा सदोदित**
**माया ते कल्पित । तद्विवर्त** ( अ. ९०७ )

**सांडी सांडी । सगुणाची भ्रांती ।**
**तूंचि निर्गुण । आहासी तत्वमसी** ( अ. ५६८ )

हरिभक्ति, सुगणोपासना हें आत्मज्ञानाचें साधन आहे.

**मुक्ति पावावया । करिजे हरिभक्ति**
**तरिच विरक्ति । प्रगटेल**
**तेव्हां आत्मज्ञान अनुभव होय**
**अविद्यत्व जाय जीवरूप** ( अ. ९३३ )

## कर्मयोग

कर्मसंन्यास अशक्य आहे म्हणून कर्मयोगाचा उपदेश ज्ञानेश्वरानें केलेला आहे. कर्मयोगांत कर्माच्या परिणामापासून अलिप्त राहणें हा ' योग ' होय.

कर्मयोगाचीं दोन स्वरूपें या मार्गांत दिसतात. साधकावस्थेंत कर्मसंन्यास अशक्य आहे. कर्में सोडतां येत नाहींत म्हणून कर्में करावींच लागतात. परंतु ती ईश्वरार्पण बुद्धीनें, निष्कामत्वानें, विहिताचा विचार करून केलीं कीं, त्यामुळें चित्तशुध्दि होत जाते, कर्में उपकारक ठरतात, आणि ज्ञानप्राप्तीस साहाय्यक ठरतात.

**विधितें पाळीत**
**निषेधातें गाळीत**
**मज देऊनि जाळीत । कर्मफलें**

१२-७७

**अगा जें जयाचें विहित**
**तें ईश्वराचें मनोगत**
**म्हणौनि केलिया निभ्रांत**
**सांपडेचि तो।**

१८-९११

कर्मयोगाचें विशेष स्वरूप म्हणजे ज्ञानप्राप्तीनंतरही कर्मयोग चालूच रहावा हें होय. ज्ञानप्राप्तीसाठी कर्माचरण जितकें उपयुक्त तितकेंच ज्ञानोत्तर कर्म आवश्यक आहे. कारण त्यांत सामाजिक जीवनांतील मोठें तत्त्व आहे. जो जो मुक्त झाला तो तो जर समाजांतून उठून गेला तर मग विश्व मोहरें कसें लागणार ? म्हणून –

वस्तुतः आत्मज्ञान झाल्यावर कर्म आवश्यक नाहीं.

**तृप्ति जालेयां जैसी**
**साधनें सराति आपैसीं**
**देखें आत्मतुष्टी तैसी**
**कर्म नाहीं** ३-१४७

पण सकल लोकसंस्थारक्षणासाठीं

**देखें प्राप्तार्थ जाले**
**जे निष्कामता पावले**
**तेयांही कर्तृत्व असें उरलें**
**लोकांलागिं** ३-१५४

**मार्गीं तें वर्तावें। विश्व हें मोहरें लावावें**
**अलौकिका नोहावें लोकांप्रति।** ३-३६९

स्वतः अलौकिक जीवनाचा अनुभव घेत असतां विश्व मोहरें लावणाऱ्या या अलौलिक ज्ञानराजाचा उपदेश हा असा लोकाभिमुख आहे.

'ज्ञानेश्वरानें तत्त्वज्ञानाला प्रेमाची माधुरी आणली आहे व भक्तीला ज्ञानाचा डोळा दिला आहे.' (म. वा. इ. १–५४९)

**फळली केळी उन्मळे**
**तैसी आत्मलाभे प्रबळें**
**जयांची क्रिया ढाळें ढाळें**
**गळती आहे.**

(ज्ञाने० १५–२८७)

असें हें कर्म–

**करितेनवीण कर्म असे**

(ज्ञाने. ५–६३)

ज्ञानपूर्व कर्म आणि ज्ञानोत्तर कर्म अशीं या कर्मयोगाचीं दोन स्वरूपें आहेत.

## ज्ञानेश्वराचें 'अद्वैत'

अद्वैताचा पुरस्कार शंकराचार्यांनीं ज्ञानेश्वराच्या पूर्वीच केला आणि तोही गीतेच्याच आधारें केला. ज्ञानेश्वरींत शंकराचार्यांच्याच मताचा अनुवाद केला कीं त्यांत स्वतः कांहीं भर घातली असा एक प्रश्न आहे.

डॉ. शं. दा. पेंडसे यांचें मत असें —

ज्ञानेश्वरी शंकराचार्यांना वाट पुसत लिहिली आहे. त्यांचें तत्त्वज्ञान शांकर तत्वज्ञानाप्रमाणेंच अद्वैतवादी आहे. ज्ञानेश्वरानें स्वतःचें तत्त्वज्ञानच ज्ञानेश्वरींत सांगितलें आहे.

तत्त्वज्ञानांतील नवीनता ही तत्त्वापेक्षां तत्त्वप्रतिपादनाच्या शैलीमध्यें असते. ज्ञानेश्वराचें अद्वैत एका बाजूनें शून्यवादी आणि मायावादी तर दुसऱ्या बाजूनें विज्ञानवादी, स्फूर्तिवादी बनलें आहे. अन्वय आणि व्यतिरेक या दोन्ही प्रकारच्या विवेचनपद्धतींचा त्यांनीं उपयोग केला आहे.

(ज्ञा. त. ४६७)

शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर यांच्या वैचारिक संबंधाविषयीं डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं असें दाखविलें आहे कीं तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाची अशीं २१८ स्थळें आहेत. त्यांत १४६ ठिकाणी शांकरमताचा अनुवाद शब्द, दृष्टांत, अर्थस्वीकार, इत्यादि प्रकारें केलेला आहे. ( ज्ञाने. तत्त्व. पृ. १६६ ते १६८ )

शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर यांच्या वैचारिक संबंधाविषयीं प्रा. दांडेकर यांचें मत असें आहेः—शंकराचार्य हेहि अद्वैताचेच पुरस्कर्ते होत. परंतु ज्ञानदेवाची मांडणी व शंकराचार्यांची मांडणी यांत फरक आहे. आणि तो फरक कांहीं अंशाने या दोघां थोर पंडितांत असणारा जो कालभेद त्यानें घडून आला असावा असें म्हणण्यास बरीच जागा आहे. शंकराचार्य हे अद्वैतसिद्धीकरतां नेहमीं रज्जुसर्प, मृगजल, असले दृष्टांत देतात......एक ब्रह्मच असतांना मनुष्यास कल्पनेनें त्या ठिकाणीं जगाचा भास होतो......दुःखादिकांची सकारण अर्थात् शाश्वत निवृत्ति होण्याकरितां जगद्भ्रम दूर होणें अवश्य आहे.

ज्ञानदेवांचें खरें मत विश्वासकट सर्व आत्माच आहे असें आहे. त्यांत मायाकार्य अतएव त्याज्य भाग कांहीं नाहीं. जगनिरास करून ब्रह्म पाहणें या एकांगी पद्धतीचा ज्ञानेश्वरांनीं अवलंब केलेला नाहीं. ( श्रीज्ञा. ९८ )

**जालेनि जगें मी झांके**
**तरी जगत्वें कोण फांकें**
**अळंकारातें आलें**
**तरी सोनेपण काइ गेलें**
**कीं कमळ फांकलें**
**कमळत्वा मुकें**

प्रा. दांडेकर म्हणतात,

" तरी मायावादाचा अंगीकारहि अनेक ठिकाणीं केलेला आढळून येईल......त्यांचा विचार असा दिसतो कीं, एकच गोष्ट अधिकारपरत्वें वेगवेगळ्या रीतीनें पटविणें शक्य व अवश्यहि आहे.

पैं बाळ जें जेवाविजे
तें ग्रासु विसा ठायीं कीजे
तैसे एकचि चतुर्ध्याजें
कथिलें आम्ही

ज्ञाने. १३-९४०
( श्रीज्ञा. ९९.१०० )

मायावादांत जगाचें अस्तित्वच नाकारिलें आहे. पण ज्ञानेश्वरांचें मत असें आहे—

पाहे पां आरंभीं बीज एकलें
मग तेंचि विरूढलिया बूड जाहलें
बुडीं कोंभ निघाले
खांदीयाच
ऐसोनि हें विश्व येथें
मीचि विस्तारिलोंसें निरुतें ज्ञाने प. २१४-१६
म्हणोनि गा यापरी
ब्रह्मादिपिपीलिकावरी
मीवांचूनि दुसरी
गोष्टीच नाहीं
म्हणऊनि अभेदें जो भक्तियोग
तेथ शंका नाहीं नये खंग
जें जें भेटे भूत
तें तें जाणिजें भगवंत
हा भक्तियोग निश्चित
जाण माझा

( ज्ञा. १०-९८ ते ११८ )

रा. द. रानडे ज्ञानेश्वरांच्याच वचनांचा अनुवाद करीत आपलें मत व्यक्त करीत आहेत. 'एकंदरींत स्वरूप असो अगर विश्वरूप असो ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणें ज्यानें त्यानें तें आपल्या कृतनिश्चयाचें घर केलें पाहिजे'... शून्य काय आहे हें दाखविण्याकरितां वर्तुळ काढावें लागतें (ज्ञा. १८-८८८) त्याप्रमाणें अद्वैत सांगावयाचें झालें तर तें द्वैताच्या भाषेंत बोलल्यावांचून गत्यंतर नाहीं. ( ज्ञा. ब. प्र. १९ )वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्ही चि केवळ । तैसा मी गा सकळ-संबंध वाव ( ज्ञा. १४-१२३ ) "मोक्ष प्राप्त होणें म्हणजे अहं ब्रह्मास्मि या वृत्तिज्ञानावर येणें नव्हे. खरोखरीचें कैवल्य म्हणजे इदम् आणि अहम् या उभयवृत्ति शून्य होऊन राहणें. ज्ञानदेवांनीं अद्वैताचें स्वतंत्ररीत्या पुनरुज्जीवनच केले." (श्रीज्ञा. १०३ )

## एक अगदीं नवा अभिप्राय

प्रा. न. र. फाटक यांनीं 'ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी' या ग्रंथांत एक अगदी नवा अभिप्राय व्यक्त केला आहे:

ज्ञानेश्वरी लिहितांना ज्ञानेश्वराच्या मनांत यवनसत्तेच्या धार्मिक आक्रमणास पायबंद घालण्याचा हेतु होता असें प्रा. फाटक यांचें मत आहे. ज्ञानेश्वरकालीन स्वराज्याविषयीं प्रा. न. र. फाटक म्हणतात,

"त्या काळांत सुखाची चंगळ होती, स्वराज्य होतें, वगैरे कल्पन उराशी बाळगून ज्ञानेश्वराबद्दल काढले जाणारे निष्कर्ष कांहींसे अज्ञानाचेच समजावे लागतात. ( पृ. ७ )."

महादेवराव व रामदेवराव या दोनच राजांचा वृत्तान्त पाहिला तर काय दिसतें ?

प्रा. फाटक म्हणतात, "कसाईखान्यांत आपले भाऊबंद कापले जात असतांना बाहेर एकादा बोकड शेळ्यांच्या परिवारांत बेदरकारपणें खेळत असतां, थोड्या वेळानंतर आपल्याहि गळ्यावरून सुरी फिरावयाची आहे याचें तो भान बाळगीत नाहीं—या बोकडासारखींच मुसलमानांनीं आक्रमण केलें त्या वेळीं आपल्या रंगढंगांत रमणाऱ्या हिंदु राजांची स्थिति दिसते." ( पृ. १०६ ).

ही वस्तुस्थिति पाहून महाराष्ट्राला राज्य, ग्रंथ, विशिष्ट देव किंवा एखाद्या महापुरुषाची शिकवण यांच्या आश्रयाची आशा न धरतां स्वतः-कडे पाहण्याला स्वतःच्या ठिकाणचीं सुतसामर्थ्यें जाणण्याला ज्ञानेश्वरांनीं शिकविलें. ( पृ. १०७–१०८ ).

आपल्या मताच्या स्पष्टीकरणार्थ प्रा. फाटक यांनीं ज्ञानेश्वराच्या कांहीं उद्गारांचा प्रचलितापेक्षां निराळा अर्थ लाविला आहे. उदाहरणार्थ,

**निजवृत्ति जेथ सांडे**
**तेथ स्वतंत्रते वरुती न घडे**

या ओवीचा, स्वत्व सुटलें कीं स्वातंत्र्य म्हणजे राजकीय स्वातंत्र्य जातें असा प्रा. फाटक अर्थ करतात.

( ज्ञा. ज्ञा. पृ १७ )

यवनांची सत्ता दक्षिणेकडे आली नसतां विध्वंसाच्या भावी संकटाची जाणीव ज्ञानेश्वरास ज्ञानेश्वरी लेखनाच्या वेळीं कशी झाली ? या शंकेचें निरसन प्रा. फाटक असें करतात कीं, तीर्थयात्रा आटोपल्यावर त्यांनीं गीता टीका रचिली असणें जास्त संभाव्य व सयुक्तिक वाटतें ' ( ज्ञा. ज्ञा. १०७ )

ज्ञानेश्वरी रचना व तीर्थयात्रा यांचा कालानुक्रम बदलला तरच प्रा. फाटक यांचें म्हणणें ' सयुक्तिक ' ठरण्याचा संभव आहे. तसा काला-नुक्रम पत्करण्यास प्रा. फाटक यांनीं आपल्या ग्रंथांत कोणताहि आधार दिलेला नाहीं. तोंपर्यंत ज्ञानेश्वरीलेखनाच्या वेळीं यवनांच्या आक्रमणास पायबंद घालण्याचा विचार ज्ञानेश्वराच्या मनांत होता हा प्रा. फाटक यांचा अभिप्राय मान्य करणें कठिण वाटतें.

## ज्ञानेश्वरांच्या कार्याची फलश्रुति

महाराष्ट्राच्या जीवनांत ज्ञानेश्वरांचें आगमन ही मोठी क्रांतिकारक घटना ठरली असें अनेक दृष्टीनें दिसून येतें. वाङ्मयीनदृष्ट्या भाषेच्या संगो-पनाचें, समृद्धीचें जें कार्य श्री चक्रधरापासून सुरू झालें होतें त्याची एक

प्रकारें परिपूर्ति ज्ञानेश्वरीनें केली. ज्ञानदेवांच्या ठिकाणींच पूर्णाद्वैती तत्त्वज्ञानास इतकी पूर्णता आली कीं, त्यानंतर महाराष्ट्रांत तत्त्वज्ञानाची दुसरी कोणतीहि शाखा तग धरूं शकली नाहीं. भक्ति, कर्म व ज्ञान यांचा अध्यात्म भूमिकेवरून ज्ञानेश्वरानें केलेला समन्वय आजतागायत अढळ आहे.

सामाजिक जीवनाचा व्यावहारिकदृष्ट्या विचार केल्यास मुसलमान आक्रमणांत वैदिक धर्माचा पाया बळकट राहिला, भागवत धर्मानें शैववैष्णवांतील कलह मिटले, ही ज्ञानेश्वरांच्याच कार्याची फलश्रुति म्हणतां येईल. ( श्रीज्ञा. ११७–१२१ ).

परंतु ज्ञानेश्वरांची पुण्याई महाराष्ट्राच्या संकटकाळीं अपुरी पडली.

**खळाची व्यंकटी सांडो।**
**तया सत्कर्मी रती वाढो।**
**भूतां परस्परें जडो। मैत्र जीवाचें॥**

हें ज्ञानेश्वरांनीं मागितलेलें पायसदान महाराष्ट्राच्या पदरीं पूर्णतः पडलें नाहीं ! त्यांनीं दाखविलेल्या मार्गाचें रहस्य नीट न कळल्यामुळें रामदासांच्या वेळेपर्यंत वेदांताची विचित्र ओढ आणि प्रपंचाची विकृत आसक्ति अशी परिस्थिति निर्माण झालेली दिसते.

## ज्ञानेश्वरींतील काव्य

**माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें।**
**परि अमृतातेंहि पैजां जिंके।**
**ऐसी अक्षरें रसिकें। मेळवीन।** ज्ञा. ६–१४
**दाऊं वेल्हाळ देशी नवी।**
**जे साहित्यातें वोजावी।**
**अमृतातें चुकी ठेवी। गोडसपणें।** ज्ञा. १३–१२५६.

**अहो वधूवरांचिये मिळणी।**
**जैसी वराडियांहि लुगडीं लेणीं।**
**तैसे देशियेच्या सुखासनीं।**
**मिरवले रस।** ज्ञा. ११-३.

या उद्गारांत ज्ञानेश्वरांची मराठी भाषेवरील भक्ति जितकी व्यक्त झाली आहे त्याहिपेक्षां त्या भाषेवरील आपलें प्रभुत्व आणि आपल्या ठिकाणच्या कवित्वाचें सामर्थ्य हीं अप्रत्यक्षपणें परंतु जास्त उत्कटपणें व्यक्त झालीं आहेत. त्यांनीं मराठीविषयीं केलेली ही प्रतिज्ञा यथार्थपणें पूर्ण केली आहे. याची साक्ष वाङ्मयाचे इतिहासकार व टीकाकार आजतागायत देत आलेच आहेत.

ज्ञानेश्वराच्या साहित्यगुणाविषयीं न. चिं. केळकर म्हणतात :

' थोडी सविनय सलगी करून मीं हें म्हणूं इच्छितों कीं, गीताभाष्यच खरें; पण तें कविता रूपानें लिहितांना आपण 'कवि' आहों हा सात्त्विक मानवी अभिमान, संत झाले तरी ज्ञानेश्वरांच्या मनांत जागृत होता.

' भाष्यांत त्यांची स्वतंत्र अशी विवेचकशक्ति पुष्कळच दिसून येते. कवीला लागणारी ही त्यांची प्रज्ञा होय. शब्दांच्या बाबतींत मितव्ययित्व हा एक मोठा साहित्यगुण ज्ञानेश्वरींत सर्वत्र प्रत्ययास येतो.

' ज्ञानेश्वरांची बरोबरी करणारा प्रतिभासंपन्न कवि गेल्या सहाशें वर्षांत झाला नाहीं व आजहि नाहीं.प्रतिभा ही रस आळविण्यापेक्षां अलंकाराच्या योजनेंतच अधिक दिसून येते. ' ( ज्ञा. स. २५४-५५ )

या ग्रंथाच्या मर्यादेंत ज्ञानेश्वरींतील काव्यमय स्थळें उदाहरणार्थ तरी किती उद्धृत करतां येतील? म्हणून फक्त कांहीं स्थळांचा उल्लेख करतों.

उपमेची अतिशय समर्पक योजना केल्याचीं स्थळें पानोपानीं आहेत. उदा० ( ४-२१५,५-८६,८-८९,९-९३,१४-२९७,१५-२९२ ).

अ: २ व अ १२ मध्यें स्थितप्रज्ञ व अनन्यभक्त यांचें वर्णन करतांना उत्प्रेक्षांची बहार आढळते.

दृष्टांतांची मालिका ( ९–६४ व ६५; १३–१७९ ते १८३; १४–३७३ ते ३७६ ) इत्यादि ठिकाणीं आढळते. १८ व्या अध्यायांत दृष्टांताची विशेष शोभा १७११ ते १७१७; १७२७ ते १७३१; १७३२, १७३३ इत्यादि ओव्यांत आढळते.

रूपकामध्यें ७ व्या अध्यायांतील मायानदीचें रूपक वाचतांना आपण त्या भोंवऱ्यांत सांपडत चालल्याचें क्षणभर वाटल्यास नवल नाहीं. १३ व्यांतील प्रकृति-पुरुष-संबंधावरील रूपक; १५ व १६ व्याच्या आरंभीं सद्‌गुरूचें रूपकात्मक वर्णन, ३ ऱ्या अध्यायांत कामक्रोधांचे प्रभाव दाखविणारें रूपक. ज्ञानेश्वरीचा आरंभच मुळीं एका भव्य रूपकानें झाला आहे.

रसविचाराच्या दृष्टीनें शांतरस हा तर यजमानच आणि इतर पाहुणे मंडळी आलीं. त्यांना यजमानाच्या प्रतिष्ठेची पूर्ण जाणीव आहे अशाच रीतीनें तीं वागतात. शांतरसाविष्काराचे विशेष प्रसंग ९–१८८ ते १९३; १६–१ ते ४; १८–४९ ते ५५; इत्यादि स्थळीं आहेत. पण नुसता १३ वा अध्याय चाळला तरी १८५ ते २००, २०३ ते २१७, २४६ ते ३१० या ठिकाणीं या यजमानाचें वैभव दिसेल. श्रीकृष्णासारखा येथें प्रवक्ता तेव्हां अद्‌भुताचा तेथें वावर असणारच. उदा० १–१५४ ते १६३, ७–६९ ते १०२, १५–४६ ते २०९ येथें अद्‌भुत रसाचा परिपोष नमुना म्हणून पहावा. ११ व्या अध्यायांत शांत आणि अद्‌भुत यांची मिळणी झाली आहे. त्याचप्रमाणें वीर ( १–८८ ते ९१; १०–४६ ते ५७, १५–२५८ ते २६२, १८–१०४७ ते १०९० ) वीराचा पारा चढला कीं रौद्र ( ९–१७९ ते १८५, १८८ ते १९३ ) विश्वरूपदर्शन हें रौद्र असल्यानेंच अर्जुनानें शेवटीं हात जोडले. पण या पाहुणचारांत वत्सल रसाचें विशेषच कौतुक होत आहे. कारण ज्ञानदेवाच्या अंतःकरणाचा त्यास वशिला आहे. वत्सल रसाचीं सर्व स्थळें ज्ञानदेवाच्या स्वतंत्र निर्मितीचीं आहेत. गुरूचा कांहींहि, कसाहि संबंध येवो, ज्ञानेश्वरांना तेथें आईची आठवण व्हावयाचीच ! आणि मग बालकाच्या भूमिकेवरून त्यांचें लडिवाळपण भरास येतें. मानवांतीलच नव्हे तर सृष्टींतील, पशुपक्ष्यांतील, अखिल विश्वांतील

मातापुत्रसंबंध त्यांनीं वत्सल रसाविष्कारांत आणले आहेत. श्रीकृष्णार्जुन-संबंधाविषयीं त्यांना मायलेंकरांची तर पदोपदीं आठवण होते. वत्सल रसास्वादासाठीं ( ६-४८९ ते ४९२, १०-१ ते २३, १२-१ ते १९, १३-३६९ ते ४६०; १४-१ ते २३, १५-१ ते २६, १६, १ ते १७; १७-१ ते २७; १८ १ ते १० ) हे स्वतंत्र रसनिर्मितीचे भाग मुळांतूनच वाचले पाहिजेत.

या बालब्रम्हचाऱ्याचें अंतःकरण किती रससंपन्न आहे हें पाहून त्याच्या पूर्णावस्थेची पुन्हां एकदां खात्री पटते. रसपंडितांनीं ज्ञानेश्वरीत शृंगाराचा शोध केला. त्यांना त्याचीहि थोडीफार हजेरी लागलेली दिसली. आणि इतरांबरोबर बीभत्सालाहि थोडा पाहुणचार लाभलेला आहे. १-४२, ११-१६९, १२-१५६, १३-७३, ६०७, ७८६, १७-१७१, २७५, १८-३४५, ५८६, ८३३, ९०७, १०१३, १०४७ येथें शृंगाराची शोभा आहे, तर १३-५५६ ते ५७६, ७३२ ते ७३६, १७-१५८ ते १६४ येथें बीभत्सानें आपली ओळख पटविली आहे. पण एकंदरींत शांत आणि वत्सल यांचीच प्रभा इतकी आहे कीं, बाकीचे रसबांधव फारसे जाणवत नाहींत.

ज्ञानेश्वरांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे

**ऐसे शब्दांचें व्यापकपण । देखिजे असाधारण**
**पाहातयां भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे**

( ज्ञा. ६-२१ )

**जैसें बिंब तरी बचके येवढें**
**परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें**
**शब्दाची व्याप्ती तेणें । अनुभवावी**
**नातरी कामतयाचिया इच्छा**
**फळे कल्पवृक्षु जैसा**
**बोलु व्यापकु होय तैसा**
**तरी अवधान द्यावें** ( ज्ञा. ४-२१५-२१६)

**निवृत्तिनाथः**—निवृत्तिनाथांचा अधिकार प्रत्यक्ष ग्रंथद्वारा कळण्यास आज तरी फारसें साधन नाहीं. परंतु ज्ञानेश्वरांनीं गुरू म्हणून त्यांच्याविषयीं जी भावना प्रकट केली आहे त्यावरून त्यांची योग्यता दिसून येते.

आपलें सर्व ज्ञान, कवित्व, कर्तृत्व निवृत्तिनाथांच्या कृपेचेंच फळ आहे हें ज्ञानेश्वराचें म्हणणें केवळ विनयाचें नाहीं.

निवृत्तिनाथाचे ४०० अभंग उपलब्ध आहेत ते हरिपाठ नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांत योग, अद्वैत, यांबरोबर कृष्णभक्तिपर असेहि कांहीं आहेत.

**सोपानदेव**—सोपानदेवांचाहि हरिपाठ प्रचलित आहे. त्याशिवाय पंचीकरण, सोपानदेवी ही गीतेवरील समश्लोकी टीका, हे ग्रंथ सोपानदेवाचे आहेत.

**मुक्ताबाईः**—मुक्ताबाईनें ताटीच्या अभंगांनीं आपलें नांव भगवद्भक्तांच्या मनांत ठसविलें आहे. परंतु त्या अभंगांतील भाषेवरून ते या मुक्ताबाईचे नाहींत असें स्पष्ट दिसतें. [ म. सं. क. पृ. ३९ ] निवृत्ति, ज्ञानदेव यांसारखे भाऊ लाभल्यामुळें मुक्ताबाईस लहानपणींच खडखडित आत्मज्ञान लाभलें, नामदेवाच्या ठिकाणीं देवाचा लाडका भक्त म्हणून थोडासा अहंकार दिसल्याबरोबर तिनें त्यास खडसावलें.

**अखंड जयाला देवाचा शेजार।**
**काय अहंकार गेला नाहीं ?**

फार काय, चांगदेवासारख्या वयोवृद्ध गृहस्थाच्याहि अहंकारावर तिनें तडाखा मारला.

आजगांवकर म्हणतात : ब्राह्मणांनीं घातलेल्या बहिष्कारामुळें तिचें लग्न झालें नाहीं. म्हणून शेवटपर्यंत आपल्या बंधूंपाशींच राहून त्यांचा संसार तिनें संभाळला. तिचे असे केवळ ४२ अभंग आज उपलब्ध आहेत.
( म. सं. क. पृ. ३९ )

ज्ञानेश्वर एकदां संत्रस्त मनःस्थितींत एकटेच घरांत जाऊन बसले आणि त्यांनीं आंतून ताटी ( दार ) लावून घेतली. मुक्ताबाई बाहेरून आली. ताटी उघडा म्हणून ती विनंती करतांना म्हणते :

राग भरावें कवणासी
आपण ब्रह्म सर्व देशीं
ऐशी समदृष्टि करा
ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।
योगी पावन मनाचा
साहे अपराध जनाचा
विश्व झालीया वन्ही
संतमुखें व्हावें पाणी ।

१४।१५ वर्षांच्या मुलीचे हे शब्द [ ताटीचे अभंग ] आहेत ! हीं चारी भावंडें अगदीं अल्पायुषी वारलीं; पण तेवढ्या थोड्याशा आयुष्यांत धर्म आणि वाङ्मय यांच्या बाबतींत त्यांनीं जी महत्त्वाची कामगिरी केली ती महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरस्मरणीय होऊन राहिली आहे.

कर्मठपणाचें बंड मोडून भक्ति, दया आणि समता यांचा फैलाव करण्यासाठीं त्यांनीं आत्मबलिदान केलें म्हटलें तरी चालेल.

[ म. सं. क. ३७ ]

—

# ८. नामदेव

[ इ. स. १२७० ते १३५० ]

**जीवनवृत्तः**—ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरीच्या द्वारें जो भगवत्प्राप्तीचा 'सुलभ' मार्ग सांगितला त्याचा प्रचार नामदेवानें केला. ज्ञानेश्वर हा त्या मार्गाचा आद्य भाष्यकार आणि नामदेव आद्य प्रचारक होय.

**नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं**

अशी ही नामभक्ति, नाम हाच देव, हें रहस्य कीर्तनाच्या द्वारें सर्वांना पटविणारा नामदेव हा आद्य कीर्तनकार होय.

नामदेव आणि त्याच्या कुटुंबांतील मंडळी यांच्या अभंगांतून नामदेवाचें चरित्र अतिशय स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. परंतु त्याचा जीवनविषयक वृत्तांत कळण्यास इतकें मोठें साधन उपलब्ध असताहि त्याच्या जीवनवृत्तांतासंबंधीं थोडे फार मतभेद आहेतच ! याचें कारण आज नामदेवाच्या नांवानें प्रचलित असलेल्या अभंगांत 'नामदेव' नांवाच्याच दोनचार नामदेवांचेच अभंग मिसळले आहेत. त्यामुळें या भक्तश्रेष्ठांचे अभंग त्यांतून निवडणें कठिण झालें आहे तरी त्या अभंगसंग्रहाची चिकित्सा करून नामदेवाचा जीवनवृत्तांत्त पुष्कळसा कळूं शकतो.

नामदेवाचा जन्म 'अधिक ब्याण्णव गणित अकराशतें' प्रथम संवत्सर शालिवाहन शके शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार या दिवशीं ( रविवार कार्तिक शु. ११ शके ११९२ इ. स. १२७० ) शिंप्याच्या कुळांत झाला. त्याचा बाप दामोदर शेट उर्फ दामाशेटी हा मोगलाईंत परभणी जिल्ह्यांत पंढरपुरापासून ५० मैलावर असलेल्या नरसीबामणी या गांवचा राहणारा. भावे आणि पांगारकर यांच्या मतें नरसीबामणी या गांवींच नामदेवाचा जन्म झाला. डॉ. शं. गो. तुळपुळे म्हणतात, 'नामदेवांच्या जन्मापूर्वी कांहीं वर्षें त्याचे आईबाप पंढरपूर येथें येऊन राहिले होते.' ( पां. सं. १३७ ) भावे व पांगारकर यांच्या मतें नामदेव विठ्ठलभजनाच्या छंदानें घरदार विसरून पंढरपुरास जाऊन बसला. त्यास परत आणण्यासाठीं त्याची आई, बायको, इत्यादि मंडळी पंढरपुरास

गेलीं. परंतु नामदेव तर परत आला नाहींच; पण त्यानें कुटुंबांतील सर्व मंडळींनाच पंढरपुरास खेचलें आणि सर्वजण नामदेवाबरोबर हरिभजनांत रंगून गेले.

नामदेवास नरसीबामणी या गांवींच लहानपणींच भगवद्भक्तीची गोडी लागली. पंढरीची बारी त्याच्या घराण्यांत होतीच. पंढरीच्या लोभामुळें आपला नरसीबामणी हा गांव सोडून नामदेव पंढरपुरासच कायम येऊन राहिले. ( म. वा. इ. १–५५७ )

नामदेवाच्या नांवावर गणलेला एक ५६ चरणी अभंग आहे. त्यांत नामदेवानें स्वत:विषयीं पूर्व वयासंबंधीं जी हकीकत सांगितली आहे त्यावरून असें दिसतें कीं, तो तरुणपणीं कुसंगतीनें बाटमारी करी. औंढ्या नागनाथाच्या दर्शनास जाण्याचा त्याचा नियम होता. त्याच्या बाटमारींत जिचा नवरा बळी पडला, अशी एक बाई देवळांत आली असता तिच्या उद्गारावरून आपल्या पापकृत्याची नामदेवास जाणीव झाली आणि त्यास पश्चात्ताप झाला ! चित्तशांतीसाठीं तो पंढरपुरास गेला आणि पश्चात्तापदग्ध अंत:करणानें त्यानें विठ्ठलाची करुणा भाकली.

पंढरपुरास येण्यापूर्वी तो बाटमारी करीत असे, वगैरे वृत्तांत आणि ५६ चरणी अभंग हीं दोन्ही प्रक्षिप्त आहेत असें श्री. पं. ना. पाटसकर यांनीं सिद्ध केलें आहे व डॉ. शं. गो. तुळपुळे यांनीं श्री. पाटसकर यांच्या निर्णयास दुजोरा दिला आहे ( पां. सं. क. १३९ ) इतरहि कांहीं अभ्यासकांचें मतहि असेंच आहे. तेव्हां नामदेवाच्या पूर्वचारित्र्याविषयीं आतां कांहींहि शंका राहिली नाहीं.

नामदेवास विठ्ठलभजनाची गोडी लागली आणि त्याचें संसारांतील लक्ष उडालें. त्यामुळें कौटुंबिक जीवनांत पेंचप्रसंग निर्माण झाला. आई-बाप, बायको हीं त्याला विरोध करूं लागलीं.

आईनें परोपरीनें धिक्कार केला, विनवणी केली, उपदेश केला, तरी नाम्यानें दाद दिली नाहीं. बायकोनें पोरेंबाळें पुढें आणून उभीं केलीं. १४ माणसांचें कुटुंब कसें अन्नान्नदशेस आलें त्याचेंहि वर्णन केलें. नामदेव क्षणभर गडबडला असावा. परंतु शेवटीं त्यानें मन घट्ट केलें. आणि हा

ोतावळा शेवटीं आपल्यालाच गोत्यांत आणणार हें सावधपणें ओळखून
वेठ्ठलासच त्यानें हांक मारली—

**कुटुंबकाबाडी। सदा कान कोंडा**
**जाहालो या ब्रह्मांडा। भूमिभार**
**दुःखाचे डोंगर। पाडिले मजवरी**
**धाव गा श्रीहरी। पांडुरंगा.**

पांडुरंगानें त्यास शेवटीं धीर दिला आणि 'परते होई' असें नामदेवानें ार्वांना निक्षून सांगितलं! पण राजाई परत गेली नाहीं. तिनें पंढरपुरासच ुक्काम केला. आपले पतिराज

**लावोनी लंगोटी। झालेती गोसावी**

ं, दुर्दैव म्हणून तिनें अगतिकपणें पत्करलें! नामदेवास पुन्हां संसारांत रत नेण्यासाठीं आलेले सर्वजण शेवटीं पंढरपुरींच राहिले! आणि ामदेवाच्याच पंथांत सामील झाले!

या मायापाशाशीं झगडत असतां, 'जनांची निंदणी' सोशीत असतां ंतःकरणास ज्या यातना होत होत्या त्यांचें अतिशय कारुण्यपूर्ण चित्र ामदेवानें स्वतःच रेखाटलें आहे. आणि त्यांतून सहीसलामत बाहेर डल्यावर तो आत्मविश्वासानें सांगतो :

**सुखदुःखें दोन्ही। आम्हासी सारिखीं**
**प्रतीति पारखी। मना आली**

परंतु अद्याप भक्तीची बैठक पक्की झाली नव्हती. भक्तीच्या धुंदी- ारोबर गर्वहि वाढत होता. त्या गर्वपरिहाराचा योग ज्ञानदेवाच्या भेटीनें ुळून आला. ज्ञानेश्वरादिकांची कीर्ति ऐकून नामदेव मध्यें आळंदीस ेला. (बहुधा शके १२१३ पां. सं. १३७) साधुसंत आले घरा म्हणून नेवृत्तिनाथानें सुद्धां पायावर डोकें ठेविलें. नामदेवाला भक्तीची जास्तच ेट चढली. पण मुक्ताबाईनें ती उतरविली. तिनें नमस्कार तर केला ाहींच; उलट,

**अखंड जयाला, देवाचा शेजार**
**काय अहंकार, गेला नाहीं?**

असे तडाखेच लगावले ! आणि नामदेवाचा गर्वज्वर खाडकन् उतरला ! गोरा कुंभारानेंहि 'मडकें' थापटून पाहून उरलें सुरलें काम उरकलें आणि नामदेवास कळून चुकलें कीं, आपण अद्याप 'कच्चे'च आहोंत !

ज्ञानदेवांनीं मग नामदेवास विसोबा खेचर या योगसंपन्न सत्पुरुषाकडे पाठविलें. विसोबा खेचर औंढ्या नागनाथासच रहात असत. गुरुदर्शनासाठीं नामदेव शिवालयांत गेला. त्या वेळीं विसोबा पिंडीवर पाय टाकून पडले होते. नामदेवास पुन्हां एक धक्का बसला ! पण विसोबानें शेवटी पहिला धडा दिला कीं, 'जेथें नाहीं देव अशी जागा दाखव ! आणि मग तेथें 'ठेवी पाव ! ' नामदेवास पटलें कीं, 'अवघाची देव ! '

विसोबास ज्ञानेश्वरापासूनच अद्वयानंदाचा लाभ झाला होता. 'मज ज्ञानराज गुरु' असे त्याचे उद्गार आहेत. ज्ञानेश्वराचीच शिकवण विसोबानें नामदेवास दिली. तो स्वतः योगमार्गात निष्णात असून भक्तिमार्गास लागला होता. ज्ञानेश्वरानें या आपल्या शिष्योत्तमाकडून नामदेवास दीक्षा दिली.

द्वादशीचे गांवीं म्हणजे बारशीस विसोबानें नामदेवास उपदेश दिला.

**डोळियाचे डोळे उघाडिले**
**आनंदानें लेणें लेवविलें**

विसोबानें उपदेश केला—

**सर्व काळीं परमात्मा, आहे सर्वदेशीं**
**भावना हे अहर्निशीं, दृढ धरी**

नामदेवाच्या हृदयावर हा उपदेश कायमचा ठसला आणि तो कृतार्थ झाला.

**वीणा घेऊनीयां करी**
**उभा राऊळा भीतरीं**
**तहान भूक विसरली**
**छंद लागला विठ्ठलीं**
**कन्यापुत्रबापमाये**
**त्याची आठवण नये**

अशी त्याची वृत्ति झाली ! परंतु अद्याप आई, बाप, बायका, मुलें ऐलथडीवरूनच टाहो फोडीत नामदेवास परत खेचण्यासाठीं आक्रोश करीत होतीं असें दिसतें. शेवटीं नामदेवच विजयी झाला. त्यानें सर्वांना पंढरपुरास खेचलें आणि

**शास्त्राचें सार । वेदाचें गव्हर**
**सिद्धीचें सार । मुक्तीचें माहेर**

त्यांच्याहि पदरीं टाकिलें !

जीवनांत अशी स्थिरस्थावर झाल्यावर नामदेव निर्वेधपणें हरिगुण गायनांत तल्लीन झाला आणि त्याला त्याच्या कुटुंबियांनीं साथ दिली. त्याच्या घरांतील दासी जनी हीमुद्धां सर्वांबरोबर रंगून गेली.

गुरूपदेशानें कृतार्थ झाल्यावर ज्ञानेश्वरादिकांच्या बरोबर नामदेवानें तीर्थयात्रा केली. तीर्थयात्रा शके १२१८ मध्यें पंढरपुरीं समाप्त झाली. त्यानंतर ज्ञानदेवाच्या समाधीचा अत्यंत हृदयद्रावक प्रसंग नामदेवानें पाहिला. सोपानदेव, मुक्ताबाई आणि निवृत्तिनाथ यांनींहि भराभर जगाचा निरोप घेतला. नामदेवास पोरकें झाल्यासारखें वाटलें. पोरकेपण असह्य झालें. तें दुःख हलकें करण्यासाठीं, सुसह्य करण्यासाठींच त्यानें जीवनकथा लिहिली. ३५० अभंगांत ज्ञानेश्वरादिकांचा जीवनवृत्तांत अतिशय तन्मयपणें लिहून त्यांच्या वियोगाचें दुःख थोडेंसें तरी हलकें झालें असावें ! परंतु ज्ञानेश्वराच्या पाठोपाठ स्वराज्य गेलें. स्वधर्मावर आक्रमण होऊं लागलें. यवनांचा संचार सुरू झाला. अशा स्थितींत नामदेवानें भोंवतालचीं दुःखें डोळयाआड करण्यासाठीं पुन्हां एकदां तीर्थयात्रेस आरंभ केला. या वेळीं नामदेवाचें वय ४८ वर्षांचें असावें. या यात्रेच्या वेळीं ५।५०वारकरी मंडळी बरोबर होती. या तीर्थयात्रेंत नामदेव थेट पंजाबपर्यंत गेला. आणि तेथें त्यानें२०–२१ वर्षें वास्तव्य केलें. ( पां. स. १३८ ) त्याचीं ६०–६१ पदें शीखांच्या ' ग्रंथसाहेब ' या धर्मग्रंथांत समाविष्ट झालीं, इतकें नामदेवाचें हें ' आक्रमण ' प्रभावी ठरलें.

नामदेवानें पंजाबांत भागवतधर्माचा प्रचार केला आणि शिष्यशाखाहि निर्माण केली. भावलपूर येथें मठ स्थापन केला. घोमान येथें त्याच्या पादुकांची स्थापना झाली. त्याच्या तेथील शिष्यशाखेस बाबा नामदेवायी असें नांव मिळालें. नामदेवाबरोबर पंजाबांतून कांहीं शिष्य पंढरपुरास आले इतकें हें नामदेवाचें आक्रमण यशस्वी झालें.

दुसरी तीर्थयात्रा आटोपून नामदेव पंढरपुरीं परत आला त्या वेळीं त्याचें वय साठीच्या जवळपास होतें. राहिलेलीं २०–२१ वर्षे नामदेवानें पंढरपुरासच काढलीं. वयाच्या ८१ व्या वर्षी (शके १२७२ मध्यें) त्यानें पंढरपुरीं जगाचा निरोप घेतला.

## नामदेवकालीन परिस्थिति

ज्ञानेश्वरादिकांच्या प्रयाणानंतर महाराष्ट्रांत यवनसत्तेनें कल्लोळ माजविण्यास आरंभ केला. इ. स. १२९४ मध्यें अल्लाउद्दीन खिलजी एलिचपूरपर्यंत येऊन गेला. रामदेवरावानें खंडणी द्यावयाचें कबूल करून संकट परतविलें. परंतु इ. स. १३०६ मध्यें मलिक काफूरनें स्वारी केली आणि रामदेवराव दिल्लीचा मांडलीक झाला ! स्वराज्य जवळ जवळ नष्टच झालें. इ. स. १३१८ मध्यें राजधानी ( देवगिरी ) आणि स्वराज्य पूर्णपणें नाश पावलें ! नामदेवाचें वय त्या वेळीं ४८ वर्षांचें होतें.

दक्षिणेंत बहामनी राज्याची स्थापना इ. स. १३४७ मध्यें झाली. आणि त्यापूर्वीं किंवा त्या सुमारास यवन सत्तेस दक्षिणेकडे पायबंद घालणारें अतिशय विजयशाली असें विजयनगरचें साम्राज्य स्थापन झालें. वयाच्या ४८ व्या वर्षी नामदेवानें एका स्वराज्याचा नाश पाहिला आणि ७४ व्या वर्षी दुसऱ्या स्वराज्याचा उदयहि पाहिला.

परिस्थितींत असा अक्षरशः जमीनअस्मानाचा फरक झाला. तरी नामदेवानें ज्ञानदेवानें दाखविलेलीच 'सोय' स्वीकारिली. समाजाचें धार्मिक जीवन अबाधित राखण्याचें कार्य त्या मार्गानें झालें. नामदेवास तुर्कांनीं चालविलेल्या उच्छेदाची जाणीव होती, असें त्याच्या अभंगांतील उल्लेखावरून दिसतें :

**ऐसे देव देही । फोडिलें तुरकीं**
**घातले उदकीं । बोभातिना**

आणि या परिस्थितींतहि अभंग राहील अशी धार्मिकता त्यानें निर्माण केली.

**अभंगवाङ्मयाचें स्वरूपः**—नामदेवाचें वाङ्मय म्हणजे त्यानें वेळोवेळीं रचलेले अभंग. अभंगांचें स्वरूप भावगीतासारखें आहे. नामदेवापासूनच भावगीतात्मक अशा अभंगरचनेस आरंभ झाला. अंतःकरणांतील उत्कट भावना आत्माविष्कारासाठीं व्यक्त करणें एवढाच हेतु या काव्यांत आहे. 'नामदेव स्वतःच्याच अंतर्मुखवृत्तींत व अंतरंग-प्रेमोल्हासांत सर्वदा निमग्न असत.' (म. वा. इ. १–५७२)

उत्कटता हा या वाङ्मयाचा प्रभावी गुण आहे. इतरांना कांहीं सांग-ण्याचा, पटविण्याचा, शिकविण्याचा वा मतपरिवर्तनाचा त्यांत हेतु नाहीं. त्याचा तसा परिणाम झाला तरी तो त्या वाङ्मयांतील उत्कटत्वाचा प्रभाव होय.

नामदेवापासून Romantic lyrical काव्याचें युग सुरू झालें असें वा. ब. पटवर्धन म्हणतात.

जीवनांत 'अलौकिका'ची ओढ लागल्यापासून या काव्यास आरंभ होतो. त्या अलौकिकाच्या, दिव्याच्या, अस्फुट जाणीवेनें लौकिक जीवन नकोसें व्हावें, असह्य व्हावें, तों तों त्या जीवनाचे पाश जास्त जास्त जाणवूं लागावेत; संकटांचे आघात व्हावेत; ऐहिकाचें वैयर्थ्य अनेक कारणांनीं पदोपदीं पटावें आणि चिरंतन, शाश्वत याकडे जाण्याची उत्कट इच्छा वाढतच जावी; या यातनामय परिस्थितींतच अंतःकरणाचें शुद्धी-करण होत जावें; मग सुदैवानें गुरूचा लाभ व्हावा आणि गुरुपदेशाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करीत असतां ऐहिक, प्रापंचिक जीवनाशीं जास्त आत्मविश्वासानें झगडत राहावें; अशा स्थितींत कांहीं काळ गेल्यावर शेवटीं तें गुह्यांत गुह्य, आनंदसर्वस्व, शाश्वत सत्य हातीं लागावें, साकार होऊन उभें ठाकावें; मग अनिर्वचनीय आनंदाचा आस्वाद घेत, इत-रांनाहि उभारोनि बाहो त्या आनंदाचें वृत्त सांगत सुटावें. पण तेंहि

प्रचारकाच्या भूमिकेवरून नव्हे तर आत्माविष्काराच्या स्वाभाविक इच्छेनें
असें या नामदेवपुरस्कृत काव्यप्रकाराचें स्थूल स्वरूप आहे. त्यां
लौकिक जीवनाशीं झगडत असतां होणाऱ्या साधकाच्या यातना, तपश्च
आणि सिद्धावस्थेंतील अनिर्वचनीय आनंदाचें स्वरूप मनसोक्त पहावया
सांपडतें.

## नामदेवाचे अभंग

**अनेक नामदेवः**—नामदेवाच्या नांवावर अनेक नामदेवांची गह
झाली आहे. शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा नामदेवानें केली अ
त्याचे उद्गार प्रसिद्ध आहेत. परंतु नामदेवाच्या प्रसिद्ध गाथ्यांत सुम
२५०० अभंग आहेत. त्यांत प्रस्तुत नामदेवाचे ५००-६०० च अभ
असतील. राहिलेल्या अभंगांत विष्णुदास नामा, नामदेव आणि ना
यशवंत अशा तीन कवींचे अभंग आहेत ( पां. सं. १४३ ) त्यांत विष्
दास नामा याचे अभंग पुष्कळ आहेत. आपला प्रस्तुत नामदेव आप
उल्लेख ' नामा ' असाच करतो; विष्णुदास असा करीत नाहीं.

**नामदेवाचे अभंगः**—या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन नामदेवाच्या अ
गांतील वाङ्मयाचा विचार केल्यास प्रतिभा, भाषा, उत्कटता, इत्या
वैशिष्ट्यें त्यांत स्पष्ट दिसतात.

त्याच्या अभंगांचे तीन भाग पाडतां येतातः १ आत्मचरित्रपर २ ज्ञा
देवचरित्र, ३ पारमार्थिक चरित्रपर.

**आत्मचरित्रपरः**—अशा अभंगांत कौटुंबिक विरोध, ज्ञानदेवादिकां
भेट, विसोबा खेचराकडून गुरूपदेश हे तीन मुख्य प्रसंग आले आहेत.
अभंगांत आपल्या देवपिशामुळें आईबाप, बायको यांना किती यात
झाल्या, त्यांनीं किती काकुळतीनें आपणांस परतविण्याचा प्रयत्न केला
त्यांच्या मनःस्थितीशीं समरस होऊन वर्णिलें आहे.

या मायापाशांत आपली होणारी स्वतःची कुचंबणाहि वर्णन के
आहे आणि त्या कसोटीच्या प्रसंगीं मनाचा धीर टिकविण्याचें धै
वर्णिलें आहे. आईची विनवणी, संताप, धांवा बाचला; पत्नीची अग

कता, काकुलती पाहिली कीं, आपल्यालाहि नाम्याचा राग येतो; परंतु नामदेवाचें उत्तर कळलें कीं, त्याची धन्यता वाटते. साधक स्थितींतील अवस्थांचीं हीं उद्बोधक भावचित्रें आहेत.

ज्ञानदेवादिकांच्या पहिल्या भेटींत थोडी खडाजंगी झाली. नामदेवाच्या ठिकाणच्या भक्तीच्या अहंकारावरच मुक्ताबाईनें आणि गोरा कुंभारानें तडाखे मारले. त्या वेळीं 'ही संतमंडळी कपटी' आहेत असें नामदेव संतापून म्हणाला आणि तडक विसोबा खेचराकडे गेला. तेथें 'डोळियाचा डोळा' उघडल्यावरचा आनंद त्याला लाभला.

नंतर विठोबापुढें धरणें धरून बसल्यावर विठ्ठलाशीं झगडा सुरू झाला. त्या अवस्थेंतील अभंगांत देवावरच आर्वी आग पाखडली आहे. आपल्याला प्रपंचाच्या नादीं लावून,

**मेरूचिया गळां बांधोनि मशक**
**पाहासी कवतुक अनाथनाथा**
**नामा म्हणे देवा कळली तुझी माव**
**माझा मी उपाव करीन आतां**

असा संतापानें निर्धार केला; पण तरी शेवटीं मनांतली तळमळ बाहेर आलीच. 'घेसी तेव्हां देसी। ऐसा अससी उदार' असा देवाचा उद्धार केला. माझें सर्वस्व तूं घेई। तुझें नको नाहीं.

असें जोरांत सांगितलें तरी शेवटीं देवालाच बजावलें आहे :

**मजलागीं देवा जासी चुकवोनि**
**आणीन धरूनी तुजलागीं**
**दृढ भक्तिभाव प्रेमाचा हा दोरा**
**बांधीन सत्वर तुझे पायीं**

भक्तीचा आत्मविश्वास नामदेवाच्या ठिकाणीं जागृत झाला.

**पक्षिणी प्रभातीं चारियासी जाये**
**पिलूं वाट पाहे उपवासी**

अशी असहायता, व्याकुलता.

**तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस**
**तूं माझी माउली मी तुझी तान्हुली**
**गुंता भवपाश तोडी माझा**

गोरस वो घालीं प्रेमपान्हा अशी आर्तता साधकावस्थेंतील या उद्गारांत आहे.

पुढें नाममंत्र सिद्ध झाला, नामभक्ति फळास आली. देवानें 'माघार घेतली आणि भक्ताचा स्वीकार केला. त्या वेळीं

**सोलुनियां केळें साखरें घोळिलें**
**अंधारीं खादलें तरी गोड**

असा अमृतानुभव नामदेवास आला. त्याचें वर्णन शब्दांनीं कितपत होणार ?

## ज्ञानेश्वरचरित्र

ज्ञानेश्वरादिकांची जीवनकथा सांगणारे नामदेवाचे ३५० अभंग हा चरित्रवाङ्मयाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. त्या भावंडांचा बराचसा जीवनवृत्तांत नामदेवानें प्रत्यक्ष पाहिला होता, तन्मयतेनें पाहिला होता. त्यामुळें त्याचें वर्णन करतांना ते प्रसंग, त्या प्रसंगांतील व्यक्तींच्या स्वभावविशेषांसह त्याला हुबेहुब रेखाटतां आले आहेत. तें एक प्रकारें नामदेवाचें आत्मचरित्रच आहे.

नामदेवानें लिहिलेलें हें ज्ञानदेवचरित्र ऐतिहासिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाचें आहे. ज्ञानदेवाविषयीं समकालीन लेखकानें, निकट सहवासानें, तन्मयतेनें दिलेली माहिती ही आधारग्रंथ म्हणून महत्त्वाची आहे.

नामदेवाच्या ज्ञानेश्वरचरित्रांत आदिप्रकरण ३० अभंगांचें, तीर्थावळी प्रकरण ५९ अभंगांचें आणि समाधिप्रकरण २६६ अभंगांचें आहे. पांगारकर म्हणतात, 'समाधिप्रकरणाच्या अभंगांत नामदेवाशिवाय आणखी कोणाचा तरी हात शिरला असावा अशी कल्पना येते. कारण समाधिप्रकरणाच्या पुरवणींत नामदेवाची आळ (हट्ट) या नांवाच्या

चोवीस अभंगात भानुदास व कान्होपात्रा यांचीं नांवें आहेत. भानुदास व कान्होपात्रा ज्ञानेश्वरादिकांनंतर दोनशें वर्षांनीं झालीं. (म. वा. इ. १-४९९)

ज्ञानेश्वरचरित्रांत निरनिराळ्या व्यक्तींचे स्वभावविशेष त्याच्या उद्गारांत व्यक्त झाले आहेत. संवादात्मक असा भाग या दृष्टीनें विशेष वाचनीय आहे. ज्ञानदेवादिकांचे अलौकिकत्व पटल्यावर ब्राह्मणांची गोंधळलेली मनःस्थितीहि नामदेवानें बरोबर ओळखली आहे. सर्वांत बहार आहे ती समाधिप्रकरणांत. नामदेवाच्या डोळ्यांसमोर घडलेला प्रसंग आजहि, वाचकांच्या डोळ्यांसमोर उभा राहतो. शोकविव्हल अशा निवृत्तिनाथादिकांचें मूक दुःख नामदेवानें बोलकें केलें. आणि त्यांतच त्याचे स्वतःचेहि आर्त स्वर स्पष्ट ऐकूं येतात. 'आतां ऐसे कोणी होणें नाहीं' हे त्याचे उद्गार तळमळून, व्याकुळ अंतःकरणांतून निघाले आहेत !

## भक्त नामदेवजीकी मुखबानी

नामदेवास पंजाबातल्या मुक्कामांत भक्तश्रेष्ठ म्हणून अतिशय मान मिळत गेला. आपल्या उपदेशानें त्यानें तेथें आपली एक शिष्यशाखा निर्माण केली.

त्याचीं वचनें ( पदें ) शीखांचा आदिग्रंथ जो 'ग्रंथसाहेब' यांत समाविष्ट झालीं आहेत. ग्रंथसाहेबांत शीखांचे पहिले पांच गुरू व कबीर, रामानंद, सूरदास, इत्यादि १५ भक्तांचींहि पदें आहेत. त्यांत दक्षिण हिंदुस्थानांतील तीन भक्तांचीं पदें आहेत. ते तीन भक्त म्हणजे नामदेव, त्रिलोचन आणि परमानंद. तिघेहि पंढरपूरसोलापूरकडील रहिवासी होते. त्रिलोचनाचीं ४ व परमानंदाचें १ पद आहे.

नामदेवाचीं ६१ पदें आहेत. कबीराच्या खालोखाल नामदेवाचीं पदें आहेत. त्या पदसंग्रहास 'भक्त नामदेवजीकी मुखबानी' म्हणतात.

नामदेवाचीं हीं ६१ पदें निरनिराळ्या रागात आहेत. परंतु तीं रागात असलीं तरी रचना प्रायः अभंगवजाच आहे. उदा० 'आसा' रागांतील रचना अशी आहे:

**कहां करू जाती कहां करू पाती**
**राम के नाम जपु दिन राती**
**ईभे वीठलु उभे बीळलु**
**बिठलु विन संसार नहीं**

या पदांतील भाषा मराठी निश्चित आहे. मराठीचें हिंदी व पंजाबीवर हें आक्रमण आहे! या मराठी शब्द प्रयोगांवरून आणि विठ्ठल, 'छीपे के घरि जनमु दैला' महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेल्या नामदेवाच्या चरित्रांतील आख्यायिका, चमत्कार, इत्यादि या पदात आहेत. त्यावरून पंजाबांतील नामदेव हा पंढरपूरचा भक्तश्रेष्ठ नामदेवच होय याविषयीं संशय नाहीं.

कांहीं पदांत व अभंगांत विलक्षण साम्य आहे:—

**पांच कोसपर गऊ चरावत**
**चीत सु बछडा राखीअले**

(ग्रंथसाहेबांतील पद)

**धेनु चरे वनीं, वत्स असे घरीं**
**चित्त वत्सावरी, ठेवूनि फिरे**

—अभंग १५१६

## बाळक्रीडा आणि गौळणी

कृष्णभक्तीची गोडी अगदीं पोरांबाळांपर्यंत सर्वांना चाखतां यावी म्हणून नामदेवानें 'कुत्ना थमाल ले थमाल आपुल्या गाई' अशी बाल-भाषेंतहि रचना केली. त्यानें वर्णिलेल्या बाळक्रीडा (बाळकृष्णाच्या लीला) या बाळांना आनंददायक आणि प्रौढांना त्यांतील रूपका-विष्कारानंतर विशेष उद्बोधक होणाऱ्या आहेत. त्याच्या गौळणींत स्त्री-स्वभावांतील उत्कटता चांगली दिसून येते.

## नामदेवाचा नामपंथ

पारमार्थिक जीवनाची नामदेवास वाटणारी असह्य तळमळ, देवाच्या भेटीची आतुरता, आपल्या पूर्वकर्माबद्दल तीव्र अनुताप, आणि आपण उद्धारास पात्र ठरूं कीं नाही याबद्दलची शंकाकुलता, मायापाशाशी झगडतांना होणाऱ्या यातना, या अवस्थांतून पार पडल्यावर झालेल्या ब्रह्मानंदाच्या लाभाचें अनिर्वचनीय समाधान, सिद्धावस्थेंत आलेला आत्मविश्वास, स्वतः यशस्वीपणें आक्रमिलेल्या मार्गाची इतरांना अगदी गळी पडून केलेली शिफारस, अशीं विविध चित्रें नामदेवाच्या अभंगात आढळतात.

देवासाठी त्यानें केलेला धावा पाषाणासहि पाझर फोडील असा आहे. त्या उद्गारांत सहजपणें काव्यहि आलें आहे. आणि ती उत्कृष्ट भावगीतें झालीं आहेत. विठ्ठलानें त्याचा स्वीकार केल्यावर नामदेवानें आपला अनुभव इतरांना सांगितला. तीच त्याची शिकवण.

नामदेवाचें पारमार्थिक जीवन त्याच्या उद्गारातून जें व्यक्त झालें आहे तें पाहिल्यास त्यानें सर्व प्रवास केवळ स्वतःच्या भावबळावर यशस्वीपणें पुरा केला आहे असें दिसतें. गुरूपदेश झाला तरी त्याच्या यातना कमी झालेल्या दिसत नाहींत. मायामोहाशीं, षड्विकारांशी तो एकाकी झगडत राहिला. ना योग ना ज्ञान अशी त्याची स्थिति होती आणि तरी केवळ उत्कट भक्तीनें तो तरून गेला. नामभक्तीचा एक मोठा विजय त्यानें सिद्ध केला आणि तोच आदर्श होऊन बसला. भवार्तांना केवढी आशा वाटूं लागली ! संसारग्रस्त ज्ञानहीनांना केवढा धीर वाटूं लागला ! नामदेवाच्या बोलण्यांत अशींच माणसें प्रामुख्यानें त्याच्या डोळ्यांसमोर असावींत असें वाटतें.

नामदेवानें ‘ नामा ’चें इतकें विविधप्रकारें संकीर्तन केलें आहे कीं, त्याचें नामदेव हें नांव अतिशय सार्थ वाटतें. नामास त्यानें देवत्व आणलें ‘ नाम काय करूं शकत नाहीं ? ’ असें त्याचें आव्हानच आहे. थोडें बीं पेरून गाडाभर धान्य घ्यावें तसें नामाचें आहे. ज्या माउलीचे ओटीं विठ्ठलाचें नाम, विठो तिचे पोटीं गर्भवासीं ! नामावर श्रद्धा नसलेले शास्त्रोपंडित म्हणजे केवळ ग्रंथाचे राखणदार. निर्विकल्प मनानें नामस्मरण

केलें तर देवच भक्ताला धुंडीत येतो असें देवापेक्षांहि त्याचें 'नाम' श्रेष्ठ आणि बलवत्तर आहे.

परंतु नामाचें हें सामर्थ्य वर्णन करतांना गैरसमज निर्माण होण्या-इतकी अतिशयोक्ति नामदेवाच्या हातून झाली! त्याच्या उद्गारातून काव्य वजा न करतां इतरांना ते सिद्धांत वाटले आणि त्यामुळें भोळेपण वाढत गेलें. परंतु नामदेवास या नामपंथांतील तपश्चर्येची जाणीव होती.

**चंद्रसूर्यादि बिंबें, लिहिताती सांग**
**परि प्रकाशाचें अंग, लिहितां नये**
**नामा म्हणे कीर्तन, करिताती सांग**
**प्रेमाचें तें अंग, आणितां नये**
**वासनेरहित, होऊनि एकवट**
**असावें निकट, संतसंगें**

त्याचा स्वतःचा अनुभव तसाच होता. नुसत्या नामस्मरणानें त्याची स्वतःचीहि तळमळ थांबली नाहीं.

**विणा घेऊनियां करीं । उभा राउळामाझारीं**
**तहान भूक हारपली । छंद लागला विठ्ठलीं**
**कन्या पुत्र बाप माय । त्यांचा आठव तो नये**
**नामा म्हणे हेंचि देई । तुझे पाय माझे डोई**
**देह जावो अथवा राहो**
**पांडुरंगीं दृढ भावो.**

हे व असे अनेक उद्गार नाममहात्म्याबरोबरच लक्ष्यांत घेतले पाहिजेत. भोळ्याभाबड्या भाविकाना तें कळलें नाहीं आणि त्यामुळें नामदेवाच्या नामभक्तीनें भाविकांत भोळेपण वाढत जाऊन अत्रीं न पत्रीं अशी त्यांची स्थिति झाली. रामदासानें या स्थितींतून समाजास खडसावून जागें केलें हें पुढें कळेलच.

नामदेवानेंच या बाबतीत भोळया भाविकांना पुरेसें सावध केलें आहे.

**त्यागाविणें विरक्ति । प्रेमावांचूनि भक्ति**
**शांति नसता ज्ञाति । शोभा न पवे**
**पाया लागो स्वर्ग । वरि पडो आग**
**आत्मस्थिति भंग । नोहे नोहे**
**वावडी दुरीच्या दुरी, उडतसे अंबरीं**
**हातीं असे दोरी, परि लक्ष तेथें**
**नामा म्हणे असावें, भलतियां व्यापारीं**
**लक्ष सर्वेश्वरीं, ठऊनियां**

या नामपंथाच्या तपश्चर्येंत संतांवांचून, सद्गुरूवांचून पार पडता येत नाहीं. नामस्मरणानें जीवनाचें जें शुद्धीकरण आणि उदात्तीकरण व्हावयास पाहिजे त्याचे संत हे आदर्श आहेत.

**गुरुविण वर्म हातां नये**

नाम घ्यावेंसें वाटणें, सद्गुरूचा उपदेश अंगी लागणें ही 'दैवी' गोष्ट आहे. ती निसर्गदत्त देणगी आहे. धेनु विये वनी, तिसी कैंची सुइणी। तरी तें वत्स स्तनी। लावी कवण. भुजंगाची पिलीं, उपजतांचि वेगळीं, त्यांसि डंखूं शिकविलें हो कोणी. सहज लक्षण जयाचिये ठायीं। तो आपुलिये सोयी धांवतसे. परंतु तरी नामभक्तीचें सामर्थ्य एवढें आहे की, तें फोल ठरतच नाहीं. नामदेवाची प्रतिज्ञाच आहे. नाम घेतल्यावर,

**घेऊनि पूजेचा संभार**
**ब्रह्म येतसे समोर**
**नामा म्हणे जरि हें लटकें**
**तरि माझें छेदावें मस्तक**

नाममय तपश्चर्येचा मार्ग दाखवीत असता सगुणोपासनेंतील विशिष्ट देवतेच्या मूर्तीच्या पूजनास नामदेवानें फारसें महत्त्व दिलें नाहीं. सर्वांभूतीं देवाची ओळख पटणें ही त्याची भक्तीची कल्पना त्या काळीं तर विशेष उपकारक ठरली असावी. यवनसत्तेचा जारी अमल सुरू झाला

होता. 'तुर्क' देवळांचा उच्छेद करीत होते. 'देही' देवांची उपासना करणाऱ्या भक्तांचा कोंडमारा होत होता. अशा स्थितींत नामदेवानें भक्तीची सर्वव्यापक कल्पना भक्तांना पटविली.

देव दगडाचा, भक्त हा मायेचा
संदेह दोघांचा, फिटे कैसा
ऐसे देही देव, फोडिले तुरकीं
घातले उदकीं, वोभातीना
ऐसी लोह-दैवतें, नको दावूं देवा
नामा म्हणे केशवा, विनवीतसे

• भक्तीच्या बाजारांत बहुरूप्यांनीं-धंदेवाईक संतांनीं-गोंधळ माजविला होता. त्यांची सोंगें नामदेवानें चव्हाट्यावर आणिली आहेत.

बहुरूप्याचा नटा, माथां एक जटा
भस्म राख खोटा, हातीं दंड
टिळे टोपी माळा दावी
भोळया भाविकांसी गोवी

• जडीबुट्टी दाखविणारे, नागवेच हिंडणारे, उग्र तपाची व उपवासाची वर्तावणी करणारे, रागदारींत गाणीं गात, देवाऐवजी भक्तालाच रंजविणारे भोळया भाविकांचा नाश करीत होते. त्याचें खरें स्वरूप नामदेवानें दाखविलें.

तोंड धरूनि मेढा मारा
म्हणती सोमयाग करा
सजीवासी हाणी लाथा
निर्जिवपायीं ठेवी माथा
नामा म्हणे अवघें खोटें
एक हरिनाम गोमटें
सर्वाभूतीं समदृष्टी
हेचि भक्ति गोड मोठी

नामदेवानें असे कोरडे ओढले आहेत. पण अशी मर्मभेदी टीका करणें हा नामदेवाचा स्वभाव नाहीं. भोंदूंनीं नाडलेल्यांवरच त्याचें सारें लक्ष आहे. त्या मार्गानें ज्यांची उपेक्षा केली होती त्यांचा कैवार घेऊन नामदेव सांगतो,

**न पढावे वेद, नको शास्त्रबोध**
**साध्य भक्तिभाग्य, संतसंगें**
**नव्हे ब्रह्मज्ञानें, न होयें वैराग्यें**
**अभ्यासिलें वेद, झाला शास्त्रबोध**
**प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं**

तोंपर्यंत वांझेच्या स्तनाला लागून काय पोट भरेल?

नामदेवास भोंदू भक्तांचा संताप येई. पण तरी त्यांच्याबद्दलहि त्याचा जीव तिळतिळ तुटे! अज्ञानी माणसाप्रमाणेंच ज्ञानी असून भोंदू असणांचाहि उद्धार झालाच पाहिजे असें त्यास वाटे. त्यांच्यासाठींहि नामदेवानें प्रार्थना केली:—

**येक विद्यावंत, ज्ञातीच्या अभिमानें**
**ते नेलें तमोगुणें, रसातळा**
**नामा म्हणे कृपा, करूनि ऐशा जीवा**
**सोडवा केशवा, मायबापा**

ज्ञानेश्वरांच्या अद्वैतभक्तीचें अंतरंग नामदेवास कळलें होतें. त्यानें तें अंतरंगात ठसविलें होतें, तरी त्याचें मन आणि वाणी हीं सगुणोपासनेंत इतकीं रंगून जातात कीं, त्यापुढें अद्वयानंदाची आठवणहि होऊं नये.

**त्रिभुवनींचें सुख, आलें भक्तिमुखें**
**तें हें विठ्ठलवेषें अवतरलें**

हा आनंद त्यानें परोपरीनें वर्णन केला तरी शेवटीं तो म्हणे,

**सेवी तोचि चवी जाणे**
**येरा सांगतां लाजिरवाणें**

सगुणोपासनेचा परमोत्कर्ष म्हणजे—

**केशव तोचि नामा**
**नामा तोचि केशव**

नामदेवानें स्वतः संसारास निग्रहानें बाजूस करूनच पुढील मार्ग चोखाळला. संसार करून परमार्थ साधण्याचा असा प्रयोग करण्याचा विचारहि त्याच्या मनांत आला नाही. मग तो इतरांस संसाराची शिफारस कशी करणार? लक्ष सर्वेश्वरी ठेवोनियां । संसार करावा. असें त्यानें मधून मधून सांगितलें तरी,

**संसारसागर, भरला दुस्तर**
**विवेकी पोहणार, विरळा संत**

इतकेंच नव्हे तर—

**संसार करितां, देव जें सांपडे**
**तरि कां झाले वेडे, सनकादिक**
**नामा म्हण आतां, सकळ सांडोन**
**आलोंसे शरण, विठोबासी**

असा नामदेवाचा सरळ सवाल आहे.

**गृहस्थाश्रमु न सांडितां**
**कर्मरेखा नोलांडितां**

असा 'नाभ्यासितां' साधतां येणारा भक्तियोग ज्ञानेश्वरानें सांगितला. त्यावर ज्ञानेश्वराच्याच या 'शिष्या'नें वरील शंका स्वानुभवानें विचारली आहे. ही शंका बिनतोड ठरली आणि संसाराशी कडकडीत वैर धरणें हा परमार्थ मार्गाची पूर्वतयारी असाच पायंडा पडत गेला.

"त्यानें (नामदेवानें) गृहस्थाश्रम सोडला नाही. पण या आश्रमाला अवश्य ती संसाराची काळजी मात्र त्यास घेतां आली नाही. त्याची भक्ति थोडी फार भोळी व खुळी झाली. भक्तीला समजाची व ज्ञानाची जोड राहिली नाही...नामदेव हा भक्तिमार्गात भक्ति कशी करावी याचा कित्ता होऊन राहिला." (म. सा. १–१५५).

## ९ आध्यात्मिक लोकशाही

ज्ञानेश्वर आणि नामदेव यांनीं केलेल्या तीर्थयात्रेंत जी भक्तमंडळी सामील झालीं त्यांत बिसोबा खेचर (ब्राह्मण), परिसा भागवत (ब्राह्मण), चोखा मेळा (अस्पृश्य), सांवता (माळी), इत्यादि होते. नामदेवाच्या हरिकीर्तनांत त्याचा पहिला शिष्य परिसा भागवत (ब्राह्मण), नरहरि सोनार (सोनार), गोरा कुंभार (कुंभार), जोगा परमानंद (तेली), जगमित्र नागा (ब्राह्मण), सेना न्हावी (न्हावी), यांनीं एकमुरानें हरि-नामाचा गजर केला. हे आणि असे असंख्य लोक भक्तिपंथात दाखल झाले. जात, व्यवसाय, ज्ञान, इत्यादि गोष्टींसंबंधींचे भेद या पंथांत विलीन झाले. ही अतिशय महत्त्वाची घटना या काळांत घडून आली.

या संतमंडळांतील व्यक्तींच्या घरांतील बायकामुलेंहि हरिनामाचा आनंद लुटीत होतीं. चोखामेळा बरोबर बायको आणि मेहुणा यांनींहि अभंगद्वारां आपला आनंद व्यक्त केला आहे.

कान्होपात्रा ही एका नायकिणीची मुलगी होती. तिनेंसुद्धां विठ्ठलाच्या पायाकडे धांव घेऊन आपलें सार्थक केलें.

**कुळ जाति वर्ण**
**हें आवघेंचि गा अकारण**
**भलतेणें भावें**
**मन मज आंत येतें होआवें**
**आले तरी आघवें।**
**मागील वावो।**

हा ज्ञानेश्वराचा उपदेश नामदेवाच्या काळांतील संतमंडळानें प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविला.

या वैष्णव मंडळांतील व्यक्तींचें फार थोडें वाङ्मय उपलब्ध आहे.

या सर्वांत गोरा कुंभार (श. ११८९–१२३१) हा वडील होता. म्हणून त्यास गोरो काका म्हणत. नामदेवास मार्गदर्शन करणारा गोरोबा श्रेष्ठ ज्ञानी भक्त होता. गोरोबाचे फक्त २० अभंग उपलब्ध आहेत.

**सांवता माळी** ( श. ११७२–१२१७ ) हा हरिनामस्मरणांत इतका तल्लीन असे कीं आपला माळ्याचा व्यवसायच त्यानें विठ्ठलमय करून टाकला. त्याचे २३ अभंग उपलब्ध आहेत.

नामदेवास सर्वांभूतीं ईश्वर असल्याची खूण सांगणारा **विसोबा खेचर** हा सराफीचा व्यवसाय करणारा ब्राह्मण होता. ज्ञानेश्वर व सोपानदेव यांनीं त्यास भक्तिमार्ग दाखविला. योग व ज्ञान या दोन्ही मार्गांचा तो अधिकारी होता. शके १२३१ मध्यें तो मरण पावला.

आधीं कट्टर शैव असलेला आणि शेवटीं विष्णुदास झालेला **नरहरि सोनार** योगमार्गाचाहि आनंद उपभोगीत होता. त्यास गैनीनाथाचा उपदेश होता. तो श. १२३५ त मरण पावला. त्याच्या नांवावर ३४ अभंग आहेत.

जगमित्र झालेला नागेश हा ब्राम्हण आधीं लक्षाधीश होता. दैवयोगानें दारिद्र्य आल्यावर तो **जगमित्र नागा** झाला. त्यानें श. १२५२ मध्यें समाधि घेतली.

जन्मानें यातिहीन असून भावबळानें संतपदास पोहोंचलेला **चोखा मेळा** नामदेवाच्या कीर्तनानें हरिनामात तन्मय झाला. तो शके १२६० मध्यें गावकुसू अंगावर कोसळून मंगळवेढ्यास मरण पावला. नामदेवानें त्याच्या अस्थि पंढरपुरास आणून महाद्वारीं समाधि बांधली.

बेदरच्या बादशहाचा खास नापित असा **सेना न्हावी** आपला व्यवसाय करीत असतांच उपरति होऊन विठ्ठलचरणीं लागला. त्यानें स्वानुभवपर अभंगांप्रमाणेंच कृष्णचरित्रावर गौळणी रचिल्या. त्याच्या नांवावर दीडशें अभंग आहेत. तो शके १३७० मध्यें हयात होता.

'भागवत ऐका' (परिसा) असें सर्वांना सांगणारा **परिसा भागवत** हा पंडित ब्राम्हण, नामदेवाचा पहिला शिष्य होय. उच्च वर्णीयत्वाचा अभिमान सोडून त्यानें नामदेवास लोटांगण घातलें !

बार्शी येथील तेली जोगा हा, परमानंद नांवाच्या गुरुचा शिष्य होता. तो गीतेचें अत्यंत निष्ठेनें पठण करीत असे.

मंगळवेढें येथील श्यामा नायकिणीची मुलगी कान्होपात्रा हिनें आपलें सौंदर्यसंपन्न तारुण्य 'पुरुषोत्तमाच्या' (विठ्ठलाच्या) चरणीं वाहिलें आणि जीवनाचें सार्थक केलें. ' पतित तूं पावना ' असा टाहो फोडीत तिनें श. १३९० मध्यें विठ्ठलासमोर देह ठेविला.

जनाबाई:—संत मालिकेंमध्यें मुक्ताबाईखेरीज इतकी श्रेष्ठ स्त्री आढळत नाही. तिचे अनुभवाबद्दलचे अभंग उत्कट आहेत. तिचें सर्व जीवन हरिमय झालें होतें. ' दासी 'ची कामें करीत असतां आपल्या कामास हरी हातभार लावतो अशी तिची भावना होती. ज्ञानेश्वरांच्या संगतींत असतांना परमेश्वराच्या प्राप्तीची आर्तता आणि ती पूर्ण झाल्यानंतर लाभलेलें अपूर्व समाधान हीं दोन्ही तिच्या अभंगात आढळून येतात. तिचे अभंग ही उत्कट भावगीतांची एक मालिका आहे. आध्यात्मिक अनुभवाखेरीज कृष्ण जीवनातील, विशेषतः जलक्रीडेचें वर्णन, थालीपाक वर्णन, यांमधून जनाबाईची आकर्षक वर्णनशैली आणि स्त्रीमनातील स्वाभाविक असा भक्तिभाव दिसून येतो.

## आध्यात्मिक लोकशाहीचीं वैशिष्ट्यें

विविध व्यवसायांतील या भक्तांनीं आपापल्या व्यवसायावरच वेदांत-पर अर्थ व्यक्त करणारी रूपकें रचिलीं. सांवता माळी, नरहरी सोनार, विसोबा खेचर, सेना न्हावी, जोगा परमानंद यांची अशा प्रकारची कविता आहे. विविध व्यवसायांतले शब्द वाङ्मयांत रूढ होण्याचा तो एक स्तुत्य पराक्रम होता.

यांतील कांहीं भक्तांच्या उद्गारांत योगमार्गानें येणाऱ्या अनुभवाचे उल्लेख आढळतात. परंतु त्यावरून त्यांनीं योग—हटयोग—मार्गाचा अवलंब केला असेल असें अनुमान करतां येणार नाहीं. कारण अनुहात नाद, ऐकूं येणें, इत्यादि अनुभव येण्याइतकी तन्मयता, उन्मनी अवस्था, सरळ भक्तिमार्गांतहि, प्राणायाम, आसनादि न करतांहि प्राप्त होते असें त्या मार्गांतील थोर अनुभवी गूढवादी सांगतात. म्हणून गोरोबा, सांवता, इत्यादिकांच्या कांहीं उद्गारांवरून ते योगाभ्यासहि करीत असत असें एकदम अनुमान काढतां येईल असें वाटत नाहीं.

आपला व्यवसाय हरिमय झाला हे या भक्तांचे उद्गारहि त्यांच्या वृत्तीच्या भूमिकेवरून वाचले पाहिजेत. नामदेवाप्रमाणें संसाराचे पाश तोडण्यासाठी त्यांनीं यातायात केली नसेल; परंतु यावरून ते जाणून बुजून, संसार यशस्वी करण्यासाठीं, 'नेटका' करण्यासाठीं संसारांत झटत होते असेंहि म्हणतां येत नाहीं. त्यांचें मागणें वेताचें होतें, समाधानाची उडी वेताची होती, एवढाच त्याचा अर्थ आहे.

संसारास सर्वतोपरी परमार्थाच्या पायरीपर्यंत नेण्याचा जवळ जवळ एकमेव यशस्वी प्रयोग एकनाथानें केला असें वाटतें.

ज्ञानदेव-नामदेवमंडळांतील या वैष्णव वीरांसंबंधी पागारकर म्हणतात :—

"वैष्णवांच्या या मेळाव्यात पुरुष आहेत, स्त्रिया आहेत, ब्राह्मणेतर आहेत, अस्पृश्यहि आहेत, ज्ञानी आहेत, व केवळ भक्तीनें मान्य झालेले साधेभोळेहि आहेत. पण सर्वजण जातिकुलादिकांच्या अभिमानापलीकडे गेलेले आहेत. परमात्मसुखापुढें व परस्परप्रेमापुढें त्यांना इतर कसलीहि आठवण नसे....हे सर्व संत संसारी होते व हरीला सर्वस्व वाहिल्यानें त्यांनी संसारच ब्रह्मरूप करून टाकला होता. महानुभावीयांची भिक्षावृत्ति व संन्यास या संतांना मान्य नव्हता. ते जातिकुलस्वभावें आलेलें संसार-कृत्य आनंदानें करीत...सर्वांचें अन्योन्यप्रेम इतकें होतें की, कोणीहि कोणाचेहि अभंग उतरून घेत....जोगा परमानंदाची कविता विसोबा खेचर, सांवता माळ्याची काशिबा गुरव व चोखा मेळ्याची अनंतभट्ट हे लिहून घेत....भेदभावशून्य एका श्रीहरीच्या परमानंदसुखात सर्व डोलत असत." ( म. वा. इ. १–५९६ ).

"हे संत म्हणजे शुद्ध व सात्त्विक भावाच्या प्रत्यक्ष सजीव अशा चालत्या बोलत्या मूर्तीच होत....वर्णसंकर करून जातिभेद न मोडता आपण सर्व एकाच ईश्वराची लेंकरें आहों असें म्हणून नीट नांदावें असें हे समजत व सांगत." ( म. सा. १–१७१ ).

या काळांतील वरील वातावरणास वा. ब. पटवर्धन आध्यात्मिक लोक-शाही ( Spiritual Democracy ) म्हणतात. या संतमंडळाची वैशिष्ट्यें प्रा. रा. द. रानडे यांनी स्पष्ट सांगितली आहेत.

या काळांतील भक्तमंडळात प्रत्येकाच्या ठिकाणी आपल्या दुबळ-पणाची, पतितत्वाची तीव्र बोचणी होती. मानवी प्रयत्नानें देवापर्यंत जाणें अशक्य आहे, सद्गुरूवाचून हा प्रवास पार पडणें शक्य नाहीं, अशी प्रत्येकाची दृढ श्रद्धा होती. आध्यात्मिक प्रगतीत प्रत्येकाचें वैशिष्ट्य दिसून येतें. प्रत्येकानें स्वतःच सर्व प्रवास पार पाडला.

या संतांचा संसाराविषयींचा दृष्टिकोन सांगताना प्रा. रा. द. रानडे यांनीं पागारकर यांच्यापेक्षां निराळें मत व्यक्त केलें आहे. रानडे यांच्या-मतें, संसार ईश्वरप्राप्तीच्या आड येतोच असा या मंडळांतील प्रत्येकाचा अनुभव. म्हणून संसार साधून परमार्थ साधण्यावर कोणाचाहि विश्वास नव्हता. दैनंदिन जीवनांतहि, नित्य कर्मांतहि ईश्वराची प्रचीति येते, सर्व हरिमय होऊं शकतें, हें या काळच्या कांहीं संतांनीं स्वतःच्या आचर-णानें दाखविलें. आपापले व्यवसाय करीतच कांहींनीं मोक्ष साधला. तरी सर्वांची भावना मात्र अशी की, ईशप्रेमापुढें इतर कोणत्याहि भाव-नेस हृदयांत स्थान राहात नाहीं. देव त्या दृष्टीनें मोठा मत्सरीच आहे ! सेना न्हावी, दासी जनी, गोरा कुंभार, सांवता माळी, इत्यादिकांनीं आपापले व्यवसायहि नीटपणें चालू ठेविले खरे; परंतु त्यांचे व्यवसाय त्यांच्या भक्तीच्या आनंदाच्या आड आले नाहींत एवढाच त्याचा अर्थ ! तसें झालें असतें तर त्यांनी संसाराच्या माथीं पाय ठेवूनच पुढें पाऊल टाकिलें असतें.

'It is true that these saints show that God could be realised in any walk of life but they also show that God is a very Jealous God who would not allow any love to be given to any other object beside Himself.

The conflict between a rightful performance of duty and an all-absorbing love of God has existed at all times and in all countries. But it seems that the saints of this period inclined the beam in the latter rather than in the former direction ( Mysticism in Maharashtra P.210 )

# १० अस्मानी–सुलतानी

नामदेव आणि त्याच्या वेळचें वैष्णववीरमंडळ यांच्यानंतर एकनाथाच्या काळापर्यंत दक्षिणेंत बहामनीशाही गर्जत होती. इ. स. १४९० मध्यें बहामनीशाहीचे तुकडे झाले आणि त्यांपैकीं दोन तुकडे, (एलिचपूरची इमामशाही आणि अहमदनगरची निजामशाही हे) महाराष्ट्रांतच स्वतंत्रपणें नांदू लागले. त्यांचे संस्थापक मूळचे हिंदु ब्राह्मण होते. त्यामुळें त्यांच्या मुसलमान राजवटींत हिंदूंना थोडेंफार संरक्षण मिळूं लागलें.

इ. स. १३५० ते १४९० या काळांत मराठी वाङ्मयाकडे पाहिल्यास शंभर दीडशें वर्षांच्या वाङ्मयेतिहासाचीं पानें 'गुप्त' झालेलीं, सरसकट चालू असलेल्या विध्वंसांत तीं भस्मसात् झालेलीं दिसतात !

या संहारांतून जीं थोडीं पानें बचावलीं त्यांतील मजकुरावरून या काळांतील अस्मानी-सुलतानीची कल्पना येते.

समाजसंस्थांचा पूर्णपणें उच्छेद झाला होता. जो तो पोटासाठीं लाचारी पत्करून जगण्याची धडपड करीत होता. थोडेफार कर्तबगार होते त्यांनीहि आपल्या कर्तबगारीनें यवनसत्तेस हातभार लावण्याचाच मार्ग स्वीकारला. या धांदलींत मुसलमानांच्या राजसत्तेबरोबर त्यांच्या भाषेनेंहि मराठीवर आक्रमण केलें. फारशी भाषेस राजाश्रयानें महत्त्व मिळालें आणि राजसत्तेच्या संबंधामुळें व्यवहारांतहि फारशी शब्दांना स्थान मिळालें. परंतु व्यवहारी जगापासून अलिप्त राहिलेल्या स्त्रियांनी मात्र मराठी भाषा टिकविली. त्यांचीं गाणीं, कहाण्या, भूपाळ्या, आरत्या, इत्यादिकांत मराठी जिवंत राहिली.

सामाजिक व धार्मिक दुरवस्थेबद्दल कधीं त्वेष तर कधीं विषाद व्यक्त करणारे उद्गार नामदेवापासून तों तुकारामरामदासापर्यंत ऐकूं येतात. या दुरवस्थेंत यवनसत्तेबरोबरच एका मोठ्या दुष्काळाचीहि भर पडली ! या 'अस्मानी' संकटांत 'सुलतानी' संकटानें, जेमतेम तग धरून राहिलेल्यांची दाणादाण झाली. अनेक कुटुंबांनीं देशांतर, स्थलांतर केलें. परंतु या

धांवपळींत महाराष्ट्राबाहेरील प्रांतांतून मराठींत शब्दसंपत्ति आली आणि या संकटाचा भाषासमृद्धीच्या कामीं थोडा फार उपयोग झाला. परंतु या वाईटांतून असें चांगलें फारच थोडें हातीं लागलें.

ज्ञानेश्वराच्या परंपरेंतल्या मराठी ग्रंथकारांत चांगदेवाचा गुरु **वटेश्वर** याच्या **तत्त्वसार** ( श. १२३४ ) या ग्रंथांतल्या १०३६ ओव्यांपैकीं ४०० ओव्या हातीं लागल्या आहेत. हा ग्रंथ योगमार्गाचा उत्कर्ष काल दाखविणारा आहे. त्या मार्गात पुरुषाबरोबर स्त्रियाहि पारंगत होत होत्या असें ग्रंथांतील उल्लेखांवरूनच दिसतें.

**सत्यामळनाथाचें सिद्धांतरहस्य** १२ हजार ओव्यांचें आहे. सत्यामळ नाथाचा काल पांगारकरांच्या मतें श. १२०० ते १२७० असा आहे. ( म. वा. इ. २-१३ ) त्याच्या ग्रंथांत अध्यात्म, योग, भक्ति, इत्यादिकांचें रसाळ वर्णन आहे. मराठींतील पहिल्या पाच ओवीबद्ध ग्रंथांत त्यास स्थान मिळावें अशी त्याची योग्यता असल्याचें पांगारकर सांगतात ( म. वा. इ. २-६ ) या ग्रंथांतच ज्ञानेश्वराचें चरित्र आलें आहे.

**चोंभा** यांचें **उषाहरण** हें काव्य शके १३०० ते १३५० च्या सुमाराचें आहे. त्याच्या २५०० ओव्यांपैकीं ५७५ ओव्या सांपडल्या आहेत. त्यात ज्ञानेश्वराच्या भाषेची, वर्णनशैलीची छाप स्पष्ट आहे. फारशी शब्द एकहि नाहीं.

याच काळांतला **'अज्ञान'** कवीचा **वरदनागेश** हा ग्रंथ आहे. त्याच्या १८५० ओव्या आहेत. ग्रंथांत गहन वेदांताचें विवेचन आलें आहे.

**बहिरा जातवेद** ऊर्फ बहिरापिसा हा एक षट्शास्त्री वेदांती श. १३५० च्या सुमारास होऊन गेला. त्याचा दशमटीकेवरील नुसता पूर्वार्धच ४५ हजार ओव्यांचा आहे.

अशा परमार्थपर ग्रंथांपेक्षां व्यावहारिक विषयांवरच जास्त ग्रंथरचना या काळीं होत असावी. ज्ञानेश्वरीनंतर १००-१२५ वर्षांनीं पंचतंत्र गद्यरूपांत मराठींत अवतीर्ण झालें. श. १३७० च्या सुमारास झालेल्या **निर्मळ पाठकानें** गद्य पंचतंत्राचें ( श. १३०० ) ओवीमध्यें संकलन केलें.

मराठींत पहिलें **अठरा पर्वें महाभारत** लिहिणारा कवि **विष्णुदास नामा** एकनाथाच्या जवळ जवळ समकालीन असावा. हें पहिलें मराठी महाभारत १८ ते २० हजार ओव्यांचें असावें. ( म. सा. १–२४८ )

विष्णुदास नामा याची आणखी एक विशेष रचना **बुधावात्रणी** ही आहे. तीन स्वरानुक्रमानें आरंभ व व्यंजनानुक्रमानें आरंभ असलेल्या ओव्या आहेत. मोरोपंतांच्या मन्त्ररामायणरचनेचा हा २०० वर्षांपूर्वी झालेला आरंभ होय ( म. वा. इ. २–५८० )

अस्मानी सुलतानीच्या काळांत जिवंत राहिलेल्या या ग्रंथांत राम व कृष्ण या अवतारांच्या कथांवर विशेष भर दिसतो. कदाचित् त्या काळीं या कथांच्या श्रवणानें वीरवृत्ति जागृत करण्याच्या हेतु या कवींच्या मनांत असावा असें भावे यांचें अनुमान आहे. ( म. सा. १–२०२ ) या हेतूबद्दल मतभेद झाले तरी ज्ञानेश्वर-नामदेव यांच्या काळापेक्षां निराळें वळण मराठी काव्यांत या काळीं सुरू झालेलें दिसतें. अर्थात् हेंहि अनुमान केवळ अल्पांशानें उपलब्ध झालेल्या ग्रंथसंभारावरून काढलेलें आहे. बराचसा संभार नष्ट झालेला आहे हें लक्ष्यांत घेऊनच अनुमानें करण्याचा थोडाफार प्रयत्न करता येतो.

## महानुभावांचें वाङ्मय

१३ व्या आणि १४ व्या शतकांतील महानुभाव वाङ्मयांत विविधता आहे हें सहज लक्ष्यांत येतें.

पंथातील विचार व आचार यांच्या उद्बोधनासाठी लिहिलेले असे कांहीं ग्रंथ आहेत. त्यांत पंथांतील श्रेष्ठ पुरुषांच्या चरित्रपर असे नागदेवचरित्र हा परशुरामाचार्यांचा गद्य ग्रंथ आणि खळोव्यास याचा दत्तात्रेयादिकांच्या लीला वर्णन करणारा **सह्याद्रिवर्णन** ( श. १२५४ ) हे ग्रंथ आहेत.

**सह्याद्रिवर्णन** ( शके १२५४ ) सात ग्रंथांत स्थान मिळालेला हा ग्रंथ राघवोपाध्ये उर्फ रवळो व्यास यानें लिहिला. या ग्रंथांत दत्तात्रयाचें लीलाचरित्र वर्णन केलें आहे. यांत दत्तमूर्तीचें वर्णन अतिशय काव्यपूर्ण भाषेंत

केलें आहे. त्या वर्णनांत उपासकाची उपास्याशीं झालेली तन्मयता दिसून येते.

ऋद्धिपूर या महानुभावांच्या पंढरपूरचें माहात्म्य वर्णन करणारे ग्रंथ नागदेवाचार्यांचा मुलगा महेश्वरपंडित, नारो व्यास बहाळे, रवळोव्यास यांनीं लिहिले. त्यांत रवळो व्यास यांचें **ऋद्धिपूरवर्णन** हें सात ग्रंथांत समाविष्ट होतें.

**ऋद्धिपूरवर्णन** ( श. १२८५ )

ऋद्धिपूर हें महानुभवांचें अत्यंत पवित्र असें धर्मक्षेत्र होय. भागवत धर्मीयांचें जसें पंढरपूर तसेंच महानुभावांचें ऋद्धिपूर होय.

या पवित्र स्थळीं गोविंदप्रभूंचें वास्तव्य झालें, चक्रधरास उपदेश मिळाला आणि पंथस्थापना झाली.

आद्य धर्मप्रवर्तकांच्या स्पर्शानें, सहवासानें पवित्र झालेल्या प्रत्येक बारीकसारीक ठिकाणांची व त्यासंबंधींच्या धार्मिक आचारांची माहिती या ग्रंथांत आली आहे.

नारायणपंडित व्यास उर्फ नारो बहाळिये यानें हें ६४५ ओव्यांचें कांव्य लिहिलें आहे.

भाविक यात्रेकरू धर्मक्षेत्राच्या दर्शनास निघाला आहे अशी भूमिका घेऊन कवीनें ऋद्धिपुराचें दर्शन घेतलें आहे.

**सासुरवासें शीणली**
**तियें भेटे जेवि माउली**

तसें ऋद्धिपूर पाहिल्याबरोबर कवीस झालें. स्थलवर्णनांत दिशा, मार्ग, स्वरूप, इत्यादींविषयीं अतिशय सूक्ष्मता दाखविली आहे. त्या स्थलाच्या दर्शनानें मनांत उचंबळणाऱ्या भावना उपमा, उत्प्रेक्षादिकाद्वारां अतिशय परिणामकारकपणें व्यक्त केल्या आहेत. या वर्णनांत शांत, करुण, उदात्त आणि भक्ति या रसांचा व प्रसाद, ओज, माधुर्य, औदार्य, इत्यादि गुणांचा आविष्कार झालेला आहे.

गोविंदप्रभूंच्या मूर्तीचें वर्णन करतांना नुसतें नाभिवर्णनच ५०-६० ओंव्या केलें आहे. अशा ठिकाणीं उदात्त आणि अद्‌भुत रस अनुभवास येतात.

तेथील वृक्षराजी, सरोवरें, पाक्षिगण यांच्या वर्णनांत अनेक सुंदर कल्पना आलेल्या आहेत.

कवीचें संसारतापाचें दुःख, उद्धाराची तीव्र तळमळ आणि पवित्र क्षेत्रसहवासानें लाभलेलें समाधान हीं सर्वत्र व्यक्त झालीं आहेत.

लीलाचरित्रांतील प्रसंग व हेतु यावर भाष्य करणारा 'हेतुस्थळ' हा ग्रंथ न्यायव्यास यानें श. १२७५ मध्यें लिहिला.

गीता हा महानुभावांनाहि अतिशय आदरणीय ग्रंथ आहे. प्रत्येक कालखंडांत महानुभाव कवींनीं गीतेवर टीका लिहिल्या आहेत.

तेराव्या शतकांतील 'ज्ञानप्रबोध' ही टीका सातहि ग्रंथांत समाविष्ट झाली आहे.

## ज्ञानप्रबोध : (श. १२५३).

पंडित विश्वनाथ बाळापूरकर यानें गीतेच्या १३ व्या अध्यायांतील ७ ते ११ या पाचच श्लोकांवर ही १२५ ओंव्यांची टीका लिहिली आहे. अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, इत्यादि गुणविशेषांचें अतिशय समर्पक उपमांनीं स्पष्टीकरण केलें आहे. हा प्रबंध नसून, भक्तीची जन्म-पत्रिका, विवेकाची मूर्ति दाखविणारा लोचन, लोहाचें कनक करणारा परिस आहे असें कवीनें मोठ्या आत्मविश्वासानें सांगितलें आहे.

नृसिंह पंडितानें गीतेंतील सिद्धांत सांगण्यासाठी लिहिलेली संकेतगीता १३८९ ओंव्यांची आहे. त्या ग्रंथांत पंथाबाहेरील ज्ञानेश्वरादि गीता-टीकाकारांचाहि उल्लेख आहे आणि ते केवळ शब्दार्थ सांगणारे असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

कृष्णमुनी याची ब्रह्मांडगोलक नांवाची गीताटीका (श. १४०३) हा २४५ ओंव्यांचाच ग्रंथ आहे. गीता संपल्यावरहि अर्जुनाच्या कांहीं शंका राहिल्या त्याचें निरसन श्रीकृष्णानें या टीकेंत केलें आहे.

चक्रधरादिकांच्या सहवासानें तीर्थत्व पावलेल्या स्थानांचें व लहान-मोठ्या वस्तूंचेंहि माहात्म्य वर्णन करणारा **स्थानपोथी** हा गद्य ग्रंथ मुनिव्यास यानें श. १२७५ मध्यें लिहिला

चक्रधराच्या उक्तींचा आचार, विचार आणि लक्षण, अशी विभागणी करून संकलन करणारा ग्रंथ गुर्जर शिवव्यास आणि सिद्धांते हरिव्यास यांनी श. १३२५ मध्यें रचिला आणि या **त्रिस्थळावर** शिव्यव्यासानें भाष्य ( लापणिका ) लिहिलें.

शास्त्रीय ग्रंथाचा प्रभावी उपक्रम करणारा मराठींतील आद्य व्याकरणकार महानुभाव पंडित भीष्माचार्य १३ व्या शतकांत झाला. त्यानें **पंचवार्तिक** ( भाषाशास्त्र ) व नामविभाक्ति (व्याकरणशास्त्र) हे ग्रंथ लिहिले. गोपाळपंडित उर्फ आने राजव्यास याचा **लक्षणरत्नाकर** हा न्यायशास्त्रावरील पहिला ग्रंथ श. १२१८ म्हणजे ज्ञानेश्वरीच्या वेळींच निर्माण झाला.

श्रीकृष्णजीवनाविषयींचें प्रभावी आकर्षण महानुभाव ग्रंथकारांच्याहि ठिकाणीं असल्याचें या काळांत दिसून येतें.

त्यापैकीं शार्ङ्गधर भोजने यानें लिहिलेल्या **महाभारतांत** स्वतःचा **नवरसनारायण** असा मोठा अभिमानपूर्वक उल्लेख केला आहे. नवरसाच्या आविष्कारासाठीं त्यानें महाभारतांत नसलेल्याहि गोष्टी घालून श्रीकृष्ण-कथेला निरालेंच रूप दिलें. श्रीकृष्णाच्या मूळ संस्कृत ग्रंथांतील चरित्राचा आधार घेऊन स्वैरविहार करण्याच्या प्रथेचें हें अनेकांपैकीं एक उदाहरण म्हणतां येईल ! नृसिंह पंडितानेंहि **रुक्मिणीस्वयंवरावर** २॥ हजार ओंव्या रचून मनसोक्त रसाविष्कार केला आहे.

नरेंद्राचें **रुक्मिणीस्वयंवर** हें सात ग्रंथांपैकीं मानिलें आहे.

## रुक्मिणीस्वयंवर ( श. ११९४ )

नरेंद्र आणि त्याचा भाऊ दोघेहि रामदेवराव जाधवाच्या दरबारीं होते. नरेंद्रास लहानपणापासून कृष्णभक्तीची अतिशय गोडी होती. त्यानें गायिलेली श्रीकृष्णकथा रामदेवरावास इतकी आवडली कीं, ती

आपल्या नांवावर नमूद करण्याची त्यानें इच्छा व्यक्त केली. नरेंद्रानें ती पुरी करण्याच्या निमित्तानें घरीं नेली. आपल्या काव्याचें अपहरण वाचविण्यासाठीं नरेंद्र रातोरात काव्य घेऊन पळून गेला आणि नागदेवाचार्यांकडे जाऊन राहिला. तेथें त्यानें पंथाची दीक्षा घेतली.

या काव्याच्या मुळांत १८०० ओव्या असाव्यात. त्यांतील ८७९ प्रसिद्ध झाल्या आहेत.

साहित्याच्या नर्तनानें जग नाचवीन असा आत्मविश्वास नरेंद्रानें व्यक्त केला आहे. त्याचप्रमाणें मराठी भाषेविषयीं कवीच्या मनांत मोठी श्रद्धा आहे.

**जिये भाषेचिये रसवृत्ती, सा भावांचे कुपे कीजेति निगुती**
**ते मऱ्हाठी कवण जाण निरूती, जें रसांचें जीवन.**

या श्रद्धेस व आत्मविश्वासास साजेसेंच हें काव्य आहे. महाकाव्यासारखा थाट बराच आहे. वर्णनें पुष्कळ आहेत. त्या वर्णनांत कवीचें शब्दभांडार किती समृद्ध आहे हें दिसून येतें. जलचरांची, वृक्षांचीं, वनस्पतींचीं, अनेक नांवें, त्याचप्रमाणें लाटांच्या नर्तनानें होणारे प्रतिशब्द, वास्तुकलेंतील, संगीतांतील पारिभाषिक शब्द, इत्यादि ठिकाणीं कवीचें शब्दवैभव दिसतें.

कथेंतील पात्रांचीं बाह्यरूपें आणि त्यांच्या मानसिक आंदोलनांचीं शब्दचित्रें अतिशय कौशल्यानें रेखाटलीं आहेत. रुक्मिणीची विरहावस्था हें अशा वर्णनाचें एक उदाहरण होय. चंद्रोदयाचें वर्णन हा वर्णन शैलीचा उत्कर्ष आहे.

महाराष्ट्रांतील अस्मानी सुलतानी संकटांच्या वेळींच ज्ञानेश्वर-नामदेवाच्या परंपरेंतला एकनाथ हा एक थोर भगवद्भक्त जन्मला.

---

# ११ एकनाथ

( इ. स. १५३३ ते १५९९ ).

चरित्रः—पूर्वजः भानुदासः आध्यात्मिक आणि आधिभौतिक दृष्ट्याहि संपन्न अशा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणाच्या घराण्यांत एकनाथाचा जन्म झाला. त्याचा पणजा भानुदास (श. १३७० ते १४३५) हा स्वतः सूर्योपासक होता म्हणून त्यास भानुदास हें नांव मिळालें. त्याच्या घराण्यांत नामदेवाप्रमाणें विठ्ठलाची उपासना होती. भानुदास व्युत्पन्न ब्राह्मण असून व्यापार करीत असे. व्यापारांत त्यानें सचोटीनें पुष्कळ धनसंचय केला.

भानुदासाचा नातू सूर्यनारायण हाच एकनाथाचा पिता. एकनाथाच्या आईचें नांव रुक्मिणी. एकनाथाच्या जन्मकालाबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. भावे शके १४७० देतात, आजगांवकर श. १४५० देतात, पांगारकर श. १४५५ सांगतात. एकनाथाचे आईबाप लहानपणींच वारले. त्याचें पालनपोषण आजोबा चक्रपाणी यानें केलें. वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत आजोबांच्या छत्राखालीं एकनाथानें काळ घालविला. परंतु त्यापूर्वीच त्याच्या मनास निराळा ध्यास लागला होता. देवगडास जनार्दनस्वामी नांवाचे साधुपुरुष होते. त्यांची कीर्ति एकनाथाच्या कानांवर आली आणि एक दिवस, वयाच्या दहाव्या वर्षींच तो घर सोडून जनार्दनस्वामीच्या सेवेंत रुजू झाला ! जनार्दनस्वामींच्या सेवेंत कांहीं वर्षे घालविल्यावर श. १४८० मध्यें स्वामींनीं त्यास उपदेश दिला, एकनाथ 'एका जनार्दन' झाला. अनुग्रह होण्यापूर्वी जनार्दनस्वामीजवळच एकनाथानें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचा अभ्यास केला. गुरूच्या मार्गदर्शनाप्रमाणें एकनाथानें देवगडास सुलभ नांवाच्या डोंगरावर सहा वर्षे तपश्चर्याहि केली. आणि नंतर गुरूच्या कृपेनें नाथाना सगुणसाक्षात्कार झाला. नंतर नाथांनीं जनार्दनस्वामीबरोबर तीर्थयात्रेस आरंभ केला. यात्रेंत पंचवटीस असतांना नाथांनीं ग्रंथरचनेस आरंभ केला. चतुःश्लोकी भागवतावरील टीका हा त्यांचा पहिला ग्रंथ वयाच्या बाविसाव्या वर्षी लिहिलेला आहे.

चतुश्लोकी भागवतानंतर त्र्यंबकेश्वरीं जनार्दनस्वामींनीं नाथांना निरोप दिला. त्यानंतर उज्जयिनी, मथुरा, काशी, प्रयाग, गया, अयोध्या, द्वारका, इत्यादि तीर्थक्षेत्रांचें दर्शन घेऊन यात्रा पुरीकरून पैठणास नाथ परत आले.

जनार्दनस्वामींनीं अनुज्ञा दिल्यावर नाथांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला. नाथांच्या पूर्वपुण्याईनें त्यांस गिरिजाबाईसारखी पत्नी लाभली.

वयाच्या २५ व्या वर्षी गृहस्थाश्रमधर्म स्वीकारल्यावर एकनाथांनी संसारालाच परमार्थाचें मोठें साधन करून टाकिलें आणि चारित्र्याचा एक अतिशय उज्ज्वल आदर्श निर्माण केला.

पैठणास भागवतरचनेस आरंभ झाला. श. १४९२ त पूर्वार्ध पंचाध्यायी पैठणास झाली. तिची प्रत कोणा शिष्यानें काशीस नेली. भागवताचें मराठीकरण करण्याच्या या ‘भयंकर’ कृत्यामुळें तेथील पंडित संतापले. नाथांनीं काशीस जाऊन शास्त्रीपडितांचें समाधान केलें आणि मणिकर्णिकाघाटावर पुराण सांगत एकादश पूर्ण केला. श. १४९५ च्या कार्तिकांत ग्रंथ पूर्ण झाल्यावर त्या ग्रंथाची काशींत मिरवणूक निघाली. मराठी भाषेचा विजय नाथांनीं या ग्रंथानें गाजविला, तोहि संस्कृत भाषेच्या आद्यपीठांत संस्कृत पंडिताकडून ! भागवताचें प्रवचन चालू होतें, त्याच काळांत नाथांनीं **रुक्मिणीस्वयंवर** रचलें. (श. १४९३–१४९५) नाथांचा हा पहिला चरित्रपर किंवा पौराणिक ग्रंथ होय.

**ज्ञानेश्वरीसंशोधन :**

ग्रंथलेखन, कीर्तन, पुराण, इत्यादि नित्यक्रम चालू असतां नाथांनीं श. १५०५ मध्यें एक मोठें कार्य केलें. तें म्हणजे ज्ञानेश्वरीच्या संशोधनाचें.

त्यांना एक दिवस दृष्टांत झाला कीं, समाधिस्थ ज्ञानेश्वराच्या गळयास अजानवृक्षाची मुळी जाऊन भिडली आहे ! ते आळंदीस गेले तों ज्ञानेश्वराच्या समाधिस्थानाची लोकांनीं पूर्णपणें उपेक्षा केलेली दिसली. समाधीभोंवतीं रान माजलें होतें ! नाथ त्या घोर रानांत शिरले आणि त्यांनीं

समाधिस्थान शोधून काढलें. समाधींतून बाहेर आल्यावर नाथांनीं ताब-डतोब ज्ञानेश्वरीसंशोधनास आरंभ केला.

पूर्वींच अतिशुद्ध असा तो ग्रंथ पाठांतरीं अशुद्ध झाला होता. तेव्हां निरनिराळे पाठ पाहून एकनाथांनीं एक अधिकृत प्रत तयार केली. शके १५०६ मध्यें हें संशोधनकार्य पूर्ण झालें 'अधिकृत' प्रतीच्या शेवटीं त्यांनीं क्षेपकांस बजाविलें कीं, ज्ञानेश्वरींत जो कोणी कांहीं भर घालील तो अमृताच्या ताटांत नरोटी ठेवणाऱ्यासारखा करंटा होय! या कार्यानें नाथ हे मराठी वाङ्मयाचे पहिले संशोधक ठरले.

नाथांनीं गृहस्थाश्रम स्वीकारल्यावर पैठण सोडलें नाहीं. पैठणास राहून गृहस्थाश्रमाचा आदर्श सिद्ध करण्याचें कार्य ते मरेपर्यंत करीत राहिले. वैष्णवाच्या कुळांत जन्म, बालपणीं लौकिक विद्येचा लाभ व बारा वर्षे जनार्दनस्वामीसारख्या सत्पुरुषाचा सहवास घडून अलौकिक अशा ब्रह्म-विद्येचाहि लाभ, थोडेंसें तीर्थाटण याप्रमाणें कृतविद्य झाल्यावर गृहस्थाश्रमाचा स्वीकार, असा नाथांच्या संसाराचा आरंभच गोड झाला.

(म. वा. इ. २-२१९)

परंतु गृहस्थाश्रमाचें यथासांग पालन होत असतां नाथ संसारपाशांत अडकले नाहींत.

**स्वजनधनस्त्रीपुत्रांसी।**
**नांदोनि जो नातळे त्यांसी।**
**स्वप्नघरवात जागृता जैसी।**
**तैसा साधूसी संसारु।**

अशा वृत्तीनेंच नाथांनीं संसार केला.

अखेरपर्यंत त्यांचें लेखन चालूच होतें. उत्तरवयांत **भावार्थरामायणाचें** काम चाललें होतें. पहिलीं पांच कांडें झालीं. सहाव्याचेहि ४४ अध्याय झाले आणि नाथांना आपला अंतकाळ आल्याची जाणीव झाली. त्यांनीं **भावार्थरामायण** तेथेंच थांबविलें. आणि इंद्रायणीवर कीर्तनास आरंभ

केला. अखेरचें कीर्तन करीत असतांनाच शके १५२१ मध्यें विकारी नाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ स रविवारीं त्यांनीं देहत्याग केला.

## ग्रंथरचना

चतुःश्लोकी भागवत, ( एकनाथी ) भागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ रामायण या चार ग्रंथांखेरीज हस्तामलक, शुकाष्टक, आनंदलहरी, गीता-सार, स्वात्मसुख, चिरंजीवपद, इत्यादि स्फुट प्रकरणें, प्रल्हादविजयासारखीं कांहीं आख्यानें व चरित्रें असें नाथांचें ग्रांथिक स्वरूपाचें लेखन आहे. स्फुट लेखनांत अभंग आणि सर्वसामान्य समाजाच्या मनास विशेष रंजविणारीं अशीं भारुडें व पदें आहेत. सुमारें पाऊण लक्ष कविता नाथांनीं लिहिली.

### चतुःश्लोकी भागवत :

भागवताच्या दुसऱ्या स्कंधांतील नवव्या अध्यायांतील ४५ श्लोकांपैकीं ३२ ते ३५ या चार श्लोकांवर या १०३६ ओंव्या लिहिल्या आहेत. सृष्टि निर्माण करण्याच्या कार्यापूर्वी ब्रह्मदेवानें तपश्चर्या केली. आदि-नारायण प्रसन्न झाल्यावर त्यांनीं ब्रह्मदेवास या चार श्लोकांत गुह्यज्ञान दिलें. नाथांनीं ब्रह्मदेवाच्या भूमिकेशीं समरस होऊन नारायणाचें दर्शन-सुख मनमुराद भोगलें.

> चतुर्भुज घनसांवळा ।
> मकरकुंडलें कौस्तुभ गळां ।
> वैजयंति वक्षःस्थळा ।
> आपाद वनमाळा ।

रुळत आहेत असें तें ‘ दर्शन ’ त्यांनीं साक्षात् उभें केलें.
‘ सृष्टिरूपीं मीच वसे ’ हें नारायणाच्या उपदेशाचें रहस्य अनेक दृष्टां-तांनीं स्पष्ट केलें. ४ श्लोकांचा १०३६ ओंव्या इतका विस्तार करून तें गुह्यज्ञान अगदीं उघड केलें ! अध्यात्मविवरणाच्या या पहिल्या प्रयत्नां-

तच नाथांचें लौकिक जीवनाचें अवलोकन, अवघड विषयहि सुलभ करण्याची हातोटी व मराठीविषयींचा अभिमान हीं दिसतात.

### भागवत

भागवताच्या एकादश स्कंधावर ( शके १४९२ ते १४९९ ) ही १८८०० ओव्यांची टीका आहे. ज्ञानेश्वराचाच उपदेश भागवताच्या आधारें सांगतांना मूळ ग्रंथापेक्षां भोंवतालच्या सामाजिक परिस्थितीची जाणीव नाथांना होत असावी. त्यामुळें या ग्रंथांत केवळ फार विस्तारच आहे असें नाहीं तर पुनरुक्तीहि आहे. आणि ती योग्य हेतूनें केलेली आहे. ज्ञानेश्वरींतील भक्तिमार्गाचें संसारी माणसाच्या जीवतांतील महत्त्व पटवितांना आचारविषयक असा बराच विस्तार नाथांनीं केला आहे.

तीनशें वर्षांनंतर एकनाथानें ज्ञानेश्वराची समाधि, ग्रंथ, त्याप्रमाणेंच पंथाचाहि जीर्णोद्धार केला! दोघांचीहि विचारसरणी उपमारूपकादिकादि अलंकाराची घाटणी, भाषापद्धति बव्हंशी एक, कृष्णभक्ति एक, शब्द-रचना व वाक्यरचनाहि एका विशिष्ट प्रकारची! दोघांत इतकें पूर्ण ऐक्य आहे कीं, 'ज्ञानाचा एका' अशी म्हणच पडली. ( म. वा. इ. २-२२४ ).

### नाथ-भागवतांतील भागवतधर्म

ज्ञानेश्वरीची वाढविलेली आवृत्ति म्हणजे भागवत इतकें या दोन ग्रंथांत साम्य आहे. ज्ञानेश्वरींत ३०० वर्षांपूर्वी सांगितलेला मार्ग पुन्हां एकदां सांगणें जास्तच आवश्यक झालें होतें. ज्ञानेश्वराच्या वेळींच धार्मिक अराजक माजलें होतें. नतर यवनसत्तेचा आघात झाला आणि सामाजिक जीवनाची घडी पूर्णपणें विस्कटली होती. ज्ञानेश्वरांची पुण्याई पुरेशी ठरली नाहीं हें नाथाना दिसून आलें. धर्मगुरू जास्तच पोटार्थी झालेले आणि इतरेजन पोटासाठीं हातीं लागेल तो व्यवसाय करीत कसेंहि, कांहींहि करून जिवंत राहणें एवढाच धर्म ओळखत होते. विठोबाची जागा पोटोबानें घेतली होती!

**भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें**
**अग्निहोत्राचा सुकाळ । वडापिंपळासी काळ**
**म्हणती सोमयाग करा । मुख धरूनि मेंढा मारा**
**शेंदूर माखुनियां धोंडा । चाळविती पोरें रांडा**
**लटिका देव लटिका भक्त । लटिकें सर्ववात**
**फजितखोर ऐसे देव । तयांचे तोंडावर थुंकूं**

असा धर्माधर्माचा विलक्षण संकर झाला होता. ' भागवतधर्माचा नीट विचार करून त्याचें महाराष्ट्राला पटेल व पचनी पडेल आणि त्याला लाभदायक होईल असे उत्तम योगमार्ग व ज्ञानमार्ग हे दोनहि अव्यवहार्य म्हणून एकनाथानें ते सोडून दिले. आंधळे, पांगळे, थोटे, यांनाहि ईश्वरप्राप्ति होईल, खट नट, भोळे भाबडे, अज्ञान, अनाथ, अपंग हेहि तरून पार होतील–असा भागवतधर्म स्पष्टपणें दाखवून दिला. '

( म. सा. १-२४१ )

नाथांच्या डोळ्यासमोर प्रपंचांत सांपडलेलीं माणसें नेहमीं असत. त्यांना संसाराचें दुःखरूपहि पटे; परंतु तरी त्यावर मार्ग सांपडत नसे.

नाथांनीं अशांची तळमळ ओळखून सत्प्रवृत्त सांसारिकांस धीर दिला. द्रव्य गोमटें नाहीं व वोखटेंहि नाहीं. त्याचा जसा उपयोग करावा तसा होतो.

**" अर्थें परमार्थासी साधावें "**

हा मार्ग त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या आचरणानेंच दाखविला.

**दैवें जोडलिया धन । करावे पंचमहायज्ञ ।**
**बंधु स्वगोत्र स्वजन । त्यांची दरिद्रपीडा दारुण ।**
**निरसावी देऊन धन । हा मुख्यधर्म जाण श्रेष्ठत्वें ।**

कुटुंबियांचा कठोरपणें त्याग करण्याचेंहि कारण नाहीं. नामदेवासारखा ावजय मिळविणें सोपें नाहीं. एकनाथांनीं उलट असें सांगितलें कीं,

कुटुंब पीडूनी आपण। अन्यत्र द्यावें अन्नधन
तेंचि अधर्म परिपूर्ण। शुद्ध पुण्य तें नव्हे
चहूं आश्रमाहूनि उत्तम। आपुला जो निजाश्रम
तेथें स्थिरावोनि मनोधर्म। वर्णाश्रम चालवी
गृहस्थाश्रम न ओलांडितां। कर्मरेखा न ओलांडितां
निज व्यापारी वर्ततां। बोधु सर्वथा न मैळे

परंतु अर्थाप्रमाणेंच कुटुंबाचेंहि आहे.

जरी जाहली स्त्रीपुत्रगृहस्थिती। तरी न धरावी त्याची आसक्ती
सावध राखावी चित्तवृत्ती। परमार्थयुक्ति साधनें
इंद्रियें कोंडावीं न लगतीं। सहज राहे विषयासक्ती।

ज्ञानेश्वरानें व नामदेवानें हेंच वारंवार सांगितलें. परंतु तें कळलें तरी वळलें नाहीं. ह्मणून नाथांनीं पुन्हां जास्त खुलासा केला.

मनें करावें हरीचें ध्यान। श्रवणें करावें कीर्तिश्रवण
जिव्हेनें करावें नामस्मरण। हरिकीर्तन अहर्निशीं।
करीं करावें हरिपूजन। चरणीं देवालया गमन।
घ्राणीं तुलसी आमोदग्रहण। जिहीं हरिचरण पूजिले
वाढतेंनि सद्भावें जाण। चढतेनि प्रेमें पूर्ण
अखंड ज्यासी श्रीकृष्णभजन। त्यासी भवबंधन असेना
निजात्मप्राप्तीच्या उपाया। उभवूनियां चारी बाह्या
भक्त्याहमेकया ग्राह्यो। बोलिला लवलाह्या श्रीकृष्ण
निर्गुणाचा बोध कठिण। मनबुद्धिवाचे अगम्य जाण।
शास्त्रांसी न कळे ऊणखूण। वेदीं मौन धरियेलें
तैसी सगुणमूर्ती नव्हे जाण। सुलभ आणि सुलक्षण।
देखतां जाय भूकतहान। निवताहे मन सप्रेमें।

पण हा एक मार्ग झाला. शेवटीं कळलें पाहिजे कीं,

**सगुण आणि निर्गुण । उभयरूपें मीचि जाण ।**
**जैसे सुवर्ण आणि कंकण । तैसें अधिक जाण मद्रूपें ।**

तरी भक्ताला मात्र सगुणाचीच गोडी विशेष आहे,

**विधुरलें तें तृप होयें । थिजलें त्यापरीस गोड आहे**
**स्त्रीशूद्रादि आघवे । घालूनिया ये नावे ।**
**येकेचि खेपे स्वयें न्यावें । भजनभावें परतीरा ॥**
**भागवतधर्माचिये स्थिती । बाळीं भोळीं भवाब्धि तरती ।**
**सुखोपायें ब्रम्हप्राप्ती । होय निश्चिती सकळिका ॥**

प्रपंच जर टाकतां येत नसेल तर प्रपंचालाच ब्रह्मपदावर नेण्याचा मार्ग नाथांनीं दाखविला. ब्रम्हावेगळा पाहीं, प्रपंचू नाहीं सर्वथा । अशी जाणीव झाली कीं, प्रपंच ब्रम्हज्ञानाच्या आड येऊं शकत नाहीं.

**साखरच फणस प्रबळ । तेथे कांटे त्वचा बीजगोळ ।**
**अवघी साकरची केवळ । तेवीं ब्रम्हाचि सकळ जगदाकारें ।**

वस्त्राचीच बाहुली करावी, एकाच नटानें गाय आणि बाघ यांचें सोंग घ्यावें, तसें 'जगदाकारें ब्रम्हच प्रगट !'

अशी वृत्ति बाणली म्हणजे,—

**आश्रमधर्मी असतां । क्रियादि कर्मे आचरितां ।**
**मुक्तासी नाहीं कर्मबद्धता । अकर्तात्मता निजबोधें ।**

गृहस्थाश्रमाचें नाथांनीं असें विस्तृतपणें विवेचन केलें आहे. कुटुंबांतला वडील माणूस पोरांबाळांच्या संसाराचें गाडें सुरळित मार्गी लावण्यासाठीं जसा तळमळतो तशी तळमळ 'हें विश्वाचि माझें घर' मानणाऱ्या नाथांच्या अंतःकरणांत दिसते.

**सारांशः—**

अनुतापापासून अध्यात्ममार्गास आरंभ होतो. अनुतापानें चित्तशु-

द्धीस आरंभ झाल्यावर संसारांतील खोटेपणाची सारखी आठवण ठेवावी. शरीर व मन हीं नामस्मरणादि नवविधा भक्तींत गुंतवावींत. हें करीत असतां संसारांत धडपणें राहतां येईल; पण पुढच्या मार्गासाठीं संतसंग जोडावा. त्यांचें आदर्शजीवन धीर देत राहतें, सावध करीत राहतें. संत-संगतींत जीवनाचें शुद्धीकरण होत असतां गुरूचा शोध करावा. गुरूची ओढ लागणें हा जागृतीचा आरंभ होय. या अवस्थेंतील यातना साधकाची कसोटी पाहत असतात. गुरुकृपा लाभल्यावर आत्मसाक्षात्काराचा लाभ होतो. येथें साधकाचा प्रवास पूर्ण होतो. तो निर्भय होतो. मग 'सुखें असावें संसारीं !'

भक्तांचे तीन प्रकार नाथांनीं वर्णन केले आहेत. प्रतिमेसच देव मानणारा असा केवळ मूर्तिपूजक तो अधम भक्त. ईश्वरापेक्षां भक्तांस कमी लेखणारा आणि अभक्तांस हीन म्हणून दूर लोटणारा तो मध्यम भक्त. सर्वांभूतीं भगवंत ज्याच्या प्रत्ययास येतो असा स्वतः देवमय झालेला, देव होऊन देवास भजणारा तो उत्तम भक्त. पहिले दोन प्रकार नाथांच्या डोळ्यांसमोर होतेच. तिसऱ्या प्रकाराची विस्मृति झालेली होती. त्याची त्यांनीं जागृति केली.

" भागवतधर्म एकनाथांच्या प्राकृत ग्रंथांत जसा स्पष्ट आहे तसा तो कोठेंच नाहीं. एकनाथाच्या ग्रंथांत भागवतधर्म तर दिसलाच; पण चरित्रांतहि दिसला. भागवतधर्म चरित्रांत दाखविणें हें एकनाथाचें विशेष भाग्य होतें. भाळीभोळीं कशीं तरतील हा विचार त्याच्या मनांत होता.
( मा. गो. रानडे )

रुक्मिणी स्वयंवर :

भागवताचें काशीस लेखन चालू असतांच नाथांनीं रुक्मिणीस्वयंवर या अत्यंत लोकप्रिय आख्यानावर १८ प्रसंग रचून एकूण १७११ ओव्या लिहिल्या. भागवत व हरिवंश या ग्रंथांच्या आधारें नाथांनीं रुक्मिणी-स्वयंवर लिहिलें तरी स्वतः पुष्कळच भर घातली आहे. मूळच्या १४४ श्लोकांवर नाथांनीं १७११ ओव्या रचिल्या आहेत.

हें स्वयंवराख्यान लौकिक जीवनांत ज्या प्रसंगांची, भावभावनांची विशेष गोडी असते अशा भागांनीं अतिशय लोकप्रिय झालें आहे. कृष्णावतारांत मानवी स्वरूपाच्या अनेक लीला झाल्या. एकनाथानें त्यांचें अतिशय समरसतेनें वर्णन केलें आहे. रुक्मिणीच्या विवाहसमारंभाचा मूळचा ५ श्लोकांचा भाग ६०० ओव्यांनीं रंगविला आहे. युद्धवर्णन १७ श्लोकांच्या आधारें ३२० ओव्यांचें झालें आहे. श्रीकृष्णस्वरूपाचें वर्णन तर बहारीचें आहे.

रुक्मिणीच्या वृत्तीचें सुंदर शब्दचित्र नाथांनीं रेखाटलें आहे.

**रुक्मिणीपत्रिका:**

मनें वाचा काया । निर्धारेंसी तुझी जाया
मी झालेंसें यदुराया । विधिविवाह तुवा कीजे
तूं तंव पर गा प्रकृति । नावडे स्त्रियांची संगति
उपेक्षिसी माझी विनंति । थोर अपकीर्ति तुज तेव्हां
मी तंव तुझें अर्धांग । केवि शिशुपाळ शिवेल माझें अंग
तूं शिरावरी असतां श्रीरंग । मी वीरभाग यदुवीरा

**श्रीकृष्णवर्णन:**

अतिसुरंग चरणतळें । उपमे कठिण रातोत्पळें
बाल सूर्यांचेनि उजाळें । तैसीं कवळें टांचांचीं
पिळूनी इंद्रनीळकिरळीं । ओतिली कृष्णतनु सांवळी
पाउलें सुकुमार कोंवळीं । घोटी निळीं दोन्हीं भागीं
सुनील नभाचिया कलिका । तशा आंगोळिया देखा
वरी नखें त्या चंद्ररेखा । चरणपीयूषा लुब्धल्या

त्या वेळीं जे लौकिकाचार रूढ होते तेहि या प्रसंगांत आले आहेत. एकनाथासारखा यशस्वी संसारी या विवाहप्रसंगीं अतिशय आपुलकीनें सर्व कांहीं जेथल्या तेथें घडवून आणीत आहे. गौरीहरपूजन आहे, रुसणीं

फुगर्णी आहेत, आहेर आहेत, सगळें काहीं यथास्थित आहे. देशस्थांतील विवाहसमारंभाचें मूर्तिमंत चित्र येथें आहे. परंतु नाथांचें एवढ्यावर समाधान झालें नाहीं. श्रीकृष्णाच्या संसाराचें परमार्थीकरण करण्यास ते विसरले नाहींत. लौकिक दृष्टीला जें जसें दिसतें तें तसें नसून तें अलौकिकाचेंच प्रतीक आहे हें सारखें बजावण्याचा नाथाचा अगदीं अट्टाहास असतो. भीमक कसा तर मूर्तिमंत विवेक ! एवढी सूचना मिळाली कीं पुढें मग एक रूपकच उभें रहावयाचें: श्रद्धा पत्नी, तिच्या पोटीं आलेली रुक्मिणी ती चिच्छक्ती, ती पांच भावंडांहून धाकटी म्हणजे पांचा विषयाचे पोटीं । सुबुद्धि उपजे जैंवि गोमटी । रुखतावरसुद्धां हें अध्यात्माचें पाणी शिंपडलें आहे ! भावार्थाचें ताट, त्यांत शुद्धमतीनें स्वानंदरस वाढला ! वऱ्हाडाच्या मिरवणुकीचा थाट पाहतांनासुद्धां हवया जळत होत्या त्या ममतेच्या, अतिलोभाच्या चिंचुदऱ्या, अहंकाराचे बाण, क्रोधाचे भुइनळे ! असें हें 'दारूकाम' नाथ दाखवितात. रुक्मिणी कृष्णाची निंदा करीत असली तरी कृष्ण अगुण आणि ( रुक्मिणी ) सगुण असें नाथ वेदांतसूचक बोलत राहणार !

कथाप्रसंगांतील निरनिराळ्या व्यक्तींचे स्वभावविशेष अचूक ओळखून ते नेमक्या शब्दात चित्रित केले आहेत. श्रीकृष्णरूपवर्णन ऐकतांच रुक्मिणीचें, आंग जाहलें रोमांचित । कंठीं बाष्प पै दाटत, अशा ठिकाणीं एकनाथांच्या ठिकाणचें कवित्व दिसतें. तसेंच युद्धप्रसंगाच्या वर्णनांत शब्दसंपत्तीचें वैभवहि दिसतें. परंतु आपल्या सर्वस्वाचा उपयोग भागवतधर्माच्या पुनरुज्जीवनार्थ करण्याची त्यांची वृत्ति अशा कलात्मक विलासात फार वेळ रमतच नाहीं. तरी **रुक्मिणीस्वयंवर** हें सर्वांत मोठें व सर्वांत लोकप्रिय असें नाथांचें आख्यान आहे. कारण त्यांत कथापर व ज्ञानपर अशा दोघांचीहि सोय आहे.

**भावार्थरामायण :**

एकनाथानें पूर्ववयांत कृष्णकथा गायिली. उत्तर वयांत ही रामकथा गायिली. या ग्रंथांत ४० हजारांवर ओव्या आहेत. त्यांपैकीं नाथाच्या २५

हजार आहेत. बाकीच्या नाथांचा शिष्य गावबा याच्या आहेत. हा ग्रंथ नाथ पूर्ण करूं शकले नाहींत. तो गावबानें पूर्ण केला.

( म. वा. इ. २--४०३ )

इतकेंच नव्हे तर जयरामात्मज या आणखी एका कवीनेंहि नाथांच्या या रामायणास हातभार लाविला !

रामाचें जीवन फारच कडकडीत आणि खडतर आहे. त्यांत लौकिकाचें आध्यात्मीकरण करण्यांत अतिशय तत्पर व कुशल असा नाथासारखा कवि आणि त्याचें हें उत्तरवयांत लेखन चाललेलें. दशरथ म्हणजे दशेंद्रियें, कौसल्या म्हणजे सद्विद्या, कैकयी ते अविद्या, आत्मप्रबोध तो लक्ष्मण, भावार्थ तो भरत जाण अशा थाटांतच कथेस मुळीं आरंभ झाला. दशरथ कौसल्येला शोधूं लागला. ती भोगभुवनांत नव्हती, मध्यमेच्या माजघरांत नव्हती...मग दशरथानें द्वैताचा अडसर बाजूस करून शब्दांची कडी काढली, तेव्हां अद्वैतसुमनशालेंत ती त्याला दिसली !

रामायणांत आध्यात्मीकरणाबरोबरच तत्कालीन परिस्थितीच्या रोखानें व्यक्त केलेले विचारहि आहेत. पोटभरू अहंकारी ब्राह्मणांची, नामधारी संन्याशांची, हिंसक याज्ञिकांची केलेली निर्भत्सना रामायणकालापेक्षां नाथकालास सुसंगत आहे. उदा० रावणाच्या मुलानें रावणास केलेला उपदेश हा तत्कालीन यवनांकडे पाहूनच नाथांनीं केलेला दिसतो. कौसल्येच्या डोहाळ्यांच्या वर्णनांत त्या वेळच्या महाराष्ट्रास आपला सुप्त संताप आणि प्रसुप्त आकांक्षा यांचेंच चित्र दिसलें असेल.

**लंका जाळा रे भडभडा। पाडा तडतडा राक्षस।**
**राक्षसांच्या शिरकमळीं। खेळूं लंकेपुढें चेंडूफळी।**
**तोडा नवग्रहांची बेडी। सोडा देवांची बांधवडी**
**उभारा रामराज्याची गुढी। आज्ञा धडफुडी तिन्ही लोकीं**
**नासा रे जगाचीं दुःखें। त्रैलोक्य भरा रे सुखें**

**स्फुट प्रकरणें:--**

या मोठ्या ग्रंथांखेरीज एकनाथांचीं कांही स्फुट प्रकरणें आहेत. **हस्तामलक** ( ओवी ६७४ ) ही एका दरिद्री ब्राह्मणाच्या, जन्मतःच जीवन्मुक्त अशा मुलाची कथा आहे. त्याच्या देहातीत अवस्थेचें वर्णन करून एकनाथानें जीवन्मुक्ताची ओळख करून दिली आहे. **शुकाष्टक** ( ओ. ४४७ ) **स्वात्मसुख** ( ओ. ५१० ) **आनंदलहरी** ( १५४ ) **गीतासार, आनंदभुवन, चिरंजीवपद** हीं अशीच अध्यात्मपर स्फुट प्रकरणें आहेत.

' कीर्तनें स्वधर्म वाढे ' हें एकनाथांनीं स्वतःच सिद्ध केलें. कीर्तनासाठीं आख्यानें लागत. त्यानिमित्तानें नाथांनीं ५।२५ आख्यानें व संतचरित्रें लिहिली आहेत. त्यांत कृष्णदान, कदर्यु आख्यान, इत्यादि अतिशय मनोवेधक आहेत. कृष्णरुक्मिणीविवाहप्रसंगीं हळद लावण्याच्या प्रसंगाचें वर्णन करणारे हळदुलीचे अभंग, धवळ्यांची आठवण करून देतात. नाथांचें अध्यात्म्य या प्रसंगांतहि आहे. ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु, सुदामा, इत्यादि भक्तश्रेष्ठांची चरित्रें नाथांनी भाविकपणें गायिलीं.

**भारुडें**—हीं एकनाथांचीं वैशिष्ट्यपूर्ण लोकगीतें आहेत. १२५ विषयांवर ३०० भारुडें नाथांनी रचिलीं आणि समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत आपला उपदेश पोहोंचविला. या भारुडांत महाराष्ट्राच्या समाजजीवनाची चांगली ओळख होते. त्यांत वाघ्ये, गोंधळी, कोल्हाटी, डोंबारी, फकीर, भुत्ये, रांडगा वाहणारे, जोगवा मागणारे, निरनिराळे खेळ करणारे असे बहुविध लोकांचे आचारविचार कळतात.

त्यांच्या लौकिक व्यवहाराचा आधार घेऊन, त्यांची भाषा आणि त्यांच्या कवनांचें बाह्य स्वरूप कायम ठेऊन त्यांतून त्यांना परमार्थाची ओळख नाथांनीं पटविली आहे !

**—शास्त्रपुराणें अनुवादती तुझा गोंधळ मांडिला वो। हातीं बोधाचा झेंडा। भेदरहीत वारीस मी जाईन। इच्छा मुराळिस पाहुं नका। बोध बुधली ज्ञान दिवटी। नांवरूप नाहीं याचे**

**पिसेपणीं । आंत दिसे बाहेर दिसे, या भुतानें लाविलें पिसे ·**
**अविवेक अंबुला अहंकार सासरा.**

असें रूपकात्मक लिखाण काही ठिकाणीं आहे.

**प्रपंच धोंडा मृगजळ पाणी। आपटित होते चोळी**
**विसरलें सुख घसरलें तळीं । धुतांच मोती जळीं हरपले**
**चला जाऊं पाहूं । चार सहा अठराजणी**
**दादला मारूनि आहूति देईन, एकटिच राहूं दे मला**

अशा गीतांत दडलेलीं ब्रह्मज्ञानरत्नें सर्वसामान्य भोळया भावड्यांच्या हातीं कशीं लागणार ?

या प्रकारच्या रचनेनें परमार्थाची परिभाषा समाजाच्या सर्व थरास परिचित झाली आणि मनोरंजनाच्या वेळीहि हें ज्ञान सारखें कानावर येत राहिल्यानें मनावर कांही संस्कारहि होणारच ! जीवनाच्या, समाजाच्या अंगोपांगी हरिभक्ति संक्रमित करण्याचा नाथाचा अतिशय उदात्त हेतु व कार्य या गीतांतहि दिसतात यांत शंका नाही.

पदें: बाळक्रीडेचे अभंग, गौळणी, इत्यादि रचना नाथांच्या भारुडापेक्षांहि जास्त लोकप्रिय झाली आहे. त्यांत मुख्य प्रसंगाचें अतिशय रसपूर्ण चित्रण आहे. राधेच्या भावनांत, स्त्रीमनाचें स्वाभाविक स्वरूप व्यक्त झालें आहे. बाळगोपाळांच्या लीला बालवृत्तीचें चित्तवेधक स्वरूप दाखवितात. पदांच्या शेवटीं अध्यात्माची नोंद असते. बाकी भागांत मूळ वर्ण्य विषयास पुष्कळ अवसर मिळालेला दिसतो.

बाळलीलेच्या अभंगांत बाळकृष्णाशीं नाथ तन्मय झाले. तर गौळणीमध्यें राधाकृष्णाशी तन्मय झाले. भागवतांत श्रीकृष्णापुढें ते उभे राहिले आहेत.

**वारियानें कुंडल हाले। डोळे मोडित राधा चाले**
**राधा पाहुनि भुलले हरि। बैल दुभे नंदाघरीं**
**हरि पाहुनि भुलली चित्ता, राधा घुसळी डेरा रिता**

अशा ओळींतून शृंगारांत अध्यात्म दडलेला आहे.

**भिंगाचें भिंगुलें। खांद्यावरी आंगुलें।**
**नाचत तान्हुलें, यशोदेचें, बाई यशोदेचें**

अशीं वात्सल्यपूर्ण पदें अध्यात्मावांचूनहि मधुर झालीं आहेत.

**अभंग—**

" अभंगात एकनाथाचें अंतःकरण जितकें उघड रीतीनें दृग्गोचर होतें तितकें तें त्याच्या इतर ग्रंथात होत नाहीं. एकनाथांचे इतर ग्रंथ बुद्धिवादाचे आहेत, पण अभंग अनुभवप्रधान आहेत. " असा प्रा. रा. द. रानडे यांचा अभिप्राय आहे ( सं. व. २ प्र. २९ )

केवळ वैयक्तिक असे एकनाथाचे जे अनुभव अभंगांतून व्यक्त झाले आहेत. त्यात गुरुकृपा आणि त्या कृपेनें झालेल्या साक्षात्काराचा अवर्णनीय आनंद यांविपयींचे अनुभव उत्कटपणें व्यक्त झाले आहेत. साक्षात्काराच्या अनुभवाचें हें शब्दचित्र पहा:

**सात्विकाभरणें रोमासीं दाटणें। स्वेदाचें जीवन येऊं लागे**
**कांपे तो थरारी स्वरूप देखे नेत्रीं, अश्रु त्या भीतरीं वाहतातीं**
**आनंद होय पोटीं, स्तब्ध जाला कंठीं, मौन्य वापुकुटीं, धरूनि राहे**
**हरिखाची गुढी बोभावा आला, अहंकर गर्जतु अविवेकु मारिला**
**संतोषें विवेक आपआपणियां विसरला,**
**लाजुनी महा हारुष आनंदासी गेला**

**पाहो गेलों देवालागीं, देवरूप जालों अंगीं**
**सुवर्णाचीं झालीं लेणीं, देव झाला जगपणीं**
**घटीं मृत्तिका वर्तत, जगीं देव तैसा व्याप्त**

याशिवाय भागवतादि ग्रंथांतून वारंवार आलेले विचार स्फुट स्वरूपांत अभंगातहि आले आहेत.

" ज्ञानेश्वराप्रमाणें बुद्धीस थराऊन सोडणारी अशी ग्रंथरचना जरी एकनाथानीं केली नाहीं, तुकारामासारखे अत्यंत हृदयस्पर्शी व कोमल असे अभंग जरी त्यांनीं लिहिले नाहींत, रामदासाप्रमाणें कर्मयोगित्वाचा बाणाहि त्यांनीं जरी पत्करला नाहीं, तथापि प्रपंच व परमार्थ यांची विलक्षण सांगड घालून संसारामध्यें असतांच परमार्थ कसा करावा हें त्यानीं जसें आपल्या उदाहरणानें सर्व लोकास शिकविलें त्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि संतानें शिकविलें नाहीं."

( प्रा. रा. द. रानडे सं. व २ प्र.३० ).

---

## १२ एकनाथाची प्रभावळ

एकनाथपंचक म्हणून ज्याचा उल्लेख करण्यांत येतो त्यांत एकनाथाखेरीज रामी जनार्दन, जनी जनार्दन, रेणुकानंदन व दासोपंत यांचा समावेश करतात. यांपैकीं, रामी जनार्दन व रेणुकानंदन यांची फारशी माहिती उपलब्ध नाहीं. 'जनांतच जनार्दन आहे' हें पटविणारा जनी जनार्दन यानें ७०० ओव्यांचा **उद्धवबोध** हा ग्रंथ लिहिला आहे. उद्धव व कृष्ण यांच्या संवादस्वरूपांत हा ग्रंथ लिहिला आहे. दासोपंत हा या पंचकांतला कवि मात्र आपल्या प्रचंड ग्रथरचनेनें अविस्मरणीय झाला आहे.

**दासोपंत** :

शक १४७३ मध्यें ब्रह्ममनी पातशाहींतील नारायणपेठ गांवीं देशस्थाच्या सुखवस्तु घराण्यांत दासोपंताचा जन्म झाला. त्यांचे वडील दिगंबरपंत नारायणगांवचे देशपांडे होते. १७।१८ व्या वर्षींच दासोपंत ईश्वराच्या भजनीं लागले. आंबे जोगाई ऊर्फ मोमिनाबाद येथें राहून त्यानें आजन्म दत्तोपासना व ग्रंथलेखन केलें. गीतेवरच त्यानें पांचसहा टीका लिहिल्या. एकूण २।३ लाखांवर मराठी कविता, शिवाय संस्कृत ग्रंथ एवढें प्रचंड लेखन दासोपंताखेरीज कोणी केलें नाहीं !

त्याच्या ग्रंथांपैकी गीतार्णव हा मराठी भाषेंत सर्वांत प्रचंड असा सव्वा लाख ओव्यांचा ग्रंथ आहे. सुबोधतेंहि तो श्रेष्ठ आहे. हें सगळें केवळ आत्माविष्काराच्या आनंदासाठीं केलें आहे. मीच वक्ता, 'मीच श्रोता. न पाहे श्रोतयांचें वदन, करी भाष्याधारें विवरण ! मानेल त्यानें घ्यावें, नावडे तेणें नेघावें !' असा दासोपंताचा डौल आहे ! आणि या डौलास शोभेसे लेखन आहे यांत शंका नाहीं.

मनोरंजक कथा, हरिदासी पद्धति आणि पुनरुक्ति ही मूळ ग्रंथविषयाच्या भरीस घातल्यानें हा अर्णव झाला आहे. परंतु तरी ग्रंथ कंटाळवाणा झाला नाही. कारण विषयांतर असलें तरी तें स्वतंत्रपणें अतिशय सुंदर व्यक्तिचित्र, वा प्रसंगचित्र झालें आहे. वीस वर्षे या ग्रंथाचें लेखन चाललें होतें (म. सा. १–२५८).

मराठीचें मोठेपण सिद्ध करतांना संस्कृताच्या व्याकरणाची थट्टा दासोपंतानें केली आहे. मराठींत संस्कृत इतके एका वस्तूचे भेददर्शक शब्दच नाहीत. तेंच मराठीत पहा. संस्कृतांत फक्त पाषाण हा एक शब्द; पण मराठीत गोटा, चिरा, खवलु, म्हैसाळा, बंडा, सिरसाळा किती तरी शब्द ! दासोपंत वरवर तुसडा वाटला तरी मोठा रसिक आहे. प्रसिद्ध झालेल्या १३ हजार ओव्यांत फक्त एकदांच स्त्रीसौंदर्यवर्णन आहे; पण तें मात्र स्त्रीचें तारुण्यसंपन्न, सौंदर्यसंपन्न असें मूर्तिमंत चित्रच ! हेंच कौशल्य एखाद्या ज्ञानतेजसंपन्न पुराणिकाचें चित्र रेखाटतांनाहि दिसतें ! तरी दासोपंत म्हणतात नावडे तेणें नेघावे । दोन्ही श्रवणीं । संस्कृताभिमान्याचें मुंडण करीत प्राकृत जनांवर दासोपंतानें रसांचा अगदी वर्षाव केला आहे ! दासोपंतानें ग्रंथांखेरीज पदेंहि लिहिली. तीहि १। लक्ष आहेत ! आणि तीं रागांत बसण्याजोगी आहेत. हा दत्तोपासक नाथसंप्रदायी शके १५३७ मध्यें समाधिस्थ झाला !

एकनाथपंचकाच्या बाहेर किती तरी ग्रंथकार या काळीं होऊन गेले. त्यांच्या वाङ्मयाची विषयवारीनें थोडक्यात ओळख करून घेऊं या.

पारमार्थिक ग्रंथरचना करणारांत शिवकल्याण, लोलिंबराज, जनार्दन, प्रेमदास, त्र्यंबकराज, मृत्युंजयस्वामी, शिवकल्याण, रंगनाथ मोगरे-

कर, रमावल्लभ, निरंजन, इत्यादि कवि होऊन गेले. त्यांत मृत्युंजय यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. तो श. १४४०–१४८० या काळांत होऊन गेला. हा मूळचा मुसलमान बहामनी राजघराण्यांत जन्मला. एक दिवस उपरति झाली. तो पंढरपुरास गेला. तेथें विवेकसिंधूचें त्यानें निरूपण ऐकलें आणि त्यास आत्मज्ञान झालें. त्यानंतर त्यानें वेदांतांतील गहन विषयांवर सोप्या आणि शुद्ध मराठी भाषेंत प्रकाशदीप, स्वरूपसाधन, पंचीकरण, इत्यादि ग्रंथ लिहिले. दशमस्कंधावर शिवकल्याण ( श. १४९०–१५६० ). यानें सव्वालक्ष ओंव्या लिहिल्या. ज्ञानेश्वराची त्यावर दाट छाया आहे. कृष्णचरित्रांतील अनेक लीलांवर रूपकें योजून त्यानें वेदांतपर अर्थ लाविला अमृतानुभवावरहि यानें टीका लिहिली. यानें आधीं गद्य टीका लिहून मग 'श्रवणापढणा उपयुक्त' अशी पद्यटीका लिहिली. रंगनाथ मोगरेकर यानें गीतेवर ११ हजार ओंव्याची टीका लिहिली. ( श. १५३० ) त्यात ज्ञानेश्वराच्या कित्येक ओंव्या जशाच्या तशाच घेतल्या आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं एक गोष्ट रचून अध्यायाचें महत्त्व पटविलें. पण त्या गोष्टी स्वारस्यशून्य व संदर्भहीन आहेत. त्याचा पंचरत्नटीका हा ग्रंथ उत्कृष्ट आहे. या ग्रंथातहि तत्त्वस्पष्टीकरणार्थ गोष्टी रचिल्या आहेत. परंतु सर्वच दृष्टीनें हा ग्रंथ मात्र सौभाग्य व सौंदर्य यांची खाण आहे ( म. वा. इ. २–५९५ ). योगमार्गाचा मार्ग सुलभ करून सांगण्याकरिता त्र्यंबक नांवाच्या ग्रंथकारानें बालबोध नांवाचा ५ हजार ओंव्यांचा ग्रंथ लिहिला. (श. १५००) 'जनामध्यें जनार्दन' पटविणारा ७०० ओंव्याचा 'उद्धवबोध' जनी जनार्दन यानें लिहिला.

शिवकल्याणानें दशमांतील २९ ते ३३ या पांच अध्ययांवर टीका लिहिली. या दशमावरील टीकेंत रासपंचाध्यायी हेंहि प्रकरण आहे. तें शृंगारसाच्या भाषेंतलें शांतिरसाचें व्याख्यान आहे. रासक्रीडेंत ज्या शब्दांनीं उत्तान शृंगार व्यक्त होतो त्यांचा कवीनें वेदातपर अर्थ लावण्याची पराकाष्ठा केली आहे! रमावल्लभदास या कवीनें गीतेचा थोडक्यांत व सहज अ· कळण्यासाठीं चमत्कारी टीका नांवाची टीका लिहिली. गीतेच्या अध्या

# १४ तुकाराम

( इ. स. १६०८-१६४९ )

आळंदी आणि पैठण यांच्याप्रमाणें देहूस भागवत धर्माच्या पीठाची योग्यता तुकारामामुळें आली.

**चरित्र :** तुकारामाचे वाडवडील देहू गावचे महाजन होते. त्याचे वडील बोल्होबा हे महाजनकीचें वैभव उपभोगीत व्यवहार व परमार्थ यशस्वीपणें साधणारे होते. त्या घराण्यांत पंढरीची वारी पूर्वापार चालत होती. तुकारामाचें घराणें मोऱ्यांच्या कुळांतलें असून त्यांचें आडनांव आंबिले. सधन आणि धर्मनिष्ठ अशा घराण्यांत तुकारामाचा जन्म श. १५३० मध्यें झाला.

तुकारामाच्या जन्मकालासंबंधीं भिन्न मतें आहेत. शके १५२० हा शक देहू व पंढरपूर येथील ज्या वंशावळींवरून मानतात ती फारशी जुनी नाहीं. ( तु. व. प्र. १ ) पांगारकरांनीं महिपतीच्या वचनाच्या आधारें १५३० हा जन्मशक दिला तोच त्यांतल्या त्यांत सर्वमान्य झाला आहे. वयाचीं १३ वर्षें तुकारामाचीं अतिशय आनंदांत गेलीं. वयाच्या १२ व्या वर्षी पहिलें लग्न झालें. पहिली बायको दमेकरी आहे असें आढळून आल्यावर वडिलांनीं पुढच्याच वर्षी दुसरें लग्न करून दिलें. ( म. बा. इ. २-६१५ ) वडील भाऊ सावजी पहिल्यापासूनच विरक्त होता. म्हणून तुकारामावरच वडिलांनीं हळू हळू सर्व कारभार सोंपविला. वयाच्या १२ व्या वर्षी वडील वारले (हर्षे तु. ७) आणि संसाराचा भार तुकारामावर पडला. तरी १७ व्या वर्षापर्यंत संसार आणि व्यवहार अतिशय सुखा-समाधानानें चालला. परंतु नंतर एकामागून एक संकटें कोसळूं लागलीं. आई वारली आणि नंतर शके १५५१ च्या दुष्काळाचा कहर गुदरला. त्यांत पहिली बायको, पहिला मुलगा, भावजय, हीं पटापट मरण पावलीं. धंदा बुडाला. गुरेंढोरेंहि विकावीं लागलीं, तरी उपासमार होऊं लागली. वडील भाऊ तीर्थाटनास निघून गेला. कोसळता संसार आवरण्याचा

तुकारामानें कांही दिवस जिवापाड प्रयत्न केला आणि शेवटीं पांडुरंगाकडे धांव घेतली. संसारतापानें पोळलेलें मन शांत करण्यासाठीं, अपरिहार्य दुःखें विसरण्यासाठीं स्वीकारलेला मार्ग हाच शेवटीं त्याचा जीवनपंथ ठरला ! प्रसंगानें आलेलें वैराग्य दिवसेंदिवस चित्तात ठसलें. आपल्या मालकीचें विठ्ठल मंदिर दुरुस्त करून तेथेंच भजनचिंतन करीत तुकाराम काळ घालवूं लागला. परंतु त्याची 'कर्कशा' बायको अवलाई ही त्याच्या या मार्गाचा वारंवार उपहास करून त्यास संसारांत ग्वेचीत राहिली ! तुकारामासहि संसार नाकारणें शक्य झालें नाही. याचा परिणाम असा झाला कीं, संसार आणि परमार्थ यांत सारखी ओढाताण होऊन तुकाराम व्याकुळ झाला. देवावर भार टाकून स्वस्थ बसावें असें त्यास वाटे. तरी तो अशा उदास मनानें जमेल तेवढा व्यापारधंदा करीतच राहिला. परंतु व्यवहारात सारखी फसवणूकच होत गेली.

शेवटीं तुकारामानें देहूपासून ६।७ मैल दूर असलेल्या भामगिरी डोंगराची वाट धरली ( हर्षे तु. २४ ). बायकोनें त्याला शोधून काढलें. तो घरीं येईना म्हणून ती त्यास तेथें भाकरी नेऊन देई. मनात अतिशय संतापत आणि संताप अत्यंत तीव्र शब्दात बोलूनहि दाखवून अवलाई तुकारामासाठीं तळमळतच होती ! तुकारामास भामगिरीस शेवटी नामदेवासह विठ्ठलानें दर्शन दिलें ! अभंगरचनेचें कार्य चालू ठेवण्याची आज्ञा मिळाली. अपूर्व समाधानाचा लाभ झाल्यावर तुकाराम घरीं परत आला. पांगारकरांच्या मतें त्यानें यानंतर विठ्ठल मंदिराचा जीर्णोद्धार करून गांवांतच हरिभजनाच्या सुखाची सोय केली ( म. वा. इ २– ६१८ ).

तुकारामानें भजनकीर्तनांत स्वकृत अभंग म्हणण्यास आरंभ केला. परंतु उपदेश करण्याचें 'ब्राम्हणा'चें काम करूं लागल्याबद्दल त्यास बहिष्कृत करण्याचा ब्राह्मणवर्गानें कट केला. रामेश्वर भटानें त्यांत पुढाकार घेतला. तुकारामाच्याहि मनांत उपदेशकाच्या अधिकाराबद्दल संशय उत्पन्न झाला असावा. अखेरचा निर्णय म्हणून त्यानें देवापुढें आपलें म्हणणें मांडलें. अभंगाच्या बह्या बांधून त्यानें त्या इंद्रायणीच्या स्वाधीन

केल्या आणि प्रायोपवेशानास आरंभ केला. तेरा दिवसांनीं त्यास 'संदेश' मिळाला कीं, 'कवित्व कोरडें आहे. उदकांतून काढावें !' वह्या पाण्यांतून वर येणें, त्या कोरड्या राहणें, इत्यादि उल्लेखाचा निदान एवढा अर्थ आहे कीं, तुकारामानें स्वतःची आणि इतरांची आपल्या कवित्वाधिकाराबद्दल खात्री पटविली. रामेश्वर भटासहि पश्चात्ताप झाला आणि तो तुकारामाचा पहिला शिष्य झाला. तुकारामाच्या जीवनांतील हा प्रसंग तत्कालीन समाजनीतीच्या दृष्टीनें उद्बोधक आहे. जन्मसिद्ध अशी कर्मविभागणी किती कडक होती हें ज्ञानेश्वरादिकांच्याहि जीवनांत दिसलेंच ! तुकारामाचा 'अनाचार' तर त्याहूनहि भयंकर ! परंतु ज्ञानेश्वरानें समाजसंस्थेच्या दंडक पाळण्याची तयारी दाखविली. शुद्धिपत्रासाठी यातायात केली. तुकारामानें त्यांत यश मिळविलें आणि आपला मार्ग निर्वेध करून घेतला !

त्याच्या जीवनात क्रांति झाली होती. जीविताचा हेतु त्यास कळला. 'करूं संतीं जें केलें' असा त्यानें निश्चय केला. 'आडरानीं भरलें जग' त्याला मार्गावर आणण्यासाठी 'पिटूं भक्तीचा डांगोरा' असें त्यानें ठरविलें. परंतु पाडुरंगाचें सगुण दर्शन झालें तरी त्यापुढील अनुभूतीची तीव्र तळमळ त्यांतूनच जागृत झाली. त्यासाठीं त्यानें तीर्थें धुंडाळीत गुरूचा शोध सुरू केला. पंढरपुरास गेला असता त्याला दृष्टांत झाला. त्याप्रमाणें तो ओतुर येथें गेला आणि जानू तेल्याच्या घरीं मुक्कामास असता रात्रीं स्वप्नातच त्यास केशवचैतन्य यांनी 'सांगितली खूण मालिकेची' आणि 'रामकृष्ण हरी' हा मंत्र दिला ( शके १५६१ हर्षे तु. ३१ शके १५५४ पांगारकर म. वा. इ. २–६१८ रानडे तु. व. प्र. २ ). तुकारामाच्या गुरुनामासंबंधीं मतभेद आहेत. परंतु तुकारामास मंत्रोपदेश करणारा केशवचैतन्य हा राघवचैतन्याचा शिष्य होय. त्यालाच बाबाजी म्हणत, असा निर्णय निळोबाचे अभंग आणि निरंजन रघुनाथ. कृत चैतन्यविजय या ग्रंथांच्या आधारें हर्षे यांनीं केला आहे ( तु. ३४ ). केशवचैतन्य शके १४९३ मध्येंच समाधिस्थ झाले. तुकारामास प्रत्यक्ष गुरुदर्शन, गुरुसेवा घडली नाहीं, तुकारामाच्या भगवद्भक्तीचा लौकिक

यापूर्वीच दूरवर गेला होता. कोल्हापूर येथील बाहिणाबाई हिनें तुकारामाचें शिष्यत्व स्वीकारलें ! सगुण दर्शन झालें, गुरुपदेश झाला, भक्त म्हणून मान्यताहि मिळूं लागली तरी अद्याप आत्मज्ञान लाभलें नाहीं याची रुखरुख तुकारामास वाटतच होती.

**देव म्हणून सांगितलें लोकां । माझा मीच देव दुःख पावे**
**पाहिजे तें आतां प्रत्यक्ष प्रमाण । आलीया तें साक्ष खरें खोटें**

असें त्यांस दुःख होत होतें ! तें दुःख वाढतच गेलें ! देवावर शिव्याशापांचा भडिमार होऊं लागला आणि प्राणार्पणाचाहि निश्चय झाला ! शेवटीं ब्रह्मानंद लाभला. जीवनाचें सार्थक झालें.

**सुख झालें सुख झालें । नये बोलों बोलतां**
**दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला**

असे 'ब्रम्हरसें गेलें भरोनियां अंग' तुकारामानें जाहीर केलें कीं, 'उरलो उपकारा पुरता !'

अनासक्त वृत्तीनें संसार चालू राहिला. ब्रम्हानंद प्राप्तीनंतरहि त्यानें संसारांत लुडबुडावें याबद्दल बराच गवगवा झाला आहे ! नामदेवाचाहि संसाराचा पसारा कांहीं कमी नव्हता. परंतु तो पसारा परमार्थप्राप्तीपूर्वीचा होय, असाहि त्याचा कैवार घेतां येतो ! परंतु तुकारामाची या काळांतील अनासक्त वृत्ती 'इहलोकीं आम्हा भूषण अवकळा' अशा उद्गारांत व्यक्त झाली आहे.

शके १५७१ मध्यें रामदास पंढरपुरीं गेले असतां तुकारामाची व त्यांची भेट झाली असावी.

**स्वर्गारोहण** : वृद्धापकाळामुळें पंढरपुरची वारी अशक्य झाल्यावर तुकारामानें वारकऱ्यांबरोबर पांडुरंगाला निरोप पाठविला आणि वारकऱ्यांच्या हातीं उलट निरोप काय येतो 'माहेरीचा काय येईल निरोप' त्याची तो वाट पहात बसला. ह्या त्याच्या मनस्थितींतच त्याला पांडुरंगाचें दर्शन झालें.

'पांडुरंगें मूळ पाठविलें' अशी त्याच्या मनांत भावना उत्पन्न झाली. पैल आले हरी। शंख चक्र शोभे करी। गरुड येतो फडकारे। नाभी नाभी म्हणे त्वरे। मुकुट कुंडलाच्या दीप्ती।

**मेघश्यामवर्ण हरी। मूर्ति डोळस साजरी**
**चतुर्भुज वैजयंती। गळां माळ हे रुळती**
**पीतांबर झळके कैसा। उळजल्या दाही दिशा**
**तुका झालासे संतुष्ट। घरां आलें वैकुंठपीठ**
**सकळहि माझी बोळवण करा। परतोनि घरा जावें तुम्ही**

ह्या जगाचा आणि जीवनाचा निरोप घेण्याची त्याला आतां फारच घाई झालेली दिसून येते. अंतःकाळीं विठोबा पावला आणि कुडीसह झाला मुक्त तुका ( श. १५७३ ) आपल्या निर्याणाचा प्रसंग वर्णन करतांना प्रत्यक्ष तुकारामानें, त्याच्या मुलानें आणि इतर साधुसंतांनीं जे उद्‌गार काढले आहेत त्यावरून तुकारामाच्या निर्याणपद्धतीविषयीं अतिशय अद्‌भुतता माजलेली आहे.

आपल्या अंतकाळचा प्रसंग वर्णन करतांना तुकारामानें कांहीं उद्गार काढले. त्याच्या मुलानें आणि इतरांनीं कांही नमूद केले. यांत अतिशय विसंगति आहे. त्या सर्व विविध उल्लेखांचा व त्यावरून काढलेल्या अनुमानाचा परामर्ष घेऊन हर्षे यांनीं त्यांतल्या त्यांत तर्कास सुसंगत असें अनुमान काढलें आहे तें असें : फाल्गुन वद्य प्रतिपदेस कीर्तन करीत असतांना मध्यरात्रीपर्यंत कीर्तन चाललें आणि कीर्तनाच्या रंगामध्यें सर्व माणसें दंग असतांना तुकाराम एकदम तेथून गुप्त झाला. आसपासच्या अरण्यांत त्यानें एकदोन दिवस काढले आणि त्यानंतर त्यानें जलसमाधि घेतली असावी. कीर्तनाच्या जागीं तुकारामाची गोधडी आणि टाळ ह्या वस्तु सांपडल्या. आपण सदेह स्वर्गास चाललों आहोंत ह्या तुकारामाच्या उद्गारांतील तात्त्विक अर्थाकडे फारसें लक्ष न देतां त्याचा वरवरचा अर्थ लक्षांत घेऊन तुकाराम खरोखरच सदेह स्वर्गांत गेला आणि भक्तांच्या समाधानासाठीं टाळ आणि गोधडी त्यानें पाठवून दिली असें भावड्या

भक्तांनीं आपल्या व्याकुळ अंतःकरणाचें समाधान मानून घेतलें. त्याचा देह हातीं लागूं नये हें मात्र एक गूढ आहे !

**शिवाजीची भेट**—१५७१ च्या सुमारास रामदासांची आणि शिवाजीची भेट झाली. रामदासाच्या भेटीनंतर शिवाजी तुकारामाच्या भेटीस आला आणि तुकारामाकडून त्यानें उपदेशाची अपेक्षा केली. तुकाराम किंवा रामदास ह्यांसारखे अधिकारी पुरुष भेटल्यावर कांहीं काळ शिवाजीच्या मनांत थोडसें वैराग्यहि निर्माण झालें असावें. किंबहुना वैराग्यापेक्षां ह्या साधुपुरुषांच्या जीवनांत दिसलेला आनंद पाहिल्यावर त्या आनंदाबद्दलचा लोभ त्याच्या मनात उत्पन्न झाला असावा. शिवाजीचें भाग्य असें की, ह्या दोन्ही साधुपुरुषांनीं त्याने हातीं घेतलेल्या कार्याविषयींच त्याला धीर देऊन, त्यास स्वराज्यस्थापनेच्या कार्यास परत पाठविलें.

शिवाजीस लिहिलेल्या पत्रात शिवाजी करीत असलेल्या कार्याच्या महत्त्वाची आणि शिवाजीच्या कर्तृत्वाची तुकारामास स्पष्ट जाणीव होती असें दिसतें. उदा० शिव तुझें नाम ठेविलें पवित्र। छत्रपति सूत्र विश्वाचें कीं। तुका म्हणे तुम्ही श्रीमत भाग्याचे। पूर्वींच दैवाचे हरीभक्त। व्रत नेम तप ध्यानयोग कळा। करूनि मोकळा झालासी तूं। ह्या प्रसंगाच्या अभंगांतच चातुर्यसागरा, छत्रपति, राज्याचे रक्षक, इत्यादि विशेषणें वापरली आहेत. शिवाजीस केवळ आशीर्वाद देऊनच तुकाराम थांबला नाहीं. शिवाजीच्या ह्या वृत्तींत कांहींशी चलबिचल आहे, कार्यकर्त्यास अशी वृत्ति चांगली नाही हेंहि तुकारामानें ओळखलेलें दिसतें. आपलें शिष्यत्व घेण्याची शिवाजीची इच्छा पाहून तुकारामानें उत्तर दिलें :

सद्‌गुरु रामदासाचें भूषण।
तेथें घाली मन चळो नको।
बहु ठायीं वृत्ती चालविली जेव्हां।
रामदास्य तेव्हां घडे कैसें।

हे अभंग प्रत्यक्ष भेटीचे पूर्वी लिहिले आहेत

**तुकारामाचा अनासक्ति योग :** तुकारामाचे असे ५-५॥ हजार अभंग असावेत. प्रसंगानुसार निरनिराळ्या वृत्ति मनांत उसळत. त्या त्या वेळच्या अभंगांत त्या व्यक्त झाल्या आहेत. ती उत्कट भावगीतें आहेत.

अभंगात आत्मनिवेदनपर असा एक भाग आहे. त्यात साधकाच्या यातना आणि खिन्नाचें समाधान अतिशय प्रभावी भाषेंत व्यक्त झालीं आहेत. दुसरा भाग म्हणजे स्वानुभवानें सिद्ध झालेल्या 'सुलभ' भक्ति-मार्गाचें अतिशय सुबोध पद्धतीचें विवेचन. या प्रकारच्या विवेचनांतील त्याचे विचार संतपरंपरेशी, नामदेवादिकांशी अतिशय जुळते आहेत.

संसारग्रस्तांना धीर देतांना संसाराचें मायावी रूप त्यानें वारंवार दाखविलें. आणि तें रूप ओळखलें म्हणजे

**सत्यवादी करी संसार सकळ ।**
**अलिप्त कमळ जळीं जैसे ॥**

सुखें असावें संसारीं । मग जवळच हरी. त्यानें स्वानुभवानें सांगितलें कीं—

भोगावरी आम्ही घातला पाषाण । भोगी झाला त्यागी गीतीं गातां पांडुरंग. 'देवावरी भार' टाकावयाचा हें खरें; परंतु, आधीं देह समर्पिजे देवा. मग राहिलेला अपरिहार्य भार देव भक्तासाठीं अंगावर घेईलच !

अनासक्ति किंवा विरक्ति म्हणजे संन्यास नव्हे ही तुकारामाची भावना स्पष्ट दिसते.

**जोडोनीया धन, उत्तम वेव्हारें ।**
**उदास विचारें, वेंच करीं ।**
**शांती रुपें नव्हे, कोणाचा वाईट ।**
**वाढवी महत्त्व, वडिलांचें ।**
**तुका म्हणे हेंचि, आश्रमाचें फळ ।**
**परम पद बळ, वैराग्याचें ।**

ज्याला सांसारिक जीवन व्यवस्थित जगतां आलें नाहीं आणि ज्याला संसारापासून मुक्तहि होतां येत नाहीं अशा दुःखी जीवांबद्दल तुकारामाच्या अभंगांत कळकळ दिसून येते.

'देवधर्म सांदी, पडले सकळ ।
विषयीं गोंधळ, माजतसे ॥

अशा लोकांना मुद्धां कुलधर्मआचाराचाच तुकारामानें उपदेश केला आहे.

'कुळधर्म ध्यान, कुळधर्म साधन ।
कुळधर्मे विधान, ह्रातां चडे ।
तुका म्हणे कुळधर्म, दावी तोवि देव ।
यथाविधि भाव, जरी होय ।

कांही नित्यनेमाविण अन्न खाय तो श्वानच होय. जो नेणें जातीचा आचार, तो भोगवी अघोर पितराशी ॥ ह्याप्रमाणें कर्म करीत असतांना प्रसंगीं येणारीं संकटें किंवा निराशा यांच्याशीं शूराप्रमाणें लढत राहिलें पाहिजे. सत्यासाठीं, सदाचारासाठीं संकटांचा स्वीकार करणें, त्यापायीं मरणहि पत्करणें अशा प्रकारचें शौर्याचें जीवन तुकारामानें सांसारिकांपुढें रंगविलें आहे.

ह्या त्याच्या भक्तीसंबंधानें, विष्णुदासाच्या धैर्यासंबंधानें, भिडे म्हणतातः "विष्णुदासाचें धैर्य सोशिकपणांत आहे. दुर्जनालासुद्धां आपल्या विरक्तीनें, निस्पृह बाणीनें वळणीला आणावयाचा हा विष्णुदासांचा बाणा" असें ह्या धैर्याचें स्वरूप असल्यामुळें संसारिकास आपापल्या वैयक्तिक जीवनांत निर्बंधपणें जीवनाचें सार्थक करतां येईल, एवढीच त्याची मर्यादा आहे. ईश्वरभक्ति, मोक्ष, इत्यादि विषयींचे तुकारामाचे विचार पूर्वीच्या संतांच्यासारखेच आहेत. परंतु तेच विचार अतिशय उत्कटपणें आणि वाचतां वाचतां पटतील असे व्यावहारिक दृष्टांत देऊन तुकारामानें जास्त परिणामकारक केले आहेत.

निर्गुण आणि सगुण ह्या परमेश्वराच्या स्वरूपाविषयीं सांगतांना तुकाराम म्हणतो,

**" निष्ठुर तो दिसे, निराकारपणें ।**
**कोवळा सगुणें, प्रतिपाळी ।**
**तुका म्हणे काय, झालासे निर्गुण ।**
**आम्हां येथ कोण, सोडवील ।**

परमेश्वराचें सगुण स्वरूप हें ' **दैत्या काळ, भक्ता मेघश्याममूर्ती** ' असें आहे. ईश्वराचें गुणवर्णन करतांना ' **उचिताचा दाता। बुद्धीचा जनिता ।** ' हीं विशेषणें वारंवार वापरली आहेत. ईश्वरानें दिलेल्या दानांत अभयदान, कृपादान, उचितदान आणि बुद्धिदान असें त्यांचें वर्णन केलें आहे. हें दान मिळविण्यासाठीं सेवा करावी लागते व ती सेवेची बुद्धीही परमेश्वर देतो म्हणून त्याला सेवादान म्हटलें आहे.

ईश्वर आणि भक्त यांचे संबंध सांगतांना पतिपतिव्रता, पितापुत्र, सेव्यसेवक हे संबंध वारंवार सांगितले आहेतच. परंतु मातापुत्र संबंधावर तुकारामाचा रोख जास्त दिसतो. ह्याचें कारण आईची कृपा संपादन करण्यासाठीं वैयक्तिक योग्यतेपेक्षां तिच्या अंतःकरणास पाझर फोडणें पुरेसें होतें. संसारी माणसास पतिव्रतेची तपश्चर्या, पुत्राची कर्तव्यनिष्ठा किंवा सेवकाचें सेवाव्रत हें कदाचित् जमणार नाही म्हणून अपत्यभावानें आई म्हणून परमेश्वराच्या गळ्यांत पडणें हा सर्वांत सुलभ मार्ग आहे. सगुण आणि निर्गुण या तात्त्विक विवेचनाच्या आहारीं न जातां त्यांच्यांत वाटणारा विरोध तुकारामानें सुलभपणें नाहीसा केला आहे.

**नाहीं रूप नाहीं नांव, नाहीं ठाव धरावया ।**
**नाहीं आकारविकार । चराचर भरलेसे ।**
**नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ।**
**तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना।**
**अद्वैतीं तों नाहीं । माझें समाधान ।**

गोड हे चरणसेवा तूझी ।
करुनि उचित, देई हेंचि दान ।
आवडे कीर्तन, नाम तुझें ।
देवभक्तपण, सुखाचा सोहळा ।
ठेवुनि निराळा, दावी मज ।

आपल्याला उचित असें दान मागतांना सगुणाबद्दल विशेष ओढा तुकारामानें दाखविला आहे.

योगमार्गानें येणाऱ्या ब्रह्मैक्यस्थितीचेहि अनुभव तुकारामास आले असावेत असें त्याच्या उद्गारांवरून दिसतें. ( हर्षे तु. १३४–१३५ ).

एक छत्र छळकें, उन्मनी निशाणी ।
अनुहत ध्वनी, गगनीं गर्जे ।
स्फटिकाची शिळा, उपाधि न मिळे ।
भाव दावी पिवळे, लाल संग ।
रक्त श्वेत कृष्ण, पीत प्रभा भिन्न ।
चिन्मय अंजन, सूदले डोळा ।

हे उद्गार योगमार्गगम्य अनुभवाचे आहेत.

स्वतः योगमार्गानें अनुभूति होऊनहि उपदेशकाच्या भूमिकेवरून मात्र भक्तिमार्गाचीच शिफारस तुकारामाने केली. त्या शिकवणीसाठीं त्यास तळमळ वाटे. कारण बुडतसें जन न देखवे डोळा । त्यांच्यासाठीं ' मज धाडिलें निरोपा ' असें त्यास वाटे. परमेश्वरप्राप्तीचें साधन म्हणून नामस्मरण आणि संतसमागम या दोन साधनांवर तुकारामानें विशेष भर दिली आहे. त्याच्या स्वतःच्या अनुभवामुळें असो किंवा त्याच्यासारखे जे असंख्य अज्ञानी लोक त्याच्याभोंवतीं होते म्हणून ज्यांना वेदाध्ययनादि ज्ञानाचे मार्ग उपलब्ध नव्हते अशा लोकांच्या जीवितासाठीं तो मुख्यतः विचार करीत असल्यामुळें असो, त्यानें ज्ञानापेक्षां भक्तीला आणि स्वतःच्या तपश्चर्येपेक्षां संतसमागमास जास्त महत्त्व दिलें आहे. या साधनांची चर्चा

करतांना लौकिक जीवनामध्यें भक्तीच्या आड येणारीं चार संकटें म्हणजे चार वासना यांचा तुकारामानें वारंवार उहापोह केला आहे. परपीडा, परनिंदा, परदारा आणि परधन या त्या वासना होत. आणि उपयोगी पडणारीं साधनें म्हणून सत्य, परोपकार आणि निर्वैर यांची महती वारंवार सांगितली आहे. या मार्गदर्शनामध्येंही व्यवहारामध्यें दिसणारा व मोक्षसाधनास उपयोगी पडणारा अशा तऱ्हेचा सदाचाराचा मार्गच तुकारामाच्या डोळ्यासमोर आहे. ज्ञानमार्गानें किंवा योगमार्गानें ज्याला ईश्वराकडे जावयाचें आहे त्यालाच व्यवहारिक दृष्टीची बाधा होऊ शकत नाहीं. व्यावहारिक जीवन जगत असतानाच आपल्या स्वतःच्या शुद्धीकरणासाठीं ज्या तऱ्हेच्या आचरणाचा तुकारामानें उपयोग केलेला आहे तीही एक प्रकारची तपश्चर्याच आहे. ' भाव तेथें देव ' या त्याच्या प्रसिद्ध ओवीप्रमाणें परमेश्वराची प्राप्ती करून देणारा भाव कसा प्रकट होतो हें त्यानें विस्तारानें सांगितलें आहे:—

**वचनासारखें, तळमळी चित्त ।**
**बाहेरी तो आंत, होईल भाव ।**
**ठेवा जाणीव गुंडूनि । येथें भावचि प्रमाण ।**
**तुका म्हणे होसी, भावेंची तूं मुक्त ।**
**काय करीसी युक्त, जाणीवेची ।**

या सगळ्या वर्णनामध्यें ' भाव ' हा शब्द, निष्कपटपणा, दृढश्रद्धा, निष्काम भक्ति, चित्तशुद्धि, इतक्या व्यापक अर्थानें वापरला आहे. ज्ञान किंवा जाणीव यापेक्षा भावाला इतकें महत्त्व देण्याचें कारण परमेश्वराच्या ज्ञानामुळें परमेश्वरप्राप्ति होतेच असें नाही.

तें ज्ञान आपल्या जीवनाशीं पूर्णपणें संलग्न होणें हेंच त्याचें खरें सार्थक होय. अशा दृष्टीनें त्यानें ज्ञानापेक्षां किंवा जपतपापेक्षां भावाचें महत्त्व वर्णन केलें आहे. अंतःकरणांत पालट झाला नाहीं तर भक्ति ठकाठकीची आहे. चराचरांत असलेलें आकारविकारविरक्त असें ईश्वराचें स्वरूप भावाशिवाय इतर साधनांनीं समजणार नाहीं. भोंवतालच्या समाजामध्यें

मोक्षमार्गाच्या नांवाखालीं जी एक प्रकारची भोंदूगिरी चाललेली होती त्याचाहि तुकारामानें अतिशय तीव्रपणानें समाचार घेतला आहे. नाम-स्मरण, कीर्तन, इत्यादि साधनांचा पोटासाठीं उपयोग करणारे लोक त्याला डोळ्यांसमोर दिसत होते. तो म्हणतो.

जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ।
बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ।
तट्टावृषभांसि दाणा । तृण मागो न ये जाणा ।
तुका म्हणे द्रव्य क्षिति । देती तेही नरका जाति ।।

वर्णगुरु, धर्मगुरु, यांच्या ढोंगीपणावर तुकारामानें अतिशय तीव्र हल्ला केला आहे.

द्विज चहाड झाले चोर । विक्री स्नानसंध्या जपा· देव म्हणोनि न येती देवळा. नीचांचे चाकर चुकलीया खाती मार. बैसोनी तक्का अन्योविण पीडिती लोकां । खिस्तीचा उदीम, उदीमांत हीन । करिती ब्राह्मण । कळीयुगीं ।।

पुराणिक शूद्रीसंग करणारे आहेत. कथेकरी, पोटभरू आहेत. पंडीत गर्वशिरोमणी आहेत. पाठांतरानें केवळ वाचाळ झाल्यामुळें त्याच्या ठिकाणीं जें मोठेपण भासतें तें कोडियाचें गोरेपण आहे असा तुकारामानें त्याचा निषेध केला आहे. आणि त्याचप्रमाणें स्वतःला संत म्हणविणारे साधूचें फक्त सोंग आणतात आणि गुरूच्या मार्गांतहि गुरुबाजी करणारे लोक आढळतात. या सर्वांचा तुकारामानें अतिशय प्रखर शब्दानें निषेध केला आहे. त्याच्या अभंगांमध्यें विशेषतः शाक्तपंथावर आणि त्याच्या खालो· खाल कानफाट्यावर भयंकर कोरडे ओढले आहेत. शाक्त गधडा जये देशी । तेथें राशी पापाच्या ।। ढाई होई मुंडी । मुंडोनिया सर्वी । पांघरोती वरवीं । वस्त्रें काळीं ।। त्याचप्रमाणें मलंग, फकीर आणि दावलमलीक इत्यादिकांवरसुद्धां त्यानें वारंवार टीका केलेली आहे. धर्माचें पाळण, करणें पाषाणखंडणीं । हेंचि आम्हां करणें काम । हेंहि काम तुकारामानें आपल्या अभंगांच्या द्वारें पूर्णपणें केलेलें आढळून येतें.

" बोवा स्वतः अगदीं विरक्त झाले होते. त्यांचा ईश्वरावर विलक्षण भरंवसा होता व ते ऐहिक गोष्टीसंबंधें पूर्ण बेफिकीर बनले होते. त्यांचा संसार पूर्णपणें सुटला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या मनांतून आपपरभावाचें ठाणें साफ उडून गेलें होतें. परंतु अशी स्थिति प्रत्येक मनुष्याची होणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं हे ते जाणून होते. म्हणून ते स्वतः ससाराला विटले असतांहि त्यांनीं असा उपदेश केला कीं बाप हो, संसारांत नेकीनें चाला. ईश्वराची आठवण ठेवा. या उपदेशावरून सांसारिकावर 'उपकार' करण्यासाठीं व उन्नतिमार्ग दाखविण्यासाठीं त्यांनीं आपल्या वाणीला शीण दिलेला आहे. "

(बा. अ. भिडे पृ. ८४,८९

## तुका म्हणे—जीवनावेगळी मासोळी.

कन्या सासुरासि जाये । मागें परतोनी पाहे  
तैसें झालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा  
चुकलिया माये । बाळ हुरुहुरु पाहे  
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी  
सर्व भुलोन गुंतला नादा । गारुडिये फांदा घातलासे  
हिंडवुनि पोटीं भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारीं असे राया  
तैसी परी मज झाली पांडुरंगा । गुंतलो तो मी गा सोडवी आतां

दुष्काळें अन्नें पीडिलें क्षुधार्थी । मिष्टान्न देखिलें तेणें जैसे  
तैसे तुझे पायीं लाचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥  
मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावुनियां डोळा बैसलेंसे ॥  
तुका म्हणे आतां झडी घालूं पाहे । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥

समर्थाचें बाळ पांधरे वाकळ । हंसती सकळ लोक कोणा  
समर्थासी लाज आपुलया नांवाची । शरण आल्याची लागे चिंता  
जरी तुज कांहीं होईल उचित । तरि हा पतित तारीं तुका

आतां तुझा भाव कळो आला देवा । ठकूनिया सेवा माझी
स्तुति करवूनि पिटिला डांगोरा । तें कोण दातारा साच करीं
जातीचें वाणी मी पोटींचें हें कुडें । नका मजपुढें ठकाठकी
तुका म्हणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैसा नाचूं ।

होई मज तैसा मज जैसा । साना सकुमार हृषीकेशा
पुरवी माझी आशा । भुज चारी दाखवी
खालता सप्तही पाताळा । वरता स्वर्गाहूनि ढिसाळा
तो मी मशक डोळां । कैसा पाहों आपुल्या
भक्ति ऋण घेतलें माझें । चरण गहाण आहेत तुझें

प्रेम व्याज देई हरी । माझा हिशेब लौकर करी
माझें मी न सोडीन धन । नित्य करितो हरिकीर्तन
तुझें नाम आहे खत । सुखें करी पंचायत
तुका म्हणे गरुडध्वजा । याची साक्ष श्रीगुरुराजा

उजळलें भाग्य । धवळलें जगदाकार

उजवलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली
शुभ झाल्या दिशा । अवघाचि काळ
धवळलें जगदाकार । अंधार तो निरसला

हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम
धर्माचें पाळण । करणें पाषाणखंडण
तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरें
नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर
सेवितों हा रस वाटितो सकळां । घ्या रे होऊं नका रानभरी
हरिनाम वेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हाळला
तेथें माझ्या मना होई पक्षिराज । साधावया काज तृप्तीचें या

## ऐसे सांगो किती जना

होऊनी संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयाची
लांबवूनी जटा नेसोनी कासोटा । अभिमान मोठा करिताती
भगवें तरी श्वान सहज वेश त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ
शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या
स्तवूनिया पूजी रांड । न लजे भांड दाढीसी
तुका म्हणे रांडलेका । अंतीं जासील यमलोका

ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल
पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे न सेवीं
मुंगीचिया घरां कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली
तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे

## संसारसंगें परमार्थ जोडे ?

साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाहीं
तरि कां नेणते होते मागें ऋषी । तींहीं या जगासी दुरावीलें
संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसे काय घडे जाणतेनो
ढेकणाच्या बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे
नको सोडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं
मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया
नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सेरे अंगीं देवाचिया
सकळ चिंतामणी शरीर । जरीं जाय अहंकार समूळ आशा
इहलोकीच्या या देहें । देव इच्छितातीं पाहे
आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें

## सुळावरिल पोळी.

संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनी मागुतें पाहूं नये
तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी

जाणोनि नेणते करी माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनिया
मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र
यातायाती धर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं
भक्ति ते कठीण सुळावरिल पोळी । निवडे तो बळी विरळा शूर

## भगवंताच्या मूर्ती

जें कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुलें
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी
तुका म्हणे सांगूं किती । त्याचि भगवंताच्या मूर्ती

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें
धर्म नीतीचा हा ऐक वेव्हार । निवडीलें सार असार तें
पाप त्याचें नांव अविचारी नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा
तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें

आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणीं भिन्न अग्नि एक
तुका म्हणे मन उन्मन जों होय । तों वरि हे सोय विधि पाळी
आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा
तुका म्हणे एके कळतें दुसरें । बरियानें बरें आहाचें आहाच

## आम्ही विठ्ठलाचे वीर

आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ।
बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥
झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥

अर्थ लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ।
विषयलोभी मनें । साधनें बुडविलीं ॥
पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा
तुका म्हणे करा । जयजयकार आनंद

आम्ही विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर
वारूं चालवूं चहूं खुरी । घाला घालूं यमपुरी
वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातीरीं
लुटा लुटा रे पंढरपूर । धरा रखुमाईचा वर

तोंवरि हे विधि पाळी

कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया
आणीक हीं तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढ मोल तया
काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें
फिरंग आटितां नये बारा रूके । गुणें मोलें विके सहस्रवरी
तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचें मुखीं नाम तोचि धन्य

"गारेच्या पोटांत जसा हिरा असावा त्याप्रमाणें वरून बेडौल दिसणाऱ्या तुकारामी रचनेंत विलक्षण सरसत्व व मनोहारित्व सांठविलेलें आहे. तुकारामबोवाच्या कवितेचें सौंदर्यसर्वस्व जिव्हाळ्यांत आहे. खडबडीत झऱ्याच्या रूपानें जशी रसोत्पत्ति व्हावी किंवा निशांतीं काळ्याकुट्ट भासणाऱ्या उदयगिरीच्या पश्चात्‌भागांतून जशी प्रभोत्पत्ति व्हावी तशीच बाह्यतः अगदीं साध्या व क्वचित् प्रसंगीं गांवढळ भासणाऱ्या तुकारामोक्तींतून रस व प्रभा यांची उत्पत्ति होते."

—बा. अ. भिडे. तु. ७६

---

# १५ रामदास

( इ स. १६०८–१६८१ )

तुकारामापर्यंत आलेल्या भक्तिपंथास रामदासानें कांहीं निराळें वळण लाविलें अशी बऱ्याच महाराष्ट्रीयांची श्रद्धा आहे. संतमंडळापेक्षां रामदासानें कांहीं विलक्षण केलें असें अभिनिवेशानें प्रतिपादन करणारा एक पक्ष आहे. रामदासाचें निराळेंपण त्याच्या जीवनांत तर दिसतेंच. स्वतः उपासनेचा मार्ग शोधणें, गुरूच्या शोधार्थ वणवण न करतां आपल्या आराध्य दैवतासच गुरु मानून ' रामदास्य ' धारण करणें आणि समर्थांचा सेवक अशी आत्मविश्वानें घोषणा करीत रघुनाथभजनाचा प्रसार करण्यासाठीं संघटना करणें यांत रामदासाचें वैशिष्ट्य दिसतें.

## चरित्रः

रामदासाच्या पूर्वजांनी जांब गांव वसविला. तेथें त्याचा जन्म शके १५३० मध्यें झाला. त्याचे वडील सूर्याजीपंत यांनीं सूर्योपासना करून 'प्रसाद' मिळविला. गंगाधर ( जन्म श. १५२७ ) व नारायण ( रामदास ) ( जन्म श. १५३० ) हे दोन पुत्र हाच तो प्रसाद होय. लहानपणीं विशेषतः मर्दानी खेळाची नारायणास विशेष आवड होती. त्यावेळच्या पद्धतीप्रमाणें थोडेंसें संस्कृत अध्ययन झाल्यावर वयाच्या ७ व्या वर्षी नारायणाची मुंज झाली मुंज झाल्यावर श. १५३७ मध्येंच वडिल मरण पावले. वडील बंधु गंगाधर यानें अल्पवयांतच इतरांना उपदेश करण्याइतका आध्यात्मिक अधिकार मिळविला. नारायणानेंहि उपदेश घेण्याचा हट्ट घेतला. परंतु त्याच्या बालहट्टाकडे गंगाधरपंतांनीं लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें वयाच्या सातव्या वर्षी नारायणानें गृहत्याग केला आणि जांबजवळील रामाच्या देवालयांत उपासना आरंभिली. श. १५३८ मध्यें, वयाच्या आठव्या वर्षी त्यास रामदर्शन झालें आणि नारायणाचा ' रामदास ' झाला.

प्रभु रामचंद्र रामदासाचे गुरु झाले. रामदास्याची दीक्षा घेतल्यावर नारायणानें सांप्रदायिक गुरूची अपेक्षाहि केली नाहीं ! रामदास्य करीत 'समर्थ' होईपर्यंतचें कर्तृत्व हें सगळें स्वसंपादित आहे ! श्रद्धा आणि विवेक यांच्या बळावर त्यांनीं समर्थ पदवी संपादन केली.

रामदर्शनाचा लाभ झाल्यावर नारायण रामदास होऊन घरीं आला परंतु त्याचें चित्त घरांत राहिलें नव्हतें. जेमतेम चार वर्षें त्यानें घरांत काढिलीं आणि श. १५४२ मध्यें 'सावधान' होऊन कायमचा गृह-त्याग केला. अटरा दिवस पायीं प्रवास करून त्यानें नाशिकजवळ टाकळी या निसर्गरमणीय आणि एकांत स्थळीं मुक्काम केला. तेथें एका गुहेंत १२ वर्षे तपश्चर्या केल्यावर त्यास साक्षात्कार झाला (शके १५५४) आणि त्याची साधकावस्था पूर्ण झाली. या काळांतच रामदासानें नाशिक क्षेत्रीं अध्ययनहि केलें. या तपश्चर्येच्या काळांतच त्यास उद्धव हा पहिला शिष्य लाभला. साधकावस्थेंतील त्याच्या मानसिक अवस्थाचें चित्र त्या वेळीं रचिलेल्या 'करुणाष्टकां'त स्पष्टपणें दिसतें. प्रसिद्ध दासबोधाचा मूळ भाग, 'जुना दासबोध' या काळांतच रचिला आहे. रामरायाची एकनिष्ठपणें आराधना सफळ झाल्यावर इतर जनासाठीं 'बोध' लिहिण्यास त्यांनीं आरंभ केला.

तपश्चर्येनंतर त्यांनी बारा वर्षे तीर्थाटन केलें. तीर्थयात्रेंत काशी, प्रयाग इत्यादि उत्तरेकडील तीर्थे केल्यावर रामेश्वरला जाऊन मग ते गोकर्णाहून पैठण येथें आले आणि तेथें तीर्थयात्रा पूर्ण केली.

तीर्थयात्रा करीत असतां देशांतील परिस्थिति त्यांच्या दृष्टीस पडली आणि जुन्या दासबोधांत बदल करणें त्यास आवश्यक वाटूं लागलें. तीर्थाटनाच्या प्रसंगीं दिसलेल्या परिस्थितीचें वर्णन '**अस्मानी-सुलतानी**' '**परचक्रनिरूपण**' या दोन प्रकरणांत केलें आहे.

नंतर आईची भेट घेऊन त्यांनीं श. १५६६ त कृष्णातीरीं चाफळ खोऱ्यांत वास्तव्य केलें. व मारुतीचीं मंदिरें व मठ यांच्या स्थापनेपासून भावी कार्यास आरंभ झाला. मसूर येथें श. १५६७ मध्यें रामनवमीचा पहिला उत्सव केला.

रामदासांचें भावी कार्य 'संघटना' या एका शब्दांत सांगतां येईल. ज्ञानेश्वराच्या परंपरेचाच उपदेश केला, परंतु तो उपदेश प्रभावी करण्यासाठीं शिष्यसंघटना, मठस्थापना हीं विधायक कार्ये रामदासांनीं केली.

शके १५७१ पर्यंत कल्याणादि बरेच शिष्य दासांच्या कार्यांत दाखल झाले. शिष्यांप्रमाणें वेणाबाई इत्यादि स्त्रियाहि रामदासी कार्यास येऊन मिळाल्या. श. १५७० मध्यें चाफळ येथील प्रसिद्ध राममंदिराची स्थापना झाली. श. १५७२ पर्यंत मारुतीचीं प्रसिद्ध अकरा देवालयें स्थापन झालीं.

शिष्यसंघटना करीत असतां विविध प्रसंगी आणि विविध स्वभावाच्या व्यक्तींशीं संबंध येण्याच्या निमित्तानें दासबोधांत बरीच 'विविधता' येणें अपरिहार्य होतें. या बोधवचनांचें ग्रंथ नांवास साजेसें संकलन करण्या-इतका अवसर दासांना मिळाला नाहीं.

"स्वामींची मूळ बैठकच ग्रंथकर्त्याची नसली पाहिजे. त्यांची बैठक प्रतिपादकाची व प्रचारकाची होती. तिला अनुसरून स्वामींनीं स्फुटरचना केली व आपलें जीवन संपत आलें आहे असें पाहून त्या दशकांना व समासांना एक स्थूल अनुक्रम त्यांनीं लावून दिला येवढेंच काय तें! (प्रा. श्री. म. माटे, रोहिणी, जुलै १९४७).

निराळ्या मार्गानें महाराष्ट्राचें आनंदवनभुवन करण्याचें शिवाजीचें कार्य या वेळीं नांवारूपास येऊं लागलें होतें. रामदासांना त्याविषयीं साभिमान आनंद वाटत होता. शिवाजीबद्दल आदरहि त्यांच्या मनांत वाढूं लागला. शिवाजीस त्यांनीं श. १५७१ मध्यें पत्र लिहिलें आणि आपलें 'वर्तमान' घेत जाण्याबद्दल विनंती केली. श. १५७१ मध्यें शिवाजीनें रामदासांची भेट घेतली व अनुग्रहहि घेतला. त्यानंतर श. १५७७ त्याच्या मनांत उत्पन्न झालेली राजसंन्यासाची वृत्ति बदलून त्यास मार्गास लाविलें. श. १६०२ पर्यंत शिवाजीच्या २।३ भेटी तरी खासच झाल्या असाव्यात. शिवाजीची भेट झाल्यावर श. १५७१ मध्यें रामदास पंढरपुरास गेले असतां तेथें अनायासें तुकारामाची भेट झाली

असावी. ' रा. ब. प्र. २ ) श. १६०२ मध्यें शिवाजी मरण पावला. स्वराज्य संकटांत आलें. तें पाहून संभाजीस धीर देऊन मार्गदर्शन करण्याचें कार्य रामदासांनीं केलें. परंतु महाराष्ट्राच्या भोंवतीं पुन्हां पाश पडूं लागले. अशा परिस्थितींत कांहींशा विपण्ण मनःस्थितीतच रामदास रामस्वरूपीं विलीन झाले. ( श. १६०३ माघ वद्य ९ ).

**रामदासांचें वाङ्मयः**—रामदासांच्या वाङ्मयांत दोन भाग स्पष्ट दिसतात. स्फुट लेखन आणि ग्रंथ नांवास योग्य असें लेखन. दोन्हीही प्रकारचें लेखन आयुष्यभर चाललें होतें. ग्रंथांचा कालानुक्रम लावणें थोडें तरी शक्य आहे; परंतु स्फुट लेखनाचा कालानुक्रम लावणें फारसें शक्य नाही.

कालानुक्रमें काय दिसतें तें आधी पाहूं.

डॉ. प्रा शं. गो. तुळपुळे यांनीं कालानुक्रम लावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावरून पूर्ववयांत म्हणजे शके १५४७ ते १५५२ या काळांत **करुणाष्टकें** लिहिलीं असावीत. अध्यात्मपर अशी १६ लघुकाव्यें ( एकूण ओवी ३६६४ ) या लघुकाव्यांपैकीं **एकवीस समासी** म्हणजे जुना दासबोध ) ( ओवी १३४० ) एक आहे. लघु **रामायण** (श्लोक १२५) **चौदा ओवीशतें** ( १४०० ओव्या ). हीं पूर्ववयांतील ग्रंथरचना होय.

पूर्ववयाचा हा काळ म्हणजे शके १५४२ मध्यें टाकळीस तपश्चर्येस आरंभ केल्यापासून १२ वर्षे ( श. १५५४ ) हा होय. १५५४ ते १५६६ या तीर्थयात्रेच्या काळाचा एक लहान वाङ्मयविभाग दिसतो.

तीर्थयात्रा संपतांनाच ( श. १५६६ ) '**आनंदवनभुवन**' हें प्रकरण लिहिलें असावें. ( पा. सं. पृ. ४४८ )

**अस्मानी सुलतानी, परचक्रनिरूपण** हीं प्रकरणें तीर्थयात्राकालातलींच असावींत. पूर्ववयांत लिहिलेल्या लघुरामायणांत फक्त युद्धकांड आहे. उत्तरवयांत **सुंदरकाडांची** भर पडून १२५ श्लोकांच्या **लघुरामायणाचें** १४६२ श्लोकांचें **दीर्घ रामायण** झालें. ( पां. स. ४१६ ). '**मनोबोधा**' चा ( मनाचे श्लोक ) काल अनिश्चितच आहे.

१५६६ मध्यें कृष्णातीरीं आगमन केल्यावर शके १६०३ मध्यें रामरूपी विलीन होईपर्यंतच्या उत्तरवयाच्या कालांत दासबोधरूपानें आज सिद्ध असलेला ग्रंथराज निर्माण झाला.

'**रामवरदायिनी**' हें प्रतापगडच्या तुळजाभवानीचें स्तोत्र श १६०० मध्यें लिहिलें.

अनेक स्फुट प्रकरणांपैकीं ऐतिहासिक दृष्ट्या चर्चेचा विषय झालेलीं तीन महत्त्वाची प्रकरणें म्हणजे शिवाजीस लिहिलेलें पत्र ( श. १५७१ ) 'सावधता' हें शिवाजीस उद्देशून लिहिलेलें प्रकरण ( श. १५७७) ( पां. सं. क. ४५३ ) आणि संभाजीस लिहिलेलें पत्र ( श. १६०३ ).

याशिवाय सुमारें एक हजार पदें, कांहीं भारुडें, भीमरूपी स्तोत्रें, डफगाणीं, इत्यादि रामदासाची रचना आहे.

**करुणाष्टकें** रचनाकाल श. १५४७ ते ५२ असा ठरतो. ( पां. सं. ३९९ ) प्रत्येकांत ५ ते २० पर्यंत श्लोक असलेलीं हीं अष्टकें, अतिशय कारुण्यपूर्ण आहेत. साधकावस्थेंतील या यातनामय स्थितींत 'रघुनायका काय कैसें करावें ?' असा आक्रोश येथें ऐकूं येतो. संसारावर मन कधी बसलेंच नाहीं. संसार सोडला खरा; पण पुढें काय? 'आता जावे कुणीकडे । बुद्धि दे रघुनायका' अशी आर्तस्वरानें आळवणी केली आहे. लौकिक अर्थानें संसारतापानें प्रत्यक्ष पोळण्याचा प्रसंग न येतांच रामदासांच्या मनांत केवळ मूलभूत जाणीवेनेंच ही आर्तता निर्माण झाली आहे. गुरु नाहीं, गुरूपदेश नाहीं. मनानें रामाचा ध्यास घेतला. पण मधली वाट माहीत नाहीं. 'उदास वाटतें जीवीं' 'पिसुणें वाटती सर्वे' 'कोणीहि मजला नसे.' अशा स्थितींतच उपासना चालू होती. परंतु याहि स्थितींत 'विवेकेंचि या मानसा आवरावें' ही जाणीव व्यक्त झाली आहे. 'अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया' हें प्रसिद्ध पंधरा श्लोकी स्तोत्र याच सुमाराचें आहे.

**सोळा लघुकाव्यें : एकवीस समासी आणि इतर काव्यें** (एकूण ओवी संख्या २५६४ ) या काव्यांत एकवीस समासी किंवा जुना दासबोध याच्या १३४० ओव्या आहेत. रामोपासना करून स्वतः सिद्धि प्राप्त करून

घेतल्यावर स्वतःचा शिष्यसंप्रदाय तयार करण्याच्या प्रारंभीच्या प्रयत्नांतच ही एकवीस समासी लिहिली गेली असावी ( ज. स. करंदीकर सु. म. ग्रं. पृ. ३९६ ) यानंतर ' जें आपणांसि ठावें ' तें तें शिकविण्यास आरंभ केला. या एकवीस समासी ग्रंथासच जुना दासबोध असें नांव पडलें. 'शंका निःशंका जाली' आणि 'सत्यचि पाहता अनुभवा आली' म्हणून 'मज कोणी जरी लेखीना । तरी जनाची चाड नाहीं ' अशा आत्मविश्वासानें या लेखनास आरंभ झाला. परंतु या वेळीं जें कार्य डोळ्यांसमोर होतें तें ज्ञानेश्वरनामदेवांच्याच पद्धतीचें असावें असें या ग्रंथांतील बोधाच्या स्वरूपावरून वाटतें. पुढें हेंच कार्य परंतु निराळ्या मार्गानें करणें अपरिहार्य झालें. हे कार्य भक्तिपंथाचाच पुनरुच्चार व पुनरुद्धार हें होय. भक्तिपंथाच्या पुनरुज्जीवनाची आवश्यकता नाशिक-पंचवटीच्या परिसरांत असतांनाच रामदासांना पटली. विश्वाची चिंता लागावी अशी परिस्थिति होती. या काळांत कांहीं शिष्यहि जमूं लागले होते. त्यांना बोध करण्याच्या निमित्तानें हा एकवीस समासी ग्रंथ लिहिला.

स्पष्टवक्तेपणा, सूक्ष्मावलोकन, विस्ताराची विशेष आवड, इत्यादि विशेष या ग्रंथांतहि दिसतातच. काय आहे तें अतिशय निर्भीडपणें, अतिशय विस्तारानें सांगावें, तें सांगतां सांगतां त्याचें 'कळकट' स्वरूप दाखवावें, पटवावें आणि लगेच तें कसें असावयास पाहिजे आणि कसें सिद्ध करतां येतें हेंहि सांगावें ही त्यांची एकंदर विवेचनपद्धति जुन्या दासबोधांतहि आहे. वक्ता आणि श्रोता, निंदा आणि निंदक, दैव आणि प्रयत्न या विषयावरील विवेचनांत ही पद्धति दिसून येते. उदा० 'श्रोते अवघेचि वक्ते जाहले' म्हणजे जंबूक जमल्यावर जसा कोल्हाळ करतात तसें होतें. याहिपेक्षां कडक शब्दांत नालायक श्रोत्यांची हजेरी घेऊन श्रोता कसा असावा हेंहि पुढें सांगितलें.

परमार्थ मार्गांत माजलेला गोंधळ त्यांना दिसला तसाच त्यांनीं मांडला. आणि मग परमार्थाची महति पटविली. श्रवणभजनादिकांनीं गुरुकृपेनें देहबुद्धि सुटावी आणि भवमूळ तुटावें असा मार्ग येथें उपदेशिला आहे.

भोळ्या भावाचें प्रस्थ मोडून विवेकाचें महत्त्व सांगितलें. विवेक आणि प्रयत्न यावर रामदासांनीं आरंभापासूनच भर दिला. 'जैसे अंकुशेवीण दंती। तैसी विवेकेवीण शांती' होणार नाहीं. सर्वस्वाची आस तुटल्याखेरीज सगुणमूर्ति प्रगट होत नाहीं. 'म्हणून वैभवहीन व्हावें। जिवलगीं वोसंडावें' स्वतः मुक्त झाल्यावर 'शिकवावें पुढिलासी' हा सृष्टीचा दंडकच आहे. दीन देखोनि मुक्तास कळवळा आला पाहिजे. असा हा बोध आहे. 'जन आणि जनार्दन। यांसी नाहीं भिन्नाभिन्न', इत्यादि वचनें वाचतांना नामदेवएकनाथाची आठवण होते. तोच सनातन बोध जीर्ण झालेला पाहून त्याचें पुनरुज्जीवन करण्यास या ग्रंथांत आरंभ झालेला आहे.

**जयासी परमार्थ व्हावा। तेणें प्रपंच हा त्यजावा॥**

परमार्थासाठीं संसार त्यजावा ही पूर्वीची शिकवण लोकांना कळली नाहीं म्हणून रामदास म्हणतात, 'संसारीं असोनि अलिप्त' हें फटकळ बोलणें आहे!

**प्रपंचीं परमार्थ करावा; हें तों ठाकेना सर्वथा।**
**प्रपंच म्हणिजे उदास नागवणा। परमार्थ म्हणिजे**
**प्रपंच बुडवा।**

परंतु या वचनांत आधीच्या साधुसंताना विरोध करण्याचा हेतु दिसत नाहीं. तर प्रपंचीं परमार्थ करण्याची 'कला' ज्यांना साधली नाहीं परंतु जे नुसते तोंडानें तशी बडबड करतात त्यांच्यावर रोख आहे. प्रपंच भडका पेटला। मधें परमार्थ जळों लागला' तरी लोक आपले गाफीलच. डोळे झांकोनि दोन्ही अर्था। नागविलेति कीं रे! असे लोक पाहूनच प्रपंच आणि परमार्थ यांच्या संबंधाविषयींच्या अज्ञानावर येथें कोरडे ओढले आहेत. 'स्वानुभवोद्गार आवरेना। यासी काय करूं?' अशा वृत्तींत हे एकवीस समास लिहिले आहेत. संतपरंपरेप्रमाणेंच भक्तिमार्गप्रधान असा हा जुना दासबोध आहे.

सोळा लघुकाव्यांतील बाकीच्या काव्यांत परमार्थाचीच ओळख निर-

निराळ्या पद्धतीनें करून दिली आहे. षड्रिपु, पंचीकरणयोग, चतुर्थमान, मानपंचक आणि पंचमान हीं प्रत्येकीं १००।१२५ अनुष्टुपांचीं आहेत. सगुणध्यान, निर्गुण ध्यान हीं ओवीबद्ध आहेत.

'**जुनाट पुरुष,**' ही जगाची जन्मकथा एका विनोद प्रचुर रूपकाच्या-द्वारें सांगितली आहे. ब्रह्म हा जुनाट पुरुष. त्याची माया ही लाडकी मुलगी, काळ हा लाडावलेला मुलगा ! हीं दोघें ब्रह्मांडाचे खेळ करीत आहेत. मुलगी मातृविहीन, पुढें बापालाहि विसरली ! तिच्या पोटीं लक्षावधी संतान वाढूनहि ते 'ढायीची कुमरी'. भारुडाच्या पद्धतीचें असें हें वेदांत-विवेचन आहे.

'**जनस्वभाव गोसावी**' या प्रकरणांत साधुसंतांच्या जीवनातील चमत्कार सांगून त्यावरच भाळणारा 'जनस्वभाव' दाखविला आहे. या प्रकरणांत चांगदेव, ज्ञानेश्वर, इत्यादिकांच्या जीवनांतील चमत्कार नमूद करून चमत्कारावरच सर्व भर देणाऱ्यांचा भोळेपणा उघड केला आहे.

**लघु रामायण** ( श्लोक १२५ ) रामायणापैकीं रामदासांनीं फक्त दोनच कांडांवर रचना करावी ही एक विशेष गोष्ट आहे. याचा अर्थ असा करतात कीं, भोंवतालच्या परिस्थितीचा विचार केल्यावर त्यांना रामरावणयुद्धाचीच आठवण करून द्यावेंसें वाटलें. लघुरामायणांतील रावणाच्या लीलांचें वर्णन हें तत्कालीन यवनसत्तेच्या अरेरावीशीं जुळणारेंच आहे. 'पदोपदीं विटंबना' लोक अनुभवीत होते. 'गणेश गाढवें वळी' हें रामदासांच्या काळांतील दीनहीन ब्राह्मणांनाहि लागू पडतें. नाथांच्या प्रमाणें वीररसावरच सर्व भर देऊन वीरश्रीचीं प्रक्षोभक, शब्दचित्रें विशेषतः हनुमानाच्या पराक्रमप्रसंगांतून रंगविलीं आहेत.

उतारवयांतील '**चौदा शतें रामायणांत**' रामराज्याचें वर्णन येणें सुसंगतच आहे. तेथें रामरावणयुद्धाचा रोमहर्षक प्रसंग रामदासांना शिवप्रतापांत दिसूं लागला होता.

**चौदा ओवीशतें** ( १४०० ओव्या ) या प्रकरणांत संसारात्मक वैभव, सुख, यांतील वैय्यर्थ सांगितलें आहे. भोंवतालीं माजलेलीं पाखंडें चव्हाट्यावर आणिलीं आहेत. प्रयत्न आणि प्रारब्ध यांच्यांत वादप्रसंग

उभा करून 'प्रेत्ना'चें भलेपण सिद्ध केलें आहे. संसारांत कांहीं तरी धडपड करावीच लागते. 'कांहींच न करी ऐसा कोण ' हें जरी खरें तरी 'प्रारब्धा वेगळा' असा तरी कोण आहे ?

रामदासांच्या साधकावस्थेंतील स्फुट अभंगांत करुणाष्टकातलीच वृत्ति दिसते. ते अभंग वाचतांना वाचकांसच काय, पण रामदासांनाहि स्वतः वाचलेल्या नामदेवादिकांच्या अभंगांची आठवण होत असावी. देवाची आळवणी, निषेध, संताप, वैताग, सगळें कांहीं थेट नामदेव-तुकारामासारखें आहे आणि शेवटीं इष्टार्थसिद्धि झाल्यावरचा अवर्णनीय आनंदहि आहे.

**(१) उतावेळ चित्त उभारूनि बाहे । रामदास पाहे वाट तुझी ॥**
**(२) देवा मज आतां वाटे तुझी चिंता । पवाडे वर्णितां हांसतील ।**
**(३) आम्हा नाहीं चाड ते कोणी येकाची । दृढ रामयाची कांस धरू**

आणि शेवटीं परम ' स्वार्थ ' साधल्यावर—

**(४) राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥**

असें ' उपकारापुरतें उरणें 'हि आहे. अशीं वचनें वाचतांना नामदेवादिकांच्या ग्रंथांतील वचनें आठवूं लागतात.

भावी कार्यात प्रत्यक्ष व्यक्त झालेला दुर्दम्य प्रयत्नवाद ज्या स्फुट श्लोकांत सारखा गर्जत आहे असें शेंदीडशें श्लोक आहेत.

**वन्ही तो चेतवावा रे । चेतवीतांचि चेतती ॥**
**कल्यानें होत आहे रे । आधीं केलेंच पाहिजे ॥**

' येत्न तो देव जाणावा ' अशी चैतन्यदायी ' गर्जना ' या स्फुट श्लोकांत आहे.

**मनोबोध** ( मनाचे श्लोक २०५ ). ज्याच्या रचनेचें स्थळ आणि काळ अनिश्चित आहे असा बोध सर्वतोमुखीं झाला आहे. ' भक्तिपंथेंचि जावें ' असें मनास सांगितलें; परंतु या पंथाच्या आजूबाजूस दिसणारी सांसारिकांची, अजाणांची केविलवाणी स्थिति मनासमोर आणून दिली आहे आणि कटु सत्य दाखवूनहि

**' सदासर्वदा देव सन्निध आहे ॥ '**
**' कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥ '**
**' नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ '**

असा धीरहि दिला आहे.

पूर्व संचितासहि मान्यता देऊन टाकिली तरी ' **श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें** ' हेंहि बजाविलें आहे! रामदासांच्या शिकवणुकीचें स्थूल सारच या मनोबोधात आहे. दासबोधाचें रहस्य या मनोबोधांत सांपडतें.

पूर्व वयांतील म्हणजे तीर्थयात्रेपूर्वीची ही रचना असें मानलें तरी त्यांतहि रामदासांचें वैशिष्ट्य दिसतच आहे. तीर्थयात्रेंत त्यांनीं समाजाची जी सर्वथैव दैना झालेली पाहिली ती नाशिकच्या परिसरांतहि थोडी फार होतीच. कारणें कोणतींहि असोत, लोक न अरत्रीं न परत्रीं असे आहेत, बुवाबाजीचें बंड आहे, भोंदू आहेत आणि त्यांना पोसणारे भाबडेहि आहेत, ज्ञानी, गर्विष्ठ आणि अजाण नादिष्टहि आहेत. संसारांत अगतिक होऊन तरफडत जगणारेहि तेथील परिसरांत थोडे फार असणारच! आणि रामदासांची स्वतःची तयारी होत होती त्याच वेळीं त्या लोकाविषयींहि त्याचें कांहीं चिंतन चाललेंच होतें!

**अस्मानी सुलतानी** आणि **परचक्रनिरूपण** : तीर्थयात्रेच्या प्रसंगीं दिसलेलें समाजजीवन अतिशय उद्वेगजनक होतें. तें पाहून रामदासांना आपल्या भावी कार्याची ओळख झाली. तीर्थयात्रेच्या वेळीं पाहिलेल्या जीवनाचें अत्यंत विदारक चित्र **अस्मानी सुलतानी** आणि **परचक्रनिरूपण** या दोन प्रकरणांत रंगविलें आहे.

**कितीं एक ते ताम्रबंदीच गेले । कितीं एक मार्‍हाष्ट्र बंदीं निमाले ।**
**कितीं एक ते घ्राण कर्णेचि घेती । कितीं उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टविती ॥**
**माहाष्ट्र देश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला ॥**
**अवकाश नाहीं उरला । उदंड कामें ॥**
**नाना पवाडे वाढलीं । पृथ्वीचा जाला गलांठा ॥**
**कित्येक म्लेंछ होवोन गेले । कित्येक फिरंगणांत आटले ॥**

**विप्रीं सांडले आचार । क्षेत्रि सांडिला विचार । ब्राह्मण बुद्धिपासून चेवले ।**

**देवस्थानें उदंड होतीं । आतां झालें म्लेंछनृपांतें ।**
**ठायीं ठायीं उरूस भरती । किती उदंड सांगती रे ।**
**तीर्थक्षेत्रें मोडलीं । ब्राह्मणस्थानें नष्ट जालीं ।**
**सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ।**

सुलतानीनें किती अवनति झालेली आहे हें रामदासांना दिसून आलें आणि तीर्थयात्रेहून परत आल्यानंतर कृष्णातीरीं आपल्या कार्यास आरंभ करतांना त्याच परिस्थितीचें चिंतन त्यांच्या मनांत प्रामुख्यानें चालू झालें. त्या चिंतनांतून 'नवा' दासबोध निर्माण झाला.

**आनंदवनभुवन :** उत्तरवयांत लिहिलेल्या रामायणांत शिवाजीनें उभारलेल्याच रामराज्याचें चित्र रामदासांच्या मनांत दिसतें. 'आनंदवनभुवनांत' तें स्पष्टच दिसतें.

**बुडाले सर्वही पापी, हिंदुस्थान बळावले ।**
**अभक्तांचा क्षयो जाला, आनंदवनभूवनीं**
**बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संहार जाहला**
**मोडलीं मांडलीं क्षेत्रें, आनंदवनभूवनीं**
**स्नानसंध्या करावया, उदंड जहालें पाणी,**
**जपतप अनुष्ठानें ।आनंदवनभूवनीं**

असा अमर्याद आनंद आनंदवनभुवनांत वर्णन केला आहे. वस्तुतः हें सगळें पूर्णपणें व्हावयाचें होतें. औरंग्या बुडाला नव्हता. यावरून रामदासांचें हें एक रम्य स्वप्न चित्रित झालें आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे म्हणतात, प्रकरणाचा रचनाकाल शके १५६६ च्या आसपास ठरतो. (पा. सं.क्र.४४८)

**रामवरदायिनीः**—मृत्यूच्या पूर्वी तीन वर्षे शके १६०० मध्यें रामदास प्रतापगडच्या भवानीमातेच्या दर्शनास गेले होते. त्या वेळीं **रामवरदायिनी** हें प्रकरण रचलें. त्यांत ते प्रार्थना करतातः—

**येकचि मागणें आतां, द्यावें तें मजकारणें**
**तुझा तूं वाढवी राजा, शीघ्र आम्हांसि देखतां.**

आणि शेवटीं म्हणतातः

**दुष्ट संहारिलें मागें, ऐसें उदंड ऐकतों**
**परंतु रोकडे कांहीं, मूळ सामर्थ्य दाखवीं**

या स्फुट काव्याप्रमाणेंच रामदासांनीं भारुडें, पदें, इत्यादि वेळोवेळीं रचिलीं आहेत.

**दासबोधः जुना आणि नवा**

" समर्थांचें वाङ्मय हें एक तऱ्हेनें साधकाचें वाङ्मय आहे. म्हणजे कोणत्या तरी विषयाचें शास्त्रीय पद्धतीचें विवरण करणाऱ्या एखाद्या आधुनिक शास्त्रीय ग्रंथाचें स्वरूप त्यास नसून मोक्षाच्या साधनमार्गावर साधकास प्रगत करणाऱ्या ग्रंथाचें स्वरूप त्यास आहे. विवेचनाच्या स्वरूपांत साधकांच्या भिन्नभिन्न भूमिकांमध्यें वेगवेगळेपणा आढळतो. त्यामुळें प्रसंगीं त्यांत एक तऱ्हेची विसंगतीहि भासण्याचा संभव असतो. "

(प्रा. प्र. वा. बापट रौ. म. मृ. ३५८)

रामदासांची शिकवण सांगणारा ग्रंथ **दासबोध** हा होय. **दासबोधाच्या** रचनेचा इतिहास थोडा पाहिला पाहिजे . आपल्यापुढें असलेल्या दासबोधांत दोन भाग आहेत. एक जुना दासबोध आणि दुसरा नवा दासबोध. जुना दासबोध लिहितांना भागवत धर्माचेंच प्रवर्चन करण्याचा हेतु स्पष्ट दिसतोच. जुना अर्थात् एकवीस दशकी दासबोध शके १५५४ मध्यें रचिलेला आहे. त्यानंतर तीर्थयात्रा केल्यावर आपला पूर्वीचा बोध दासांना बदलावासा वाटला. संघटना सुरू झाली. नानातऱ्हेचीं माणसें हाताशीं धरावीं लागलीं आणि व्यक्ति व प्रसंग यांच्या प्रमाणें बोधाचें स्वरूप ठेविणें प्राप्त झालें. जुन्या दासबोधांत अशी दासांच्या हयातीपर्यंत भर पडत गेली. १६०३ मध्यें आजचा प्रचलित २० दशकी दासबोध पूर्ण झाला. श. १५५४ ते १६०३ अशीं ५० वर्षें दास-

बोधाची रचना होत होती. दशक वा समास एखाद्या ग्रंथाची प्रकरणें नसून प्रसंगोपात्त व्याख्यानेंच आहेत. जुन्या दासबोधांतला कांहीं भाग नव्या भागांत आला आहे. उदा० जुन्या दासबोधाचे ४-५-६-८ हे समास हे नव्या दासबोधांत अनुक्रमें द ५ स. २, द. ५ स. ३, द. ६ स. १०, द. १२ स ५ असे आहेत. परिस्थितीचें ज्यांत प्रतिबिंब दासांच्या कडकडीत भाषेंत उमटलें आहे तो नव्या दासबोधातला नवा भाग होय. तीर्थयात्रेच्या प्रसंगीं त्यांनीं जें जीवन पाहिलें तें थोड्याफार प्रमाणांत ज्ञानेश्वरास, नामदेवास आणि एकनाथासहि दिसलें नसेल काय ? ज्ञानेश्वरानें तीर्थयात्रा झाल्याबरोबर जगाचा निरोप घेतला. नामदेवानें व एकनाथानें परचक्राचें स्पष्टदर्शन घेतलें; परंतु दासांच्या मनावर त्याचा इतका परिणाम होणें हें प्रकृतिवैशिष्ट्य होय. त्यामुळें या परिस्थितींत धार्मिक जीवनांतहि घर-गळत चाललेल्या समाजास धक्के चपेटे देऊन जागृत करण्याचें त्यांनीं ठरविलें. महंत, मठ, शिष्यसमुदाय, इत्यादींविषयीं संघटनेच्या धोरणानें दासबोधांत जो भाग आला आहे तो 'नवा' आहे. यापूर्वीच्या संतांनीं तसा विचार केला नव्हता. निषेध त्यांनींहि केला. उपदेश त्यांनींहि केला, परंतु शिष्य-संघटनेनें प्रचार करण्याचें कार्य हें खास दासांचेंच ! परंतु या संघटनेंतहि त्यांचा जो आदेश आहे तो पूर्वीच्या संतांच्या सारखाच आहे. फार काय जुन्या आणि नव्या दासबोधांतहि तो सारखाच आहे. आधीं प्रपंच सोडावा असें सांगितलें आणि मग करावा असें सांगितलें. इतका त्यांत विरोध नाहीं. 'प्रपंच परमार्थ बुडवणा' हा 'जुना' बोध आणि 'आधीं प्रपंच करावा नेटका' हा 'नवा' बोध यात विरोध दिसतो, ''तो वरवरचा शाब्दिक आहे. तत्त्वतः यांत विरोध नाहीं.'' हें श्री. ज. स. करंदीकर यांनीं स्पष्ट दाखविलें आहे. (सु. म. ग्रं. ४०१) देहाची निंदा आहे तेथें ती देह-बुद्धीची निंदा आहे. देह म्हणजेच मी असें मानणें किती बाष्कळ आहे तें पटविण्याकरिता ती निंदा आहे. 'देहेबुद्धि ती आत्मबुद्धि करावी' या करितां अशी निंदा आहे. (जु. दा. ७।४२) त्याचप्रमाणें 'बहुत जन्माच्या शेवटीं जिणें चुके अटाटी । तो हा नरदेह भेटी ।

करी भगवंती । (६-२६)

या नरदेहाचेनि लागवेगें । सार्थक करावें संतसंगें ( ६-२८ )

या ओव्या नव्या दासबोधांत समाविष्ट झाल्यानें या जुन्या बोधांतल्या आहेत हें फारसें कोणाच्या लक्ष्यांतच येत नाहींत ( ज. स. करंदीकर सु. म. ग्रं. ४०३ ) देहाचें जें थोरपण । तेंचि देहबुद्धिचें लक्षण । मिथ्या जाणोनि विचक्षण । निंदाति देहो-ही ओवी जुन्या दासबोधांत (७-४२) आणि नव्या दासबोधांत ( ७-२-३४ ) एकच आहे. 'नवा दासबोध हा हा केवळ मुमुक्षूंनाच उद्देशून लिहिला नसून अखिल समाजास उद्देशून लिहिलेला आहे. ' ( सु. म. ग्रं ४०३ )

चाफळ खोऱ्यांत शिवाजी, निळो सोनदेव, बाळाजी आवजी चिटणीस यासारखी माणसें भोंवतीं जमलीं, भजनीं लागलीं, त्यांना क्षात्रधर्म, सेवकधर्म, दंडनीतीचाच उपदेश करणें सुसंगत होतें. परंतु त्या उपदेशांतहि तुम्ही धर्मस्थापनेचे नर असे ईश्वराचे अवतार आहांत ही जाणीव दिली आहे. देशाचें सांस्कृतिक जीवन हें नित्य कर्म आहे. राजकारण हें नैमित्तिक आहे. सांस्कृतिक जीवनांतील प्रभावी गुणांचें कार्यक्षेत्र राजकारणांत थोडें फार बदललें तरी शेवटीं राजकारणांतूनहि सांस्कृतिक जीवनाचेंच रक्षण करावयाचें असतें ! ही व्यापक दृष्टि दासांच्या महाराष्ट्रधर्मांत आहे. या दृष्टीनें दासबोधांत नवें आणि जुनें असा भेद नाहीं. वरवर पाहणारास तो दिसतो आणि वादांत गाजवितां येतो एवढेंच !

जुन्या दासबोधांत १३४० ओव्या तर नव्या दासबोधात ७७५१ ओव्या आहेत. परंतु यांत पहिल्या आठ दशकांतील पारमार्थिक भागांतच ३८६६ ओव्या आहेत. म्हणजे हा पारमार्थिक भाग जुन्या दासबोधाच्या तिप्पट झाला. विस्तार होतां होतां पारमार्थिक विचारांचाहि विस्तार झाला. नव्या दासबोधाचा दुसरा भाग म्हणजे ९ ते २० दशक यांत जुन्या दासबोधांत न आलेले पुष्कळ विषय आहेत. तरी तेवढ्यानें समर्थांच्या मनांत, वेदान्ताच्या तत्त्वज्ञानांत आणि तात्विक दृष्टींत फरक पडला असें नाहीं. किंबहुना त्यांच्या ठासीव भाषापद्धतींतहि अंतर पडलेलें नाहीं. ही एकरूपता इतकी आहे की, चिकित्सक श्रोत्याला मधलेंच एखादें प्रकरण काढून त्यातल्या पांचदहा ओव्या वाचून दाखविल्या

तर त्या जुन्या दासबोधांतल्या आहेत कीं, नव्या दासबोधांतल्या आहेत हें तो खात्रीपूर्वक सांगू शकणार नाहीं. जुना दासबोध घ्या, नवा दासबोध घ्या अथवा स्फुट प्रकरणें घ्या त्यांतले सिद्धांत इतके ठाम आहेत कीं, ते अमुक ठिकाणचे म्हणून नाकारावयाचे आणि अमुक ठिकाणचे म्हणून स्वीकारावयाचे असा भेदभाव करण्याचें कारण नाहीं. 'पहिलें हरिकथा निरुपण एवढेंच' जुन्या दासबोधांत आहे आणि दुसरें तें राजकारण, तिसरें तें सावधपण सर्व विषयीं. चौथें अत्यंत साक्षेप हें नव्या दासबोधांत आहे तथापि हा फरक तत्वज्ञानांत नाहीं. उपदेश घेणाऱ्याच्या भूमिकेनुसार आहे. आणि तत्त्वज्ञानाचीच तुलना करावयाची झाल्यास जुन्या दासबोधाची नव्या दासबोधाच्या पहिल्या आठ दशकांतील विवेचनाशींच करावी म्हणजे त्या दोहोंत पूर्ण साम्य दिसून येईल. ( सु. म. ग्रं. ४०४ )

जुना दासबोधः—

**जयास वाटे वैराग्य करावें, तेणें कांहींच न विचारावें !**
**उठोनि वाटेसि लागावें, दिगंताप्रती** ( १८-२४ )
**प्रपंच म्हणजे उदास नागवणा ।**
**आणि परमार्थ म्हाणिजे प्रपंचबुडवणा** ( १८-२१ )

नवा दासबोधः—

**परमार्थ सांडूनि प्रपंच करिसी । तरी तूं यमयातना भोगिसी**
( १२-१ )
**जगदीशा परता लाभ नाहीं** ( १२-८-३० )

आणि प्रपंच व परमार्थ यांचा समन्वय असा

**प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी**
**संसारी असतांच मुक्त । तोचि जाणावा संयुक्त**
**अखंड करी युक्तायुक्त । विचारणा हे** ( नवा दासबोध १२-१ )

**सावधपणें प्रपंच परमार्थ करणें । इहलोक परत्र साधावें दोहीकडे**
आणि याखेरीज गत्यंतरच नाहीं कारण—

**उपाधी कांहीं राहात नाहीं । समाधाना एवढें थोर नाहीं**
**नरदेह प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणां**

( नवा दासबोध १९-८-३० )

हा समन्वयाचा विचार जुन्या दासबोधांत नाही. कारण जुन्या दासबोधाची बैठक संताची तर नव्या दासबोधाची महंताची. आणि महंताचें कार्य ' महंते महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावें । जाणते करून विवरावें नाना देशी । दृढनिश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा । विश्वजन उद्धरावा । संसर्गमानें । सकळा राजी राखणें । ही मुख्य भक्ति म्हणिजे ।

समर्थांच्या बोधांत जुनें--नवें दाखविण्याची व पाहण्याची जी रूढि पडली आहे ती दिशाभूल करणारी आहे हें सांगण्यासाठीं एवढा विस्तार केला.

' दासबोधांतील राजकारण ' : ( या विषयाविषयी प्रा. न. र. फाटक यांनीं विविधज्ञानविस्तारांत १९२९ सालीं केलेल्या विवेचनाचा सारांश पुढें दिला ) ग्रंथाला दासबोध हें नांव आहे. ' येथ बोलिला विशद भक्तिमार्ग ' असा त्या ग्रंथांतील विषय सांगितला आहे. भक्तिचेनि योगें देव । निश्चयें पावतो मानव। ऐसा आहे अभिप्राय। इथें ग्रंथीं. असा प्रत्यक्ष रामदासांचा ' अभिप्राय ' आहे. माझी भूमि, माझा देश, इत्यादि प्रकारच्या 'अभिमानाचें ओझें वाहतां अवचित मरोनि गेला' असा या अभिमानाचा निषेध केला आहे. 'नेणतां कांहीं राजकारण । अपमान करूनि घेती प्राण ' इत्यादि उद्गारांत राजकारण म्हणजे व्यवहारचातुर्य असाच अभिप्राय आहे. निस्पृहाचें 'राजकारण' म्हणजे 'ठायीं ठायीं भजन लावणें' ' प्रत्ययानें प्राणिमात्र सोडविणें' असें आहे. उत्तम पुरुष लक्षण म्हणजे विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंगारिजे. तसेंच चातुर्य

म्हणजे प्रपंचीं जाणें राजकारण । मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण सर्वविषयीं. असें राजकारणाचें महत्व आणि स्थान आहे. व्यावहारिक गुणांची यादी देतांना अक्षर बरें । वाचन बरें असें सांगत पुढें, तीक्ष्ण बुद्धि राजकारणीं बरी । आपणास राखे नानापरी । अलिप्तपणें असें 'राजकारण' गुणाचें स्वरूप दाखविलें आहे. क्षात्रधर्म शिवाजीस सांगितला. त्यांतहि अवघा हलकल्लोळ करावा । धर्मसंस्थापनेसाठीं असा रोख आहे. अशीं सर्व लहान मोठीं स्थळें पाहून प्रा. न. र. फाटक यांनीं असें दाखविलें आहे की, रामदास राजकारण हा शब्द tact व्यवहारचातुर्य याच अर्थानें योजतात. शिवाजीनें अंगावर घेतलेल्या राजकारणाशीं त्याचा तसा संबंध नाही. जगदीशासी भजत जावें हाच त्यांचा मुख्य आदेश आणि 'या कारणें समुदाय । झाला पाहिजे महोत्सव । हातोहातीं देवाधिदेव । बोळखा करावा । हेंच मार्गदर्शन त्यांनीं केलें.

"शिवाजी व रामदास या दोघांनाहि हें माहित होतें कीं, ज्याचा उद्योग त्यानें करावा. रामदासानें तलवारीला मान दिला असला तरी ती लहानशा कुबडींत गुप्त रीतीनें ठेवण्यापुरता. शिवाजी महाराजांनींहि सनातन वैदिकधर्माला मान दिला असला तर तो मी मिळवितों तें राज्य देवब्राम्हणाकरितां असें मधून मधून म्हणण्यापुरताच. शिवाजी व रामदास यांचे संबंध कसे व काय होते याविषयीं आपणाला जवळ जवळ अनुमानावरच भिस्त ठेवावी लागेल इतका थोडा कागदोपत्रीं पुरावा आहे. ( न. चिं. केळकर पहिला सुमनहार श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर उद्घाटन निबंधमाला पृ. ६५–६६ )

पूर्वीच्या संतांच्या भागवतधर्मापेक्षां रामदासांचा महाराष्ट्रधर्म निराळा आहे आणि रामदासहि भागवतधर्म प्रचारक संतांपेक्षां निराळे आहेत असें वारंवार सांगणारा एक पक्ष आहे. शिवाजी आणि रामदास हे समकालीन होते. आणि त्यांच्या भेटीगांठी झालेल्या, इत्यादि कारणांमुळें आणि रामदासांच्या क्षात्रधर्मादि प्रकरणामुळें शिवाजीच्या कार्यास प्रत्यक्ष साहाय्य करणारा, मार्गदर्शन करणारा असा हा

एक राष्ट्रपुरुष होऊन गेला अशी भावना होणें साहजिक आहे. परंतु रामदासांचें वाङ्मय विशेषतः दासबोध पाहिल्यास रामदासांचें राजकारण हें शिवाजीच्या राजकारणापेक्षां अगदीं निराळें होतें हें दिसून येतें. संतांनीं जें सांगितलें तेंच पटविण्यासाठीं दासांनीं बोध केला आहे. दोघांचें अंतरंग अगदीं एक आहे यांत संशय नाहीं. अनेक अभ्यासकांनीं हें अनेकवार, साधार, विस्तृत विवेचनानें दाखविलें आहे.

रामदासांचा 'बोध' :

"लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केल्यावर त्यांना जिकडे तिकडे गोंधळाशिवाय दुसरें तिसरें कांहींच दिसेना. देवाची भक्ति वाढवावयाची हेंच त्यांचें ध्येय; परंतु देवाबद्दल लोकांना स्पष्ट कल्पना नाहीं. सर्वत्र नाना मतें व नाना पंथ यांचें प्राबल्य माजलेलें आहे. यांतून लोकांना मार्ग दाखवावयाचा तर ईश्वराच्या शुद्ध स्वरूपाची परीक्षा करण्याशिवाय समर्थांना गत्यतर नव्हतें."–प्रा. न. र. फाटक ( सु. म. ग्र. ४१३. )

"अनेक राज्यक्रांत्या आणि घडामोडी होत असतां कोणीहि साधुसंतानें एक ब्र देखील काढिला नाहीं की, तो काढण्याची कल्पना व आवश्यकताहि कोणा संत गुरूला आजपर्यंत वाटली नाहीं आणि रामदासानें ती गोष्ट कळकळीनें आपल्या लोकांपुढें आणि देशांतल्याहि लोकांपुढें मांडिली. तेव्हां हा सर्व प्रकार कौतुकास्पद वाटावा यांत नवल नाहीं." ( म. सा. २-२० )

**मानिला प्रपंचीं विनोद । केला परमार्थी विनोद**
**सूकर पूजिलें विलेपनें । म्हैसा मर्दिला चंदनें**
**रासभ उकिरडा लोळे । तयास परिमळ सोहळे**
**उलूक अंधारीं पळे । तया कैचि हंसपंगाति**

हें पाहिल्यावर त्यांनीं परमार्थ आणि प्रपंच यांचे संबंध आणि स्वरूप पुन्हां एकदां स्पष्ट केलें.

संसारी असोन अलिप्त म्हणे । हें तो फटकळ बोलणें । (जु.दा.१८-२०)

असा पूर्वीच्या संतांच्या उपदेशाचा निषेधहि समर्थांनीं स्पष्टपणें केला आणि उपाधीसी विस्तारावें असेंहि सांगितलें. परतु उपाधींत न सांपडतां विस्तारावें ही पुस्ती जोडण्यास ते विसरले नाहींत. नुसतें उपाधीस विस्तारावें एवढेंच करण्यासाठीं कांहीं करावें लागत नाहीं. तेवढेंच करावयाचें म्हणजे 'नीचत्व पहिलेंच घ्यावें' आणि शिवाय 'मूर्खपण'! उपाधींतून निघण्यासाठीं ऋणानुबंधें मिळाले सर्वहि। प्रारब्ध-योगें करुनि राहे, लोकामध्यें। हा विचार उपयोगी पडतो. लाभलें तें प्रारब्ध आणि तें सर्व भगवंताकारणें करण्याच्या बुद्धीनें केलें म्हणजे अपरिहार्य उपाधीत न सांपडतां पैलतीर गांठतां येतें. मनोगत अवघे परब्रह्मीं। शरीर वर्ते मायाभ्रमीं। तयास संसार उर्मी। बाधूं न शकती.

उपाधींत न सांपडतां, नागवण न होतां, प्रपंच नेटका करण्यासाठीं सद्गुरुसेवा, सज्जनांचा सहवास, नामस्मरण, नवविधाभक्ति, आश्रमधर्मा-चरण, इत्यादि अनुभवसिद्ध साधनांचा निर्वाळा दासांनीं दिला आहे. त्यासंबंधीं त्यांचे विचार भागवत धर्मप्रणेत्यांच्या विचारांशीं तंतोतंत जुळणारे आहेत.

त्यांनीं हें सांगतांना क्षणोक्षणीं 'सावधान' 'सावधान' अशी घोषणा केली आहे. विवेक हा जणूं त्यांचा मंत्र आहे! रामनामाइतका 'विवेक' शब्दाचा जप त्यांनीं केला आहे. विवेकासाठीं ग्रंथावलोकनावर, पठणा-वर त्यांनीं भर दिला. ग्रंथाचें महत्त्व रामदासाइतकें कोणी सांगितलें नाहीं. मूर्खांचीं लक्षणें इतक्या विस्तारानें सांगितलीं, तेंसुद्धां विवेका-साठींच! सर्व क्षेत्रांतील खोटेंपण त्यांच्याइतकें भेदक दृष्टीनें कोणी दाखविलें नाहीं.

सर्व वस्तुजातीचें इतकें सूक्ष्म निरीक्षण त्यांच्याइतकें कोणाच्या ग्रंथांत सहसा आढळणार नाहीं. विषय कोणताहि असो. त्याच्या नामोच्चारा-बरोबर त्या विषयाचें सर्व जग त्यांच्यापुढें एकदम उभें राहतें. आणि मग 'तो एक', 'तो एक' असें ते दाखवूं लागतात. मग त्या विषयांतला कोणताहि भाग त्यांतून सुटणें शक्य नाहीं. (उदा० मृत्यूचीं सावजें (३-९) नाना मंत्र (५ ४) परीक्षा (५-५) गुरु (५-२) कृमिकीटक (१-१०). इ०

संसाराचें इतकें परिपूर्ण चित्रण कोणी केलें नाहीं. परंतु यावरून त्या संसाराबद्दल दासांना कांहीं 'भलतें' वाटत होतें आणि तेंच त्यांना पटवावयाचें होतें, इत्यादि अनुमानें कांहीं प्रसिद्ध अभ्यासक आज तागायत काढीत आहेत खरे !

**वक्ता भीडसारु जोडे। तरी श्रोतयांसी अंधार पडे**
**म्हणोनी वक्त्याकडे। भीड ते ही नसावी**

रामदास अध्यात्मवादीच होते. पूर्वीच्या संतांचेंच कार्य त्यांनीं योजिलें आणि तें कालमानाप्रमाणें कांहीं विशेष मार्गाचा अवलंब करून पार पाडलें. साध्याच्या बाबतींत रामदास आणि भक्तिमार्गातील इतर संतकवि यांच्यांत पूर्ण ऐक्यच आहे. साधनाच्या बाबतींत थोडाफार फरक आहे तो तपशीलाचा आहे.

भावबळाचें माहात्म्य रामदासांनाहि मान्य आहे. परंतु भाव हा जर विवेकाच्या कसोटीवर बावनकशी ठरणारा नसेल तर त्याला किंमत देण्यास रामदास तयार नाहींत.

**भोळा भाव सिद्धीस जाव। हा उधाराचा भाव।**
**रोकडा मोक्षाचा अभिप्राय। विवेकें जाणावा।**
**जितुका भोळा भाव। तितुका अज्ञानाचा स्वभाव।**
**अज्ञानें तरी देवाधिदेव। पाविजेल कैचा**

प्रपंच परमार्थाच्या आड येत असला तर केवळ तोंडानें प्रपंचाचें क्षणभंगुरत्व गात राहून प्रपंचांतून सुटका होत नाहीं. परमार्थासाठींसुद्धां प्रपंचाशीं झगडावें लागतें इतकेंच नव्हे तर ज्याला प्रपंच नीट करतां येतो त्यालाच परमार्थ साधेल अशी रामदासांच्या उपदेशाची दृष्टि आहे. त्यांच्या डोळ्यांसमोर शिवकालीन राजकीय चळवळी चालू होत्या. त्यांस यशाहि येऊं लागलेलें होतें व त्यामुळें त्या आकांक्षांशीं रामदास समरस झालेले दिसतात. भोंवतालीं चाललेलें कार्य हें रामाचेंच कार्य आहे अशा दृष्टीनें त्यांनीं स्वातंत्र्य आणि स्वराज्य यांचा पुरस्कार करणारे उद्गार अनेक वेळां काढलेले आहेत. शिवाजीस केलेला उपदेश,

संभाजीस पाठविलेलें पत्र हे प्रत्यक्ष प्रसंग आणि इतर ठिकाणीं व्यवहार-धर्माचें श्रेष्ठत्व सांगतांना केलेला उपदेश, त्यावरून एवढें स्पष्ट होतें कीं, समाजांतील दुबळेपणा जाण्यासाठी त्यांनीं जो वेळोवेळीं उपदेश केला आहे त्यांत त्यांची ही वृत्ति स्पष्ट दिसून येते. विवेकाचें महत्त्व सांगण्याचा एकहि प्रसंग रामदासांनी सोडला नाहीं आणि त्याबद्दल पुनरुक्तीचा तर त्यांना कंटाळाच नाहीं. विवेकाइतकाच प्रयत्नवादावर त्यांचा भर आहे. प्रारब्धांत कांहींहि असो; 'येत्न' हाच देव मानून त्याची उपासना करावी.

**जिहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले**
**येर ते बोलतचि राहिले । करंटे जन ॥**
**शक्तींनीं मिळतीं राज्यें । युक्तिनें यत्न होतसे ॥**
**शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥**
**केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ॥**
**यत्न तो देव जाणावा । अतरीं जाणतां बरें ॥**

'न लगे शास्त्रपठन' या संतवचनाधारें मूर्खपण, भोळेपण माजलें होतें. रामदासांनीं ज्ञान, शास्त्रपठन, अध्ययन, वाचन, लेखन, इत्यादि गोष्टींवर भर दिला आहे. ज्या मार्गांत अनेक प्रकारचे संदेह ग्रासण्यास उभे आहेत त्या मार्गांत विवेकापासून आणि ज्ञानार्जनावांचून कसें चालेल ?

विरक्तास, मुक्तासहि ज्ञानोत्तर कर्मे आहेत हें ज्ञानेश्वरानें सांगितलेंच होतें. रामदास पुन्हां सांगतातः

**विरक्तें भक्ती वाढवावी । विरक्तें लावावें भजन ।**

गुरूचा महिमा अनेक प्रकारें सांगून भागत नव्हतें कारण तो ऐकतां ऐकतांच समाजांत भोंदूची पैदास वाढतच होती. म्हणून खरे गुरु, खोटे गुरु यांचीं अतिशय विस्तृतपणें रामदासांनीं ओळख पटविली.

**सद्गुरुविण ज्ञान कांहीं, सर्वथा होणार नाहीं ।**

आणि—

**ज्ञानविरहित जें जें केलें, तें तें जन्मासि मूळ आलें ।**
**म्हणोनी सद्गुरुचीं पाउलें, सदृढ धरावी ।**

अनेक प्रकारचीं व्रतवैकल्यें केलीं; स्नानें, उद्यापनें, पुराणें, निरूपणें, उपोषणें, फार काय चौदा विद्यांचा अभ्यास करून रिद्धिसिद्धी जरी बोळल्या तरी,

**सद्गुरुकृपें विरहित । सर्वथा न घडे स्वहित ॥**
**सद्गुरुहून देव मोठा, जयास वाटे तो करंटा ।**
**सद्गुरु वर्णवेना, हे गे हेंचि माझी वर्णना ।**

भक्तिमार्गाच्या सोपेपणाबद्दल भलते समज पसरले होते. तोंडानें हरि हरि करीत मनानें खुशाल ससारांत डुंबत राहण्याचा प्रकार पाहून रामदासांनीं सांगितलें कीं, केवळ भाबडेपणानें केलेल्या नामस्मरणानें भक्तिमार्ग साधणार नाहीं. तेंहि एक प्रकारें आक्रमणच आहे. प्रपंच हाच शत्रु आहे असें नुसतें घोकीत राहून प्रपंचाची बेडी तुटत नाहीं. प्रपंचावरचें आक्रमण यशस्वी करण्यासाठीं शरीराचें सुद्धां सामर्थ्य जुंपलें पाहिजे. नरदेहाचें अत्यंत उद्वेगकारक वर्णन केलें आहे. तें नरदेहाविषयींच्या आसक्तीच्या निराकरणासाठीं. परंतु भक्तिमार्गाचें साधन म्हणून नरदेहाचा उपयोग झालाच पाहिजे. दुबळ्या देहाला ईश्वराची उपासना साधत नाहीं ! प्रपंचाशीं झगडावें हा धकाधकीचा मामला अशक्ताला कसा साधणार ?

परंतु विरक्ति अंगीं बाणली असेल तर मग इतकी यातायात करण्याचें कारणच नाहीं.

**जरी ठाकेना विरक्ति । तरी यथाशक्ति भजन करावें**
**संसारत्याग न करितां, प्रपंचव्याधी न सांडितां ।**
**जनामध्यें सार्थकता, विचारेंचि होये**
**देहींच विदेह होणें, करून कांहींचि न करणें**
**जीवन्मुक्तांचीं लक्षणें, जीवन्मुक्त जाणें**

जीवन्मुक्तासहि कर्तव्यकर्म आहेच.

**क्रिया करून करवावी । बहुतां करवीं ।**
**शहाणे करून सोडावे । बहुत जन ।**
**बहुत जनास चाळवी । नाना मंडळें हालवी**
**ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होये**

एकनाथानेंहि हें सांगितलें होतें—

**अभेद भक्ति वैराग्यज्ञान । स्वयें आचरोनि आपण ।**
**देखी लावावे इतर जन, लोकसंग्रहलक्षण जाण या नांव**
**अवताराचें सामर्थ्य पूर्ण, प्रपंचपरमार्थीं सावधान ।**
**उभयतां दिसों नेदी न्यून, तें निजचिन्ह अवधारीं ।**

नवविधा भक्तीचें अतिशय उत्कट वर्णन करणारे रामदास मूर्तिपूजेंतील भाबडेपणाची गय करीत नाहीत.

देवें निर्मियले क्षिती । तिचे पोटीं पाषाण होती
तयासची देव म्हणती । विवेकहीन

देवाची खरी ओळख केवळ मूर्तिपूजेनें होणार नाहीं. परंतु मूर्तिपूजक हे आपल्या आराध्यदैवताविषयीं अज्ञानानें दुरभिमान बाळगतात आणि त्यांतच भक्तीचें सार्थक समजतात. या अज्ञानास उद्देशून रामदास म्हणतात——

पाषाणाचा देव केला । एके दिवशीं भंगोन गेला
तेणें भक्त दुखावला । रडे ओरडे आक्रंदे
म्हणून देव करीजे ऐसा नाहीं । देव टाकीजे ऐसा नाहीं
म्हणोन याचा कांहीं । विचार व्हावा
अज्ञानें तरी देवाधिदेव । पाविजेल कैसा

मूर्तिपूजनामुळें आणि उपास्यांच्या अनेकत्वामुळें उत्पन्न झालेला कोलाहल दाखवून भक्तांस रामदासांनीं शेवटीं सांगितलें आहे कीं,

लोकांचें डोई जो लागला । तो अनुमानेंचि बुडाला
याकारणें प्रत्ययाला । पाहिलेंच पाहिजे
बहुतांचें बोली लागले । ते प्राणी अनुमानीं बुडाले
उदंडाचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पहावें

अशा रीतीनें उपासनेच्या कोणत्याहि अवस्थेमध्यें विवेक जागृत ठेवण्याचा इषारा ठिकठिकाणीं दिला आहे.

गुणांच्या विवेचनांत उपजत गुणापेक्षा आगंतुक गुणांवर त्यांनीं भर देला. कारण ते प्रयत्नसाध्य असतात. हे आगतुक गुण म्हणजे अंतर्गुण, अंतःकरणाचें सौंदर्य वाढविणारे गुण !

घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहूनि जाड

हीच रामदासप्रणितजीवनाची प्रचंड आकांक्षा आहे.

देवविषयक कल्पनांचा गोंधळ सांगतांना त्यांनी प्रचलित देवांची यादीच दिली आहे आणि शेवटीं आपलें मत सांगितलें आहे.

ब्रम्हा, विष्णु, महेश । हा ऐलिकडील विचार
महाद्वार ओलांडावें । मग देवदर्शन घ्यावें
तेसें दृश्य हें सांडावें । जाणोनिया

" रामदासांनीं या ( संतांच्या ) शिकवणुकीला व्यवहार्य व प्रादेशिक केलें. परमार्थाबरोबर प्रपंचाची, दैवाबरोबर प्रयत्नाची, धर्माबरोबर अर्थाची व राजकारणाची आवश्यकता व महती दाखविली. "

—प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर ( सु. म. ग्रं. १४८ )

" दासबोधांत विशेष हा आहे कीं, महाराष्ट्रांतील तत्कालीन स्थितीला ज्या प्रकारचें निरूपण पाहिजे होतें त्याप्रकारचें निरूपण या ग्रंथांत आहे. गीतादि ग्रंथांत केलेलें निरूपण सर्व कालीं, सर्व देशांना लागू पडणारें असून सूत्रवत् त्रोटक आहे. तसा प्रकार दासबोधाचा नाहीं. दासबोधांत गीतेंतील निरूपण तत्कालीन महाराष्ट्राला अनुलक्षून स्पष्ट भाषेंत विस्तृत केलेलें आहे.

" दासबोध हा ग्रंथ ज्याला इतिहासाचें तत्त्वज्ञान म्हणतात त्याचा आहे. इतकेंच कीं, या ग्रंथांतील विचारसरणीची पद्धत ऐतिहासिक नसून अध्यात्म किंवा तात्त्विक आहे. परमार्थप्राप्तीशीं प्रारंभ करून नीतिधर्म व राज्यसंस्थांचा उदय कसा होतो याचें निरूपण या ग्रंथांत केलें आहे. रामदास व त्यांच्या पूर्वींच्या संतमंडळींत हाच मोठा फरक आहे कीं, पूर्वींचे संत एकदेशी होते व रामदास सर्वदेशी होते "

—राजवाडे : रामदास

"इतर कोणत्याहि संतापेक्षां त्यांना समुदाय करण्याचा व समुदायाला शहाणे करून सोडण्याचा हव्यास जास्त होता. लोकांना सोडून सिद्धांचें चालणार नाहीं किंबहुना लोकांच्या अज्ञानांची जो उपेक्षा करील त्याची सिद्धावस्था असून नसून सारखीच, असा कटाक्ष त्यांच्या शिकवणींत ओत-प्रोत भरलेला आहे. समर्थांच्या शिकवणीमध्यें चटकन डोळ्यांत भरण्याजोगी आणखी एक गोष्ट आहे. ती म्हणजे ग्रंथावलोकन. प्रत्येकानें कांहींतरी ग्रंथावलोकन करावें. नुसतेंच ग्रंथावलोकन करूं नये तर त्यांतील वचनांचें अर्थांतर शोधावें. समर्थांच्या ग्रंथावलोकनपर अभिरुचीचा एक परिणाम त्यांच्या मठांतून झालेला ग्रंथसंग्रह हा होय.

"परमार्थसाधनांत भोळेपणाला समर्थांनीं थारा दिलेला नाहीं. सामान्यतः परमार्थविचारांत श्रद्धा, भाविकपणा, असल्या मनोविकारांची महती आढळते. समर्थ हे पराकाष्ठेच्या तर्कांचे भोक्ते व अनुभवाचे तर अनन्य भक्त होते. म्हणूनच समर्थांनीं अनुमानधपक्यानें चालण्यावर कोरडे ओढले आहेत आणि अनुभवाचे म्हणजे प्रचीतीचे पोवाडे गाईले आहेत.

"समाजाच्या अधोगतीचें बीज समाजघटकांच्या स्वभावदोषांत असतें. ही जाणीव समर्थांनीं आपल्या वाङ्मयांत सर्वत्र मोठ्या कटाक्षानें व्यक्त केली आहे. माणुसकीची साफसुफी व उन्नति हें समर्थांचें कार्य होतें. जोंवर माणुसकींत मळ शिरण्याचा व माजण्याचा संभव आहे, तोंपर्यंत समर्थांच्या शिकवणीची परिणामकारकता लोपण्याचें भय नाहीं. समर्थांच्या

काळीं महाराष्ट्रांतील समाजाचा देव आणि धर्म संकटांत अडकला होता, म्हणून त्यांनी देवधर्माच्या भाषेनें उपदेश केला."

(प्रा. न. र. फाटक सु. म. ग्रं. ४१४-४२० )

"दास हे संतकवीप्रमाणें केवळ नीतिधर्मोपदेशक नसून दंडनीतीच्या जोरावर नीति व धर्म प्रचलित करणारें स्वतंत्र हिंदु राज्यहि त्यांना पाहिजे होतें. इतर संतांच्या पद्धतीचा एक दोष असा होता कीं, त्याच्या घोळक्यांत अज्ञहि बसूं शके. रामदासांच्या गटांत गबाळ सामावणें शक्य नव्हतें. जर संघटणेंत गबाळ शिरला तर ती ताबडतोब मोडलीच समजावी. एतदर्थ दासांना एकजिनसी समाज निर्माण करण्याची आवश्यकता भासली व तो त्यांना तत्कालीन समाजपरिस्थितींत ब्राह्मणांतून मिळालेल्या माणसांचा मुख्यतः बनवावा लागला. व्यवहार साधण्याचा हा मार्ग होता." (प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर सु. म. ग्रं. ८६ ).

"कर्मयोगाचें खरें महत्त्व, शुद्ध व प्रासादिक मराठी भाषेंत सांगितलेलें ज्यास पहावयाचें असेल त्यानें समर्थांच्या दासबोधाचें व त्यांतल्या त्यांतहि विशेषेंकरून उत्तरार्धाचें पठन केलें पाहिजे."

लो० टिळक—गीतारहस्य : ४९८-९९

## रामदासांचा पंथ

रामदासांच्या ग्रंथांचें आणि कार्याचें स्वरूप इतर संतांच्यापेक्षां एकदम निराळें दिसतें आणि त्यामुळें संतमालिकेंतून रामदासांना निराळें काढण्याचा मोह कांहीं अभ्यासकांना होत असतो ! परंतु रामदासांनीं दाखविलेली कार्यपद्धति त्यांच्यामागें यत्किंचित्‌हि राहिली नाहीं हें आश्चर्य वाटतें ! मठ आणि मठाधिपति यांच्यांत रामदासीबाणा मुळींच दिसूं नये यावरून 'रामदासांच्या शिष्यांनींच रामदासाचा पराभव केला' असें म्हणण्याची वेळ येते. परंतु पराभवाचे असे प्रसंग ज्ञानेश्वरादिकांवरहि आले. एकनाथांना जें जीर्णोद्धाराचें कार्य करावें लागावें त्यांत ज्ञानेश्वराची झालेली उपेक्षाच दिसत नाहीं का? प्रा. माटे यांनीं रामदासाचें निराळेपण सांगतांना राजकारणास गौण लेखिलें आहे. "राज-

कारणाची जननी जी प्रवृत्ति तिचेंच पुनरुत्थान रामदासाच्या हस्तें झालें. राजकारणाची उत्थानभूमि जी प्रपंचबुद्धि तीच उच्छिन्न होण्याच्या वाटेला लागली असतां तिला पुन्हां नवजीवन देणें हें राजकारण होऊन बसलें होतें... शिवाजीच्या प्रत्यक्ष राजकारणाला लागून मागें चिकटलेलें व त्याच्या यशाला उपयोगी पडणारें राजकारण रामदासानें केलें हें मात्र खचित." ( साहित्यधारा पृ. १७३ )

प्रा. माटे आपल्या लेखांत पुढें म्हणतात की, "प्रपंचाला आलेला हीनत्वाचा आरोप तर उडवून लावलाच—त्यानें प्रापंचिकांना सनद दिली. प्रपंचविज्ञान रचिलें हेंच त्याचें राजकारण होय. ( सा. धा. १७१ )

रामदासानें प्रपंचाविषयी इतरांपेक्षां फारच विस्तारानें बोध केला हें खरें आहे तरी त्यावरून प्रपंचाला मिळालेली सनद परमार्थापेक्षांहि श्रेष्ठ ठरावी असा रामदासाच्या बोधाचा अर्थ आहे असें म्हणतां येणार नाही.

प्रा. माटे यांनीं आपल्या लेखात असें म्हटलें आहे कीं, "रामदासाला पारमार्थिकांच्या हस्तें पराभव खावा लागला हें कांही खोटें नाहीं ! त्याचे शिष्य, शिष्य म्हणून होते तेसुद्धां श्रद्धाळू पारमार्थिक होते... दासबोध आणि तदितर ग्रंथ यात रामदासाने सांगितलेल्या प्रपंचविज्ञानाचें बीज परमार्थानें रुक्ष बनलेल्या महाराष्ट्रभूमींत दग्ध होऊन गेलें... सर्व प्रपंचविज्ञान त्याच्या ग्रंथांतच स्थगित झालें."

रामदासांचें प्रपंचविज्ञान आणि आधीचा परमार्थ यांत प्रा. माटे यांनीं जो तीव्र विरोध मानला आहे, तो मान्य होण्यासारखा नाही. रामदासांच्या शिष्यशाखेंत त्याच्या तोलाचा ग्रंथकार झाला नाहीं हें खरें आहे. रामदासाची अशी निराळी परंपरा फारशी प्रभावी ठरली नाहीं. निराळेपण राहिलें तें बाह्यांगापुरते, रामोपासनेपुरतेंच. परंतु वारकरी पथानेंच मुळीं शिव, विष्णु, इत्यादि भेदावर मुळींच भर दिला नसल्यानें रामदासी पंथाची रामोपासना हें फारसें महत्त्वाचें वैशिष्ट्य ठरत नाहीं. उपासनेच्या मार्गांत तशी तफावत नाहीं. 'एकनाथाचा भागवतधर्म व समर्थांचा महाराष्ट्रधर्म यांत अजिबात विरोध नाहीं. किंबहुना ते एकमेकांना परकच आहेत.' ( प्रा. गं. बा. सरदार रौ. म. ग्रंथ. १२५ )

" ज्ञानेश्वरांचा नाथसंप्रदाय, तुकोबांचा चैतन्यसंप्रदाय व समर्थांचा स्वरूपसंप्रदाय हे तिन्ही एकाच भागवत धर्माचे विकास आहेत. समर्थ इतर महाराष्ट्रसंतांप्रमाणें पूर्ण भागवतधर्मी आहेत. समर्थांनीं राष्ट्राच्या प्रपंचाकडे अधिक व्यापक दृष्टीनें पाहिलें यांत शंका नाहीं. दुर्दैवाची गोष्ट एवढीच कीं, त्यांच्या दृष्टीचा व्यापक कार्यकर्ता त्यांच्या संप्रदायांतहि त्यांच्या पश्चात् कोणीहि झाला नाहीं. पहिलें हरिकथा निरूपण, दुसरें राजकारण, तिसरें सर्वांविषयीं सावधपण व चौथा अत्यंत साक्षेप ही समर्थ-संप्रदायाची चतुःसूत्री आहे. त्यांच्या सांप्रदायिकांनीं त्यांच्या पश्चात् हरिभजनाची परंपरा मात्र कशीबशी चालविली आहे.

(पांगारकर. म. वा. इ.२-२६८)

" नाथांच्या विचारांची समर्थांच्यावर मोठी छाप पडलेली दिसते. वस्तुस्थिति अशी आहे कीं, सर्व महाराष्ट्रीय संतांनीं भक्तीचा प्रसार करतांना अद्वैत तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून तिचा पुरस्कार केला. यामुळें या सर्व संतवाङ्मयांत अद्वैतच पहावयास मिळेल.

( प्रा. शं. वा. दांडेकर, प्रसाद. फेब्रु. १९४९. )

**रामदासांचें काव्य**

**जेणें घडे भगवद्भक्ति ।**
**जेणें चढे विरक्ती ॥**

तेंच खरें कवित्व असा रामदासांचा स्पष्ट अभिप्राय आहे. परंतु या हेतूनें लेखन करतांना पूर्वी सांगितल्याप्रमाणें भगवद्भक्तीच्या आड येणाऱ्या प्रपंचाची वारंवार चर्चा रामदासांनीं केली. प्रपंच कसा आहे आणि कसा असावा याविषयीं लिहितांना ग्रंथ या दृष्टीनें जवळ जवळ पाल्हाळ वाटेल इतकीं विषयांतरें झालेलीं आहेत. परंतु स्वतंत्रपणें तीं वाचनीय आहेत.

सूचकतेवर रामदास सहसा विसंबत नाहीं. त्यामुळें कोणताहि विषय अगदीं सामान्यांतील सामान्यासहि कळेल इतक्या विस्तारानें मांडलेला आढळतो. महंतापासून मूर्खापर्यंत सर्वांचीं अगदीं बारीकसारीक लक्षणें सांगण्याचा त्यांना कंटाळा नाहीं. या तपशीलांत त्यांचें सूक्ष्म अवलोकन

व अचाट धारणाशक्ति दिसून येते. देवदेवता (४–५) देवस्थानव्यवस्था (४–७) कृमिकीटक ( १–१० ) यमलोक ( १–६ ते ८ ) इत्यादि वर्णनें याची साक्ष देतात. अक्षरांचे प्रकार, वनस्पतींचे प्रकार, भाज्या, पक्वान्नें, इत्यादिकांविषयीं इतकें विस्तारपूर्वक सांगण्याचा भगवद्भक्ति किंवा विरक्ति यांच्याशीं संबध दिसत नाहीं. परतु तो रामदासाच्या लेखनपद्धतीचा विशेष आहे. प्रत्येक वर्ण्यविषयाचें तत्कालीन समाजांतील विद्रूप स्वरूप दाखवावें, जें आहे तें किती कळाहीन आहे हें पटवावें आणि मग तें कसें सुंदर असूं शकतें हेंहि सांगोपांग सांगावें अशी त्यांची बोधपद्धति आहे. प्रत्येक गोष्टीचें स्वरूप किती भव्य असूं शकेल हें त्याच्या मनांत पक्कें ठसलेलें असतें. सगळें कांहीं ' जाड ' घवघवित असावें अशी उत्कंठा त्यांच्या लेखनांत दिसते. या दृष्टीनें मानवी जीवनाच्या लौकिक व्यवहाराचें त्यांच्या इतकें जिव्हाळ्यानें विवेचन दुसऱ्या कोणी केलें नसेल. त्यांच्या विवेचनांत केवळ सांगून मोकळें होण्याची वृत्ति नाहीं. निष्काम कर्मयोगापेक्षां निश्चित फलप्राप्तीवरच रोख आहे. जें कांहीं करावयाचें त्याचें विशिष्ट फळ मिळालेंच पाहिजे अशा निश्चयानें त्यांचें प्रवचन झालें आहे.

भक्ति, ज्ञान, वैराग्य सुंदर करून दावी.

अशी त्यांची सर्वव्यापक सौंदर्यदृष्टि आहे. संन्यासात, वैराग्यांत सुद्धा विरक्तीची शोभा आहे. ती मैंदाला, दुर्बळाला कशी लाभणार ? दुर्बळ बावळटांनीं परमार्थालाच उपहासास्पद केलेलें पाहून रामदासानीं परमार्थविचार थोडासा तहकूब करून प्रपंचविज्ञानावर भर दिला आणि त्यामुळें त्यांच्या ग्रंथांत भरपूर विविधता आली आहे. या विषयविविधतेंत शब्दनिष्ठ चमत्कृतीची भर पडली आहे. एकचरण पालुपदासारखा असणें हें ठिकठिकाणीं दिसतें. 'म्हणती आमुचें घर ' 'या नांव मुमुक्षु ' 'तो एक मूर्ख' ' व्यर्थ संसार जातसे' अशीं हीं पालुपदें समासभर आढळतात. साध्या शब्दांत सहज अर्थपूर्ण ओळीहि घडल्याचीं उदाहरणें जागोजाग दिसतात : उदा०

**प्रीतीचें लक्षण ऐसें । अंतरीं उठे अनायासें**
**पाणी पाणवाटे जैसे । आपणाचि धांवे**

याच्या उलट ‘ नसणें म्हणिजे रूपाचि नाही’ ‘अलक्ष म्हणिजे लक्षत नाही’ ‘निराकार म्हणिजे आकार नाहीं’ अशा पद्धतीच्या लेखनांत सुलभतेच्या अतिरेकानें मूळ विषय अव्यक्तच राहिला आहे. भाषेच्या बाबतींत रामदासाची बेफिकिरी कांहीं विलक्षणच आहे. शब्दांचीं वाटेल तशी रूपें करून कार्यभाग साधण्याचा त्यांचा धडाका कांहीं निराळाच आहे.

या धामधुमींतहि त्यांच्या ग्रंथातील वाङ्मयगुणाचें वैभव आणि सामर्थ्य प्रकट झालें आहे.

भक्ति अथवा विरक्ति हें ज्यांत मिळेल तोच खरा ग्रंथ असें म्हणणाऱ्या रामदासांच्या काव्यांतहि या दोन गोष्टींशीं अपरिहार्य संबंध नसणाऱ्या व्यावहारिक तत्त्वप्रतिपादनाचा भाग बराच मोठा आहे.

लेखकाच्या व्यक्तित्वामधील फटिंगपणा, स्पष्टोक्ति, दणगटपणा या गोष्टी भाषेमध्यें प्रतिबिंबित झालेल्या दिसतात.

“ रामदासांच्या दासबोधांतील सौंदर्य इतर कोणत्याहि प्रकारचें असण्यापेक्षां विचारांचें आहे आणि या विचारांच्या पाठीमागें प्रचीतीचें बळ आहे. ( त्यांच्या काव्याचें ) बाह्य स्वरूप निरलंकृत, अनेक वेळां ओबडधोबड, बहुधा लालित्यविरोधी, पण दणगट असें असतें. विचारांचा विलास त्यांत कमी असला, व्यंजना त्यांत नसली, तरी सरळ, सकस, समर्थ, सुदृढ आणि म्हणून सुरूप अशी विचारसंपदा त्यांच्या काव्यांत भरली आहे. जगाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण नाजुक, हळवा, किंवा स्वप्नाळु मुळींच नसून सकस वास्तववादी, युयुत्सु असा होता. वीरवृत्तीच्या भावनांस उपयोगी म्हणून संसाराचें उद्वेग उत्पन्न करणारें चित्र ते काढूं शकतात. तीव्र किंवा असह्य होऊं शकेल इतक्या मर्यादेपर्यंतचा ओजोगुण हेंच त्यांच्या काव्याचें वैशिष्ट्य आहे.

“ कवीपेक्षां प्रेपिताचीच भूमिका त्यांची होती. समाजोद्धार हें त्यांचें ध्येय आहे. तें ध्येय एवढ्या प्रमाणांत साध्य होत आहे कीं, त्यांच्या वाङ्मयांत रम्य कल्पना, सुंदर अलंकार, अथवा भावनांचे विविध खेळ

आहेत कीं नाहींत त्याचा विचारच सहृदय वाचकांच्या मनांत येत नाहीं. " ( प्रा. रा. श्री. जोग सु. म. ग्रं. ३१५-२३ )

"भावनेच्या उत्कटतेबरोबर भाषेची सृजनशक्ति जागी होणें ही ( भाषेच्या ) परमोत्कर्षाची खूण आहे. हा परमोत्कर्ष समर्थांनीं आपल्या भाषासामर्थ्यानें साधला आहे आणि त्यामुळें राष्ट्रीयत्वाचे अनेक सिद्धांत समर्पक व सामर्थ्यसंपन्न भाषेनें पटवितांना त्यांची शब्दश्री सच्छास्त्रिक झाली आहे; महाबोधांत कोवळीक दुणावली आहे; चातुर्य शहाणें झालें आहे; प्रेम रुचीस आलें आहे व सौभाग्य चोखलें आहे. समर्थांच्या कल्पनेला कोणतेंहि लहान पुरत नाहीं. वरचेवर त्यांना गगनाहून वाड, ब्रम्हांडरचनेहूनि जाड, उदंड अनंत, समुद्राऐसी आठवण होते.

**धबाबा लोटल्या धारा । धबाबा तोये आदळे**
**गर्जतो मेघ तो सिंधु । ध्वनि कल्लोळ ऊठिला**

असें त्यांच्याच शब्दांत त्यांच्या शब्दांचें वर्णन करतां येईल.

—प्रा. शं. के. कानेटकर सु. म. ग्रं. ३५३

**महाभारत ( पद्यसंख्या सु. १७००० )**

तिसऱ्या कालखडांत पंतांचें खास माध्यम, आर्यावृत्त सिद्ध झालेलें दिसतें. आणि महाभारत या कालखंडांत रसपूर्ण स्वरूपांत अवतीर्ण झालें. आर्यामुक्तामाला, आर्याकेकावलि, नामार्या, इत्यादि प्रकरणांच्या नांवांतहि या आवडत्या वृत्तांचा समावेश केलेला आहे. या आपल्या सिद्ध माध्यमाच्या योगानें पंतांच्या या कालांतील काव्यांत भक्तिरस अप्रतिहतपणें येऊं लागला. पंतांच्या महाभारताविषयीं भावे म्हणतात, 'मोरोपंतांनीं आपल्या वाक्कन्यकेला नानाविध अलंकारांनीं नटवून सजवून आपल्या रसिक वाचकाबरोबर तिचें सालंकृत कन्यादानच करून दिलेलें आहे." ( म. सा. २–२३२ ).

पंतांच्या सर्व ग्रंथांत मोठा असा हा **महाभारत** ग्रंथ होय. अठरा-पर्वांच्या आरंभीं श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति हा मंत्र साधला आहे. परंतु यापेक्षां मंत्रसिद्धीचा जास्त हव्यास बाळगलेला नाहीं. वयाच्या परिपक्व अवस्थेंत हा ग्रंथ लिहिला आहे. सर्व रसांच्या आविष्कारास मूळ ग्रंथांतच भरपूर वाव आहे. पंतांच्या कृष्णभक्तीस त्यामुळें काव्याचें भरतें येथें सहजच आलें शकुंतला आख्यानांत शृंगार रस, भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य यांच्या विषयींच्या प्रसंगांत वीररस, द्रौपदीवस्त्रहरण, अभिमन्युवध प्रसंगीं कारुण्य, युद्धाच्या विविध प्रसंगीं अद्भुत रस, कृष्णपक्षाच्या पक्ष-पातानें कौरवपक्षाचें वैगुण्य वर्णन करतांना विडंबनात्मक हास्य, असा सर्व रसांचा हा सागर आहे. अमृतरसाहूनि सरस रस मी तुम्हास पाजीन, असें आदिपर्वाच्या आरंभीं पंतांनीं आश्वासन दिलें तें पूर्ण केल्याची मान्यता रसिकानें कृतज्ञपणें द्यावी. पंतांनाहि अशा काव्यनिर्मितीबद्दल धन्यता वाटली. आपल्या मातापितरांचें धन्यत्व नमूद करून त्यांनीं आपला अभिमान व्यक्त केला आहे भारतरचनेच्या वेळींच पानपत प्रकरण घडलें. इतक्या मोठ्या घटनेचा पंतांच्या भारतांत कोठें उल्लेखहि नाहीं हें खरें आहे. यामुळें पंतांवर बरीच टीकाहि झाली. परंतु भारताचा स्वतंत्रपणें विचार केल्यास ते वीररसविन्मुख होतें असें म्हणता येणार नाहीं. उलट वीररसाचा उठाव मुळापेक्षांही कित्येक ठिकाणीं चांगला झाला आहे.

भीष्म, द्रोण, कर्ण, या पर्वामध्यें वीररसात्मक स्वभावचित्रें आणि प्रसंगाचित्रें भरपूर दिसून येतात.

“ पंतांच्या भारतांत भगवत्प्रेमाचा शुचिप्रवाह आंतून वाहत आहे. पांडवांची कथा वीररसप्रधान असूनहि भगवत्प्रेमामुळें तिला दिव्यत्व प्राप्त झालें आहे.” (मो. च. ३०७). पंत वीररसाच्या ओघांत आले कीं, आपलें देहभान विसरतात. वीररसाचीं वर्णनें कित्येक ठिकाणीं मुळापेक्षां अतिशय जोरदार आहेत. उदाहरणार्थ भीष्म, द्रोण व वन हीं पर्वें पहावींत. एकंदरींत सर्व भारताची उठावणी इतकी अप्रतिम झाली आहे कीं, अगदीं स्वतंत्र शोभा त्याला प्राप्त झाली आहे (मो. च. ३१६).

महाभारतांत कोणत्याहि आगंतुक साधनांचा उपयोग न करितां सहज वीररस मूर्तिमंत उभा केला आहे. त्या वीररसास पालट म्हणून पंतांनीं विनोद, शृंगार, बीभत्स, इत्यादि रसांची योजना केली. त्याचेंहि पांगारकर कौतुक करतात (मो. च. ३४५). परंतु त्यांनींच दिलेलीं उदाहरणें पाहिलीं कीं, हें रसांतर कांहीं वेळां रसहानिकारकच झालें आहे असें दिसून येतें. उदा. गजकुंभलीन क्षत्रिय कसे तर स्त्रीकुचलीन तरुणासारखे ! हा शृंगार रणांगणांत कितपत शोभतो हें सहज लक्ष्यात येतें. पांगारकरांनीं दिलेलें बीभत्साचें उदाहरण तर शब्दप्रयोगानेंहि हिणकस आहे.

**मंत्रभागवत :** संबंध भागवतावर मराठींत ग्रंथरचना करणारे मोरोपंत हेच बहुधा पहिले ग्रंथकार होत. मूळ भागवताच्या १३५२२ पद्यांचा मोरोपंतांनीं ३५०५ आर्यांत संक्षेप केला आहे. त्यांत ३३२ नाममंत्र साधले आहेत. पहिले नऊ स्कंध संक्षेपानें रचून दहाव्याचा विस्तार केला आहे. एकादशस्कंध वेदांतपर असूनहि मोरोपंतांनीं त्याचा संक्षेप न करतां रसाळ अनुवाद करणें हें एक अपवादात्मक उदाहरण आहे. परंतु त्या तात्त्विक भागांत भगवद्भक्ति आणि पूजाविधि हा सगुणोपासनेस सुसंगत असाच भाग विशेष तन्मयतेनें अनुवादिला आहे. इतर भागांत सिद्धि, विभूतिविस्तार, आश्रमधर्मविवेचन, इत्यादि मुळांतील भागांचा संक्षेप करून आपलें नेहमींचें धोरण पंतांनीं राखिलें आहे.

**मंत्रमय भागवत :** १०९ आर्यांचा दशमस्कंधाचा हा अनुवाद एक स्वतंत्रच प्रकरण असावें. त्यांत 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र साधला आहे.

**हरिवंश :** (५४ अध्याय ५४०० आर्या) या ग्रंथांत कृष्णचरित्राचा उत्तरार्ध व मुख्यतः द्वारकावासाचें विस्तृत वर्णन आहे. मंत्रभागवतांत संक्षेपानें सांगितलेल्या कथांचा यांत विस्तार केला आहे. काव्य बेताबाताचेंच आहे. विशेष फक्त एवढाच कीं, पंतकाव्यांत शृंगाराचीं जीं अगदीं अपवादात्मक स्थळें आहेत, तीं सारीं हरिवंशांत आहेत. अ. ३५-३६-३७ मध्यें प्रभावती-प्रद्युम्न विवाह आणि अ. ४१ मध्यें अनिरुद्ध-उषा विवाह या प्रसंगीं शृंगार अतिशय 'शुद्ध' स्वरूपांत योजिला आहे.

**मंत्ररामायण :** (पद्यसंख्या १९१३) पंतांच्या सर्व रामायणांत हेंच जरा सरस व मोठें आहे. यांत १४६ वेळा 'श्रीराम जयराम जयजय राम' हा मंत्र साधला आहे.

"पंतांच्या दरबारीं भक्तिरसाच्या खालोखाल किंबहुना बरोबरीनें वीररसास मान आहे. पंतांच्या पूर्वकालीन सर्व काव्यांत मंत्ररामायणाचा नंबर पहिला लागतो व त्यांतहि युद्धकांडाची योग्यता विशेष आहे. पंतांनीं पुढें १०८ रामायणें रचिलीं; पण प्रस्तुत रामायणांतल्या युद्धकांडाची बरोबरी त्यांपैकीं कोणत्याहि रामायणानें किंबहुना भारतानें सुद्धां केली नाहीं!"—मो. च. २४६

'गीर्वाण शब्द पुष्कळ जनपदभाषाचि देखतां थोडी' असें या काव्याच्या उपोद्घातांत स्वतःच नमूद केलें आहे. प्राकृतास न मानणाऱ्या शिष्टांची कानउघाडणी केली आहे. दूध कोणत्याहि पात्रांतून प्यालें तरी मधुरच लागतें असा दृष्टांत दिला आहे. परंतु हें पटवितांना प्राकृताची योग्यता प्रस्थापित करतांना, 'गोक्षीरकार्तस्वरमणिचषक' असा प्रचंड सामासिक शब्द योजून आपण प्राकृताची तरफदारी कशी करूं शकतो याचें पंतांना अवधान राहिलें नसावें. 'गीर्वाण शब्द पुष्कळ जनपदभाषाचि देखतां थोडी' ही तक्रार पंतांचे समकालीनहि करीत

होते हें यावरून दिसतें. संस्कृतप्राचुर्य, यमकादिकांसाठीं पत्करलेलें काठिण्य हें पंतांच्या किती अंगवळणीं पडलें होतें हेंहि येथें दिसून येतें.

## संकीर्ण रामायणें

आपल्या रचनाकौशल्याचें स्वतःच मनसोक्त दर्शन घ्यावें अशा इच्छेनें पंतांनीं शेवटीं शेवटीं संकीर्ण रामायणें रचिलेलीं दिसतात. आपल्या आराध्य दैवताविषयींची अनावर भक्ति असें म्हणून या विलक्षण कसरतीचें समर्थन करतां येणार नाहीं. कवीच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो; पण असें सामर्थ्य काव्यास भूषणभूत नसतें. चांगल्या मल्लाची कसरत पाहून होणारा आनंद, असें भावे यांनीं या रामायणवाचनाच्या आनंदाविषयीं म्हटलें आहे. हें सामर्थ्य भाषावृद्धीसहि उपयोगी पडत नाहीं. अशा कृतीचें वैयर्थ्य कवीच्याहि आरंभीं लक्ष्यांत आलें होतें. कारण साररामायण अपुरेंच ठेविलें आहे. परंतु आपल्या बौद्धिक सामर्थ्याचें एकदां विराटदर्शन घेण्याची ( आणि त्याचें प्रदर्शन करण्याची ) रुखरुख शेवटीं अशी व्यक्त झालीच ! या रामायणांत मंत्रबद्ध रामायणें ३१, चित्ररामायणें १०, विशिष्टनामक १५, वृत्तरामायणें १५, निरूपणात्मक ३ अशी वर्गवारी होते. चित्ररामायणवर्गास पांगारकरहि अधम काव्यच म्हणतात ( मो. च. ४४४ ). विद्वानांचे अभिप्राय नमूद करताना पांगारकरांची थोडी तारांबळच उडाली आहे ( मो. च. ४८७-८८ ). या रचनेंत हत्तीनें शुंडादंडावर पुष्पमाला खेळविण्याइतकी सहजता असली तरी वाचकास ती पेलत नाहीं. "पंतांनीं शब्दचित्रें रचण्यांत व यंत्रें बांधण्यांत आपल्या बुद्धीचा अपव्यय केला !" हें डॉ. विल्सन प्रभृतींचें मत चिपळूणकरांना किंवा पांगारकरांनाहि खोडून काढतां आलें नाहीं असेंच वाचकांस वाटेल.

कोणत्याहि चित्रविचित्र रचनेच्या खटाटोपापासून अलिप्त असें सर्वांत मोठें रामायण, रामायण पंचशती हें केवळ ५०५ पद्यांचें आहे. या खटाटोपांत अगदीं पंडित जरी झाला तरी त्याला किती वेळ धीर धरवणार ? आणि पंतांचें आराध्य दैवत श्रीरामचंद्र होतें आणि उपा-

सेनेच्या अनावर प्रेमानें हीं अशीं रामायणें या रामभक्तानें लिहिलीं हें जर अट्टाहासानें सांगावयाचें असेल तर हें 'रामायण-प्रकरण' फारच विचित्र वाटूं लागतें. प्रा. बनहट्टी म्हणतात, " त्यांची रामोपासना कुलपरंपरागत खास नव्हती. कारण त्यांचें कुलदैवत सोनारीचा भैरवदेव हें पांगारकरांच्या मोरोपंतचरित्रावरूनच कळून येतें ( मो. च १८ ). ही रामोपासना त्यास केव्हांपासून लागली ही गोष्ट अगदीं अनिश्चित आहे." ( म. का. वि. २१५ ). उपासनेची वैयक्तिक बाब सोडली तर कवि या दृष्टीनें पंत हे कृष्णोपासकच ठरतात.

श्लोककेकावली : ( १२३ श्लोक ) पंतांचें हें जवळ जवळ शेवटचें काव्य म्हणजे त्यांच्या वृत्तीचें व गुणांचें परिपक्व फळ होय यापूर्वी आर्यारूपानें त्यांनीं आर्याकेकावली रचलेली होती. परंतु वृत्ताच्या दृष्टीनें सुद्धां आपल्या अंतःकरणाची तळमळ व्यक्त करण्यासाठीं कांहीं निराळें वृत्त पाहिजे असें पाहून पंतांनीं उतारवयांत श्लोककेकावलीला आरंभ केला. शके १७१२ ते १७१६ म्हणजे निधनाच्या पूर्वी तीन-चार वर्षांच्या काळांत श्लोककेकावली लिहिली आहे. कवीच्या वृद्ध-पणाच्या स्पष्ट खुणा या केकावलींत आहेत. 'आपण ज्या पद्धतीनें उपासना केली ती कदाचित् अपुरी पडेल कीं काय? जीवनांत काळहि थोडा राहिलेला.' अशा मनस्थितींत हें काव्य रचलें आहे. आपलें पतितत्व मान्य करून भगवंताच्या पतितपावनत्वावर सगळा विश्वास ठेवून अद्यापहि आपला उद्धार होणें शक्य आहे अशी एक निर्वाणीच्या मनःस्थितींतील श्रद्धा या काव्यांत व्यक्त झाली आहे. केकावलीचें हें वैशिष्टय लक्षांत घेऊनच मोरोपंताच्या इतर कोणत्याहि काव्यापेक्षां या काव्याचें रसग्रहण अनेकांनीं अनेकवार केलें आहे.

गुणदोष : " मोरोपंतांची वृत्ति अगदीं लहानपणापासून ' हरिपाद-युगस्मरणप्रवण ' बनलेली होती....एकनाथाप्रमाणें ते जन्मतःच शुद्ध बुद्धीचे पुण्यसंस्कारवान् भाविक होते ( म. का. वि. २३३ ). प्रत्यक्ष व्यावहारिक जीवन सुरळीत असें गेलें. सामाजिक जीवनाविषयीं ते उदासीन होते. त्यामुळें आरंभापासूनच मोरोपंतांच्या काव्यांत समतोल

वृत्ति आढळून येते. कोणत्याहि प्रकारची तीव्रता, उत्कटता त्यांत आढळत नाहीं.

'समग्र महाभारत, समग्र भागवत मराठींत आणून रामायणाचा एकशेंआठ वेळां अनुवाद करणारा हा एकच एक कवि होय! त्यांनीं साठ हजार कविता लिहिली यांत त्यांच्या रचनावैपुल्याची विशेष तारीफ करावयाची नसून संस्कृतांतले एवढें जगड्व्याळ वाङ्मय ते इतक्या थोडक्यांत मराठींत आणूं शकले या गोष्टींत दिसून येणाऱ्या संक्षेपचातुरीची, उत्कर्षाचीच अवश्य प्रशंसा केली पाहिजे." (म. का. वि. ३५).

संक्षेपांत आणि विस्तारांत पंतांचें एक विशिष्ट धोरण होतें. कथेवर त्यांनीं भर दिला आणि तात्त्विक विवेचन, वर्णनें, मुख्य कथानकास विसंगत असा भाग कटाक्षानें गाळून स्वयंपूर्ण असे अनुवाद ग्रंथ रचिले. याचीं उदाहरणें भारत, भागवत, रामायण यांत सर्वत्र सांपडतात. उदाहरणार्थ भारतांत—

उद्योगपर्व, अध्याय ९७–१०५ या ९ अध्यायांतील गरूडगर्वपरिहार कथा २८ आर्यांत आणिली. त्याच पर्वांतील १७ व्या अध्यायांतील गालवांचा इतिहास २५ गीतींत आणिला. कणिकनीति, विदुरनीति, भगवद्गीता, इत्यादि प्रसंग टाळले आहेत. अशा रीतीनें मूळ एक लक्ष श्लोकांचें भारत १७ हजार ओव्यांत आणिलें आहे.

मंत्रभागवतांत पहिल्या स्कंधांतले चार अध्याय एका आर्येत आणिले. तिसऱ्या स्कंधांतील कपिल मुनीनें आईस केलेला बोध मुळांत २५–३२ अध्याय आहे. पंतांनीं त्याचा ३ आर्यांत संक्षेप केला. पांचव्या स्कंधांतील मूळच्या ३६ अध्यायांवर फक्त ६६ आर्या आहेत. ऋषभ व जडभरत यांच्या कथा फक्त घेतल्या. पांचव्या स्कंधाच्या शेवटच्या १२ अध्यायांतील भूगोलवर्णन, लोकालोकवर्णन, पाताललोक, नरकलोक, इत्यादि विस्तृत वर्णनें सर्व गाळलीं आहेत. भागवताच्या सातव्या स्कंधाच्या शेवटचें वर्णाश्रमधर्माच्या वर्णनाचे पांच अध्याय पूर्णपणें गाळले आहेत. पहिल्या नऊ स्कंधांतली कोणतीहि कथा गाळली नाहीं. पुढें ध्रुव, जडभरत,

प्रल्हाद, गजेंद्रमोक्ष, अंबरीष, दुष्यंत, इत्यादि मुळांतील कथा हीं पंतांच्या कथनकौशल्याचीं विलासस्थानेंच ठरलीं आहेत. रासक्रीडेचे मुळांतले पांच अध्याय ( २९ ते ३३ ) पंतांनीं ३० आर्यांतच आटोपले. पूर्वी ज्या कथा विस्तारानें सांगितल्या असतील त्यांचा नंतरच्या ग्रंथांत पंतांनीं अगदीं ओझरतां उल्लेख केला आहे. आपल्याच काव्यांत मनसोक्त द्विरुक्ति करण्याचा प्रकार पंतांनीं केला नाहीं हें विशेष होय.

मोरोपंतांच्या टीकाकारांनीं त्यांच्या काव्यांतील दोषांचा बराच उहापोह केला आहे. दीर्घसमास, दूरान्वय, संस्कृतांतील आणि त्यांतहि अप्रचलित अशा शब्दांचा उपयोग, मराठींतील अरूढ शब्दांचा आणि वाक्यरचनेचा उपयोग, श्रुतिकटुता, औचित्यहानि, आणि ग्राम्यता सुद्धां, अशी दोषांची मोठी यादी करतां येते. त्यांच्या प्रचंड काव्यांत या दोषांचीं उदाहरणें पुष्कळच असल्याचें दाखवितां येतें. परंतु हे दोष मान्य करून आणि स्वतः त्यांचें अनेक उदाहरणांनी स्पष्टीकरण करूनहि प्रा. बनहट्टी जो अभिप्राय नमूद करतात तो अत्यंत महत्त्वाचा आहे.

पंतकाव्यांतील व्यंगें हीं पंताच्या असमर्थतेमुळें त्यांच्या काव्यांत राहून गेलीं आहेत असें नसून यमकरचनेच्या व संस्कृतीकरणाच्या हव्यासामुळें तीं त्यांच्या कवितेंत आली आहेत. त्याच्या कविताकन्यकेस यमकादि शब्दालंकार जाचूं लागले व संस्कृताचें जडान्न तर फारच बाधून तिला अजीर्ण झालें. तथापि हा ( जाच व हव्यास ) पंतकाव्याचा थोड्याशाच अंशाला भोवला हें पुनः पुनः लक्ष्यांत ठेवणे जरूर आहे. "निरनिराळ्या दोषांनीं व्याप्त असलेली अशी कविता अगदीं डगळ हातानें मोजली तरी दहा पंधरा हजारांपेक्षां जास्त भरेल असें खास वाटत नाहीं. म्हणजे पंतांच्या साठ हजार कवितेपैकीं चाळीस पंचेचाळीस हजार कविता उच्च दर्जाची व साधारणपणें निर्दोष अशी सहज शिल्लक राहील हें निर्विवाद होय ( म. का. वि. ३११–३१२ ).

"पंत हे स्वतः भक्तीचा मार्ग चोखाळणारे साधक होते. परमेश्वरानें अगदीं अंतर्भागींच्या गाभाऱ्याचें दार उघडून आपल्याला कैवल्यपदीं स्थान द्यावें म्हणून बाहेरून धडपड करणारे आतुर होते. अर्थात् त्यांनीं

उगीच भलताच आव न आणतां आपल्या अधिकारास अनुसरून आपलें स्वतःचें कल्याण व्हावें म्हणूनच वारंवार परमेश्वराचें यशोगान केलें आहे. सर्व संत आपल्या ग्रंथांच्या योगानें भक्तिमार्गाचें व परमार्थाचें परार्थ-प्रतिपादन करीत असत, तर पंत हे आपल्या ग्रंथांमध्यें केलेल्या भगवद्-गुणगानाच्या योगानें तो परमार्थाचा मार्ग स्वतः आक्रमीत असत... आपला ग्रंथ म्हणजे एक सुश्लिष्ट व सुंदर काव्य तयार व्हावें या उद्देशा-लाहि त्यांनीं तितकेंच महत्त्व दिलें आहे. " ( म. का. वि. ४२ ).

**हरि ज्यांचा कैवारी**
**त्या पांडुसुतांसि वंदितो भावें ।**
**वाटे चरित्र त्यांचें**
**कांहीं आपण तरावया गावें.**
**सुयश न जयांत हरिचें**
**अपटुगुणभवनकवन तें अशुचि**

असें पंतांच्याच शब्दांत त्यांच्या काव्याची भूमिका व उद्दिष्ट हेतु सांगतां येतील

" पुराणप्रिय लोकांना पंतांची पौराणिक घाटणी पसंत पडेल. भगवद्भक्त साधुवृत्तीचे लोक त्यांनीं केलेल्या भगवद्यशोगानांत रंगून जातील व काव्यालंकारविचक्षण रसिक त्यांच्या कवितेच्या बाह्यभूषेनें मोहून जातील...तिन्ही प्रकार काव्यांत आणल्यामुळें त्यांपैकीं कोणचाहि एक परमोत्कर्ष त्यांच्या कवितेंत दृष्टीस पडत नाहीं (म. का. वि. ९५).

### पंतकालीन कविमंडळ

नारायण नांवाच्या कवीनें मोरोपंतांचें शब्दशः अनुकरण केलें. परंतु भागवताच्या आठव्या स्कंधांतील शिवमोहिनी आख्यानावरील आर्यांत त्यानें पंतांच्या भागवतापेक्षांहि रसाळ रचना केली आहे. कारण त्यानें पंतांच्या चित्ररचनाचमत्काराचें अनुकरण करण्याचा मोह बाळगला नाहीं. पंतांच्या चित्ररचनेची कांहीं कवींवर जबरदस्त मोहिनी पडली. त्यांत चतु-

मंत्ररामायण लिहिणाऱ्या एका कवीनें पंतांवरहि ताण केली आहे ! चरणाच्या आरंभीं व शेवटींहि मंत्रसाधना करणें ही त्याची कर्तबगारी होय.

महाभारतावर रचना करणारांत गोपाळ, शुभानंद, माधव, आणि जिवा शिवा यांनीं समग्र महाभारत रचिलें असावें. या महाभारतकारांवर मुक्तेश्वराची दाट छाया दिसते. शुभानंद या गोकर्ण प्रांतांतील कवीचें भारत एक लक्षाजवळ जवळ असावें ( शके १६८८ ). नेवासें येथील गोपाळ कवीचें महाभारत पाऊण लाखाच्या आंत बाहेर असावें ( शके १६९० ). ज्यांचीं दोन चार पर्वें उपलब्ध आहेत असे अनेक ' भारत ' कवी पंतांच्या नंतर झाले. त्यांत अनंततनयाचें उद्योगपर्व, मुक्तेश्वराचें कार्य पूर्ण करण्याच्या हेतूनें लिहिलेलें आहे. त्याचें उद्योगपर्व ६ हजार आहे. शिवनाथाची भीष्म व द्रोण हीं वीररससंपन्न पर्वे आहेत ( श. १६८८ ). भागवतकारांत जोतिपंत दादा महाभागवत ( मृ श. १७१० ) हे एक बडे गृहस्थ आहेत. त्यांनीं राजदरबारीं बऱ्याच उलाढाली केल्या. पानिपतावरहि ते हजर होते आणि नंतर भगवद्भजनाचा मार्ग धरला. सबंध भागवतावर ओवी व अभंग अशा दोन प्रकारची टीका यांनीं लिहिली. त्यावरून ते ' महाभागवत ' झाले.

सतराव्या शतकाच्या शेवटीं अध्यात्मपर रचना करणारे कवि झाले. त्यांत सोहिरोबानाथ अंबिये, हे विशेष प्रसिद्ध आहेत. सोहिरोबानाथ अंबिये ( श. १६३६–१७१४ ) यांचीं पदें, अभंग, यांखेरीज सिद्धांतसंहिता, महदनुभवेश्वरी ( ओ. ७००० ) हे मोटाले ग्रंथ आहेत. ज्ञानवैराग्य, नीति, योगाभ्यास यांनीं सोहिरोबानाथाचें काव्य भरलेलें आहे. त्यांत कथानक वा चरित्र यांचा माध्यम म्हणूनहि उपयोग केलेला नाहीं.

मोरोपंतांच्या हयातींतच मराठ्यांची खरीं गाणीं ( भावे ) मराठ्यांच्या अंतःकरणाचे सहजोद्गार ( श्री. म. वर्दे ) ऐकूं येऊं लागले. मराठी काव्याचा उषःकाल ( वर्दे ) किंवा ' मराठी काव्याची प्रभात ' झाली. शाहिरी वाङ्मयाचा उदय झाला, किंबहुना पुनरुज्जीवन झालें असें म्हणणें जास्त बरोबर ठरेल.

प्रसिद्ध शाहिरांत सर्वांत वडील असा अनंतफंदी जन्मला ( श. १६६६ ) त्या वेळीं मोरोपंत १५ वर्षांचे होते. त्यांनीं काव्यरचनेस आरंभहि केला नव्हता. ते महाभारत रचीत होते त्या वेळीं त्यांनीं कविप्रवर म्हणून ज्याचा गौरव केला तो रामजोशी जन्मास आला. मराठी वाङ्मयांत शाहीरकालास आरंभ मोरोपंतांच्या हयातींतच झाला.

शाहीरकालांत प्रवेश करण्यापूर्वी मध्यंतरीच्या महानुभाव वाङ्मयाचें धांवतें समालोचन करणें उपयुक्त ठरेल.

## महानुभावांचें वाङ्मय : १५ वें, १६ वें व १७ वें शतक

१५ व्या शतकांत महानुभावांनीं गीतेवर लिहिलेल्या ग्रंथांत **भक्तिप्रबोध** ( श्रीगोविंदराज गुरुवल्लाळ ) व भिंगारकरबुवांच्या गीतार्थबोधिनी या संस्कृत ग्रंथावर **भास्करी टीका** ( गोपीभास्कर ) हे मुख्य ग्रंथ होत. 'साती' ग्रंथांतील शब्दांचा ग्रंथांतील शब्दानुक्रमानें रचिलेल्या **'टीप'** कोश ग्रंथाचा महत्त्वाचा उपक्रम दत्तराज मराठे यानें केला. **रुक्मिणीस्वयंवरावर** संतोषमुनि कृष्णदास यानें २८ अध्यायांचा ओवीबद्ध रसाळ ग्रंथ लिहिला. ' मराठी ही सर्व भाषांची जननी' असा अभिमान त्यानें व्यक्त केला आहे.

**महानुभावांचा पंजाबांत प्रवेश** ही या शतकांतील महत्त्वाची घटना होय. सारंगकोटच्या कृष्णराज नांवाच्या व्यापाऱ्यास वऱ्हाडांत माघेराजबुवा यांच्या भेटीनें महानुभाव उपदेश लाभला. त्यानें पंजाबांत पंथाचा प्रसार केला. या कृष्णराज उर्फ कृष्णमुनि पंजाबी यानें गुल्हरस्तोत्र, दर्शनप्रकाश, श्रीकृष्ण व दत्तस्तोत्रें, षड्दर्शनसार, इत्यादि ग्रंथ रचिले. पंजाबांत झालेल्या महानुभावांच्या मराठी ग्रंथाच्या पोथ्या काश्मीर, काबूल, येथील मठांत आहे.

सोळाव्या शतकांतील महानुभावांच्या वाङ्मयास 'वर्तमान' विभाग म्हणतात. पंथविषयक तात्त्विक ग्रंथांत सूत्रपाठांचें संस्कृतांत भाषांतर करणें ही एक विशेष गोष्ट या शतकांत झाली. चक्रपाणी व्यास यानें सूत्रपाठ व दृष्टांतस्थळ यांची संस्कृतांत भाषांतरें केलीं! तरी मराठी ग्रंथरचना

चालूच होती. सिद्धांतराजभद्र ( गोपीभास्कर ), गीतेवर गद्यटीका ( गोपालदास दर्यापूरकर ) असे तात्त्विक ग्रंथ या शब्दांत झाले.

**स्मृतिस्थळ** : ( इ. स. १६०१ ) " चिनीच्या महानुभाव ग्रंथकारांची माहिती देणारा प्राचीनतम ग्रंथ " (वा. ना. देशपांडे) असा हा स्मृतिकोश या शतकांत झाला. तो एका ग्रंथकाराचा नसावा असें वा. ना. देशपांडे यांचें मत आहे. महानुभावांचे प्रसिद्ध संत-महत यांच्या चरित्राबरोबर राजकीय व सामाजिक जीवनाविषयीं उद्बोधक माहिती या ग्रंथांवरून मिळते.

या ' चरित्रकोशा ' खेरीज **फलटणमहात्म्य** व **ऋद्धिपुरमहात्म्य** ( कवि कृष्ण डिंभ ) या ग्रंथांतहि अनुक्रमें चक्रपाणि व गोविंदप्रभु यांचीं चरित्रें आहेत.

कृष्णचरित्रावर **कृष्णबाळक्रीडा** हा २४ अध्यायांचा ३२०८ ओव्यांचा ग्रंथ एल्हण यानें लिहिला. याशिवाय शृंगाररसाचा मनमुराद आविष्कार करणारा **अष्टविवाहवर्णन** हा ग्रंथ त्यानें रचिला. **रासक्रीडास्तोत्र** ( पं. शाङ्र्गधर पुसदेकर ) लक्ष्मीधर, विधिचंद्र शर्मा, चक्रपाणि मुनि यांनीहि रुक्मिणीस्वयवराची कथा गायिली.

गीतेवर **कैवल्यदीपिका**, **गीताप्रश्नावलि** ( पं. शाङ्र्गधर पुसदेकर ) दोहा, चौपाई, इत्यादि रचनावैशिष्ट्याची **संजीवनी** ( विधिचंद्र शर्मा ) इत्यादि ग्रंथ या शतकांत झाले. गीतेंतील प्रत्येक शब्दाचा अर्थ देणें, गीता अध्यायांची आचारस्थळ, विचारस्थळ, कर्मकांड अशी 'पंथीय' विभागणी करणें हे कैवल्यदीपिकेचे विशेष होत. **चूडामणिकाव्य** हा याच लेखकाचा ग्रंथ साध्या शब्दाचा, प्रत्येक अक्षराचा ( उदा० तूप–तुप हिंसायां तोपयति, हिंसयति प्राणिनः सः तुपः । यावरून तूप म्हणजे काल ! ) वेदांतपर अर्थ काढण्याच्या अट्टाहासाचें एक उदाहरण होय ! आपल्या पंथाप्रमाणें इतरहि पंथांची माहिती महानुभाव ग्रंथकार देत. **दर्शनप्रकाश** ( मुरारिमल्ल ) या ग्रंथांत अद्वैत, जैन, लिंगायत, नाथपंथ यांचें खंडण करून नवविधा भक्तीचें श्रेष्ठत्व पटविलें आहे. **लीलानिधि** ( ओंकार ऊर्फ बाकु ) या ग्रंथांत परमेश्वराच्या लीलांचें वर्णन आहे.

**चोवीस गुरु आख्यान** ( बिधिचंद्र शर्मा ) हा गुरुचरित्रासारखा ग्रंथ आहे. **ज्ञानदर्पण** ( लक्ष्मीधर ) या ग्रंथांत कवीनें आपल्या मुलास उपदेश करतांना बालपणापासून तों शृंगाररस, नरक, भक्तिभेद, ज्ञान, वैराग्य, मुक्ति, इत्यादि विषय चर्चिले आहेत.

विविध वृत्तांत रचना करण्यांत बिधिचंद्र शर्मा, चक्रपाणि मुनि, यांचे ग्रंथ उल्लेखनीय आहेत. **ब्रम्हविद्याप्रकाश** ( बिधिचंद्र शर्मा ) **भरवस-मालिका, प्रसादमालिका** (चक्रपाणि मुनि) **ध्यानामृत स्तोत्र** ( विश्वनाथ व्यास ) **महाराष्ट्रकाव्यदीपिका** ( लक्ष्मीधर ), इत्यादि ग्रंथांत अनेक रचनावैशिष्टयें प्रकट झालीं आहेत.

सतराव्या शतकांत **गीताटीका** ( राजे मुनि तळेगांवकर ) **सिद्धांत-बोध** ( मूळचा मुसलमान, शहामुनि ) **कैवल्यसंजीवनी टीका** ( गोविंद मुनि जामोदकर ) जशा तात्विक ग्रंथांपेक्षां आख्यानपर रचनेवर विशेष भर दिसतो. **श्रीकृष्णबाळक्रीडा** ( राजेंद्रमुनि ) **गोपिकास्वयंवर** ( शिवराम किंकर) **वत्सलास्वयंवर** (राघवमुनि) **द्रौपदीस्वयंवर** (अवचितसुत काशी) **रुक्मिणीस्वयंवर, श्रीकृष्णजन्माष्टमी, सुदामचरित्र** ( कृष्णमुनी पंजाबी ), इत्यादि ग्रंथ या शतकांतील लेखकांचा कल दाखवितात. वृत्तवैचित्र्यहि पुष्कळच वाढलें. कृष्णमुनी पंजाबी हा ख्याली बहाद्दर या नांवानें प्रसिद्ध असून त्यास ११ भाषा येत होत्या. त्यानें बरीचशी छंदोबद्ध रचना केली आहे.

बायाबापड्यांसाठीं, भोळ्या भाबड्यांसाठीं लेखन करण्याची चक्रधराची आज्ञा हळूहळू विसरत जाऊन महानुभाव लेखकहि पांडित्य व कला यांच्याविषयीं विशेष आस्था बाळगूं लागले असें या कालांतील वाङ्मयावरून दिसून येतें ! मराठी ग्रंथांचीं संस्कृत रूपांतरें आणि स्वयंवर कथांविषयीं विशेष आवड हीं या दृष्टीनें उद्बोधक आहेत.

---

## २० शाहिरी वाङ्मय

( इ. स. १७४४ ते १८४४ )

पंडित कवींच्या काळाच्या शेवटीं मराठी वाङ्मयांत एका अगदीं नवीन काव्याचा एकदम उदय झालेला दिसतो. तें काव्य किंवा वाङ्मय पोवाडे आणि लावण्या हें होय.

### पोवाडाः

आजचा सर्वांत जुना उपलब्ध पोवाडा इ. स. १६५९ च्या सुमारास आगीनदास ह्यानें रचलेला अफझुलखानाच्या वधाचा होय. ' शिवाजीनें अफझुलखानास मारिलें आणि आपल्या राज्याचा पाया पक्का केला. तेथून शाहिरी पोवाड्यांचा इतिहास आपणास मिळतो ' (मराठी शाहीर पृ. १३ )त्यानंतर शाहूच्या काळापर्यंत मध्यंतरीं उल्लेख आढळत नाहीं. शिवशाहीच्या आरंभापासून तों आंग्लशाहीच्या आरंभापर्यंत ही परंपरा अखंड राहिली असेल. परंतु ह्या परंपरेच्या मधल्या काळांतील पोवाडे उपलब्ध नाहींत. शाहिरी वाङ्मयांत अनंतफंदी ( इ. स. १७४४–१८१९ ) परशुराम ( १७५४–१८४४ ) रामजोशी ( १७६२–१८१२ ) प्रभाकर (१७६९–१८४३) सगनभाऊ ( १७७८–१८४० ) होनाजीबाळा ( सगनभाऊचा समकालीन ) यांचा प्रामुख्यानें समावेश होतो. श्री. य. न. केळकर यांच्या संशोधनाप्रमाणें शिवकालीन चार पोवाडे आढळतात. संभाजी किंवा राजाराम यांच्या कारकीर्दीतला एकहि पोवाडा उपलब्ध नाहीं. नंतर शाहूच्या काळांतील पोवाडे उपलब्ध आहेत. बाजीरावाच्या काळांतले तीन पोवाडे आहेत. पेशवाईच्या काल-खंडांत मात्र बरेच पोवाडे आढळतात. एकंदर उपलब्ध पोवाड्यांपैकीं निम्मे ह्याच काळांतील आहेत.

सरवटे ह्यांच्या मताप्रमाणें " पोवाड्याच्या कवनाची उत्पत्ति धर्ममूलक आहे. महाराष्ट्रांत मराठ्यांमध्यें सणावारी आणि कुलधर्माच्या वेळीं ' गोंधळ ' घालण्याचा प्रकार पूर्वीपासून आढळून येतो. नामदेवाच्या

पूर्वींहि गोंधळ आढळून येतात. नामदेवाचा ' गोंधळ ' म्हणून एक अभंग प्रसिद्ध आहे. ' गोंधळ ' घालणाऱ्या लोकांचीहि एक जात बनत गेली. ह्या गोंधळामधूनच पोवाडे हा प्रकार विकसित झालेला असावा. कारण गोंधळामध्यें आधीं देवतेचें नमन, नंतर कांही कथाभाग, व त्यांत पोवाडे म्हणून मोठ्यांचीं चरित्रें सांगत. अगदीं आरंभीं हे पोवाडे कोणावर रचले हें सांगण्यास हल्लीं साधन नाहीं. पण ते तत्कालीन प्रसिद्ध साधुसंतांवर असावेत असें अनुमान करण्यास हरकत नाहीं " — म. सा. स. १९

पोवाड्यामध्यें गोंधळांतील नमनाचा भाग थोडाबहुत कायम राहिला. पौराणिक कथाभाग कमी होत चालला आणि विद्यमान व्यक्तींच्या विविध वर्णनास महत्त्व प्राप्त होत गेलें. मराठेशाहींत या वाङ्मयप्रकारास उत्तेजन मिळण्याचें कारण तत्कालीन परिस्थिति असावी. आपल्या पदरीं भाट ठेवण्याची पद्धत फार जुनी आहे. ह्या भाटांचें मुख्य कार्य म्हणजे आपल्या आश्रयदात्यांच्या पराक्रमाचें वर्णन तेथल्या तेथें करून संस्मरणीय प्रसंगाचा पुनः प्रत्यय देणें हें असे. शाहिरांनीं जवळ जवळ तेंच कार्य केलें.

पोवाडे हे शाहिरांनी वीरश्रीसंपन्न प्रसंगामुळें ' स्फूर्ति ' होऊन रचले आहेत असें एक रूढ मत आहे. उपलब्ध पोवाडे, त्यांचा रचनाकाल व प्रसंग हीं लक्ष्यांत धेतां हें मत दुबळें ठरतें. शिवकाल लक्ष्यांत घेतला तरी त्यांतील कित्येक स्फूर्तिदायक प्रसंग डोळ्यासमोर घडत असतां त्यावर पोवाडे झाले नाहींत. याचें कारण शाहिराच्या ' हातांत सोन्याचा तोडा ' घालणारे राजकारणी पुरुष फारसे नव्हते. ( प्रा. धोंड. नवभारत, मार्च १९४९ ) आगीनदासाचा पोवाडासुद्धां स्वयंस्फूर्त नाहीं. बाईनें ( जिजाबाईनें ) शाहीर बोलाविले । सर्दार सदरेला मिळाला आणि शिवाजी राज्यानें इनाम तोडा बक्षीस दिला । शेरभर सोन्याचा तोडा हातांत घातला ! असें शाहीरच सांगतो. आगनिदासाचा कदाचित् कोणी संबंधी असा तुळसीदास याचा पंचावन चौकांचा पोवाडा अगीनदासापेक्षां जास्त काव्यमय आहे (म. सा. २-२८०). त्याच्या शेवटीं तुळशीदास म्हणतो,

" हा शूर मर्दाचा पोवाडा, शूर मर्दानें ऐकावा ! " शाहिरास मनसोक्त इनाम देणारे दानशूर 'मर्द' हे या पोवाड्यांच्या स्फूर्तीचें प्रभावी कारण दिसतें. या कारणामुळें पोवाड्यांतील कवित्वास बाध येत नाहीं. परंतु त्यांचा वीररससंपन्न प्रसंगाशीं इतका जिव्हाळ्याचा संबंध नाहीं. श्री. य. न. केळकर यांच्या मतें एकूण सुमारें ३०० पोवाडे उपलब्ध आहेत. त्यांत शिवकालीन ७, पेशवेकालीन १५० व बाकीचे इंग्रजी अमदानींतले आहेत. हा हिशेब वरील दृष्टीनें उद्बोधक आहे. १७६० पासून लावणीच्या काळास सुरवात झाली.

" खरें कारण हेंच कीं, शाहिरानीं कविता केली ती देशभक्तीनें नव्हे कीं समाजप्रीतीनें नव्हे तर 'अर्थकृते' यामुळें शाहीर संत किंवा पंडित यांच्याप्रमाणें राजकारण व समाजजीवन याविषयीं उदासीन राहिले नाहींत. ( प्रा. धोंड नवभारत मार्च १९४९ ).

श्रोत्यांच्या, आश्रयदात्याच्या पूर्वजांच्या स्तुतीपेक्षां त्यांची स्वतःचीच स्तुति आणि तीहि तोंडावर लेथल्या तेथें जाहीरपणें चारचौघांसमोर करणें हें जास्त 'अर्थप्रद' होतें. ऐकणारे स्तुतीची गोडी असण्याइतके सामान्य होते आणि स्तुति करणें हेंच शाहिराचें, उपजीविकेचें साधन होतें. असे धनिक श्रोते शोधीत शोधीतच प्रभाकर मुंबईच्या विकाजी आणि पेस्तमजी शेटपर्यंत गेला !

उत्तर पेशवाईत पराक्रमापेक्षां पूर्वीच्या पराक्रमाच्या वैभवाच्या उपभोगाचेंच मुख्य कार्य होतें. दात्याच्या धनावर व दातृत्वावर लक्ष ठेवून शाहीर कवन करीत. आपण कर्जांत बुडालों आहोत, द्रव्यकृपा झाली तरच त्यांतून बाहेर पडतां येईल असें प्रभाकर ज्या वेळीं स्पष्टपणें सांगतो, ऐकवतो, त्या वेळीं त्याच्या मनांतली खरी चिंता सहज प्रकट होते. त्याच्या काव्याचा रोख श्रोत्यांच्या हृदयापेक्षां 'खिशावर' असणें स्वाभाविक आहे.

उपलब्ध पोवाड्यांच्या विषयाचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं, अफझुलखानाचा वध या प्रसंगापासून तो इंग्रजी अंमल या विषयापर्यंत पोवाडे आहेत. अफझुलखान वध ( आगीनदास ) सिंहगडप्रसंग ( तुळशीदास ) नानासाहेब पेशवे कारकीर्द ( रामजोशी ) पानिपत

( रामा सटवा, सगनभाऊ ) नारायणरावचा वध ( लहरी मुकुंद ) सवाई माधवराव ( प्रभाकर, होनाजी, अनंतफंदी ) खर्ड्याची लढाई ( अनंत-फंदी ) दुसरा बाजीराव ( होनाजी, प्रभाकर, सगनभाऊ ) खडकीची लढाई ( अनंतफंदी ) यशवंतराव होळकर ( रामजोशी, अनंतफंदी ) फत्तेसिंग गायकवाड ( अनंतफंदी ) दुसरा सयाजीराव ( प्रभाकर ) अहि-ल्याबाई ( प्रभाकर ) नाना फडणीस ( अनंतफंदी ) राघोजी आंग्रे ( प्रभाकर ) इंग्रजी राज्य ( परशुराम ) इत्यादि विषयांवर शाहिरांनीं पोवाडे रचले आहेत. या विषयावरूनहि असें स्पष्ट दिसतें कीं, केवळ विषया-मुळें शाहिरांना स्फूर्ति होण्याचे प्रसंग फार थोडे. आश्रयदाता किंवा प्रासंगिक दाता असेल त्याप्रमाणें त्याचे आवडते विषय हेच पोवाड्याचे विषय होत. सगनभाऊचा पानिपतचा पोवाडा खेरीज करून कोणत्याहि शाहिरानें स्वतःच्या आठवणी बाहेरच्या ऐतिहासिक प्रसंगावर पोवाडा ( किंवा लावणी ) रचल्याचें आढळत नाहीं ( म. शा. २३५ ). खर्ड्याच्या लढाईवर सर्वांत जास्त पोवाडे आहेत ( म. शा. १५ ). पेशवे व त्यांचे सरदार यांचें गुणवर्णन करणारे दीडशें पोवाडे उपलब्ध आहेत ( म. शा. १३ ). आणि एकंदर उपलब्ध पोवाडे सुमारें ३०० आहेत. ' आज जें शाहिरी काव्य उपलब्ध आहे तें बहुतेक पानपतानंत-रचें आहे ' ( म. शा. १५ ).

### लावणी—

धनिकास त्याच्या पराक्रमाची कथा ऐकवून इनाम मिळवितांना रचना कौशल्यास फारसें महत्व नसे. तेथें मुख्य विषयाच्या महात्म्यामुळें रच-नेंत लावणीपेक्षां कमी सफाईदार असा पोवाडा खपून जाई. परंतु बहु-जनसमाजाकडून बक्षिसी मिळवितांना त्यांच्या रसिकतेस आळाविणें जरूर होतें. ते डोलले तरच खुषीनें कांहीं टाकणार. त्यामुळें पोवाड्यांतून लाव-णीची 'रचनेची' सफाई आवश्यक झाली म्हणून पेशवाईतील पोवाडे जास्त सफाईदार होऊ लागले. पोवाड्याची लावणी झाली.

" लावणी वाङ्मयास आधार कांहीं परंपरा होती असें मानण्यास आधार नाहीं. हा काव्यप्रकार पेशवाईत विशेषतः उत्तर पेशवाईत एका-

एकीं उदयास आला. जनसमूहासमोर म्हणण्याकरितां त्यांना रुचेल अशा व विशेषेंकरून त्यांच्या जीवनांतील विषयावर त्यांच्याच भावना व्यक्त करणारी आठ मात्रांच्या तालावरील पदरचना म्हणजे लावणी.

" शोभिवंत किंवा शुभगरचना हाच लावणीवाङ्मयाचा विशेष होय. शाहिरांना आपल्या रचनेबद्दलच विशेष कौतुक वाटत असे. शाहीर आपल्या काव्यास कवन, छंद, कविता हेच शब्द योजितात आणि आपल्या काव्याच्या घडणीची, जडणीची, अभिमानानें ग्वाही देतात. रचना या अर्थी लावणी शब्द रूढ झाला.

" लावणींत पुढें पुढें रागदारीचें स्तोम वाढत गेलें, आणि तमाशाच्या फडांतून ती कलावंतिणीच्या बैठकींत शिरली. लावणीचें शृंगारिक गाणें झालें." ( प्रा. धोंड, नवभारत, मार्च १९४९. )

ज्यांच्या लावण्या उपलब्ध आहेत त्याच शाहिरांनीं पोवाडेहि रचले आहेत. पोवाडे प्रामुख्यानें ऐतिहासिक प्रसंगावर वा व्यक्तींवर रचलेले आहेत आणि लावण्या तत्कालीन जीवनांतील विशेषतः शृंगाररसप्रधान प्रसंगावर, तरुण स्त्रीपुरुषसंबंधावर रचलेल्या आहेत. परंतु याबरोबर पौराणिक कथांच्या आधारें आणि स्वतंत्रपणें उपदेशपर अशाहि लावण्या आहेत. ऐतिहासिक प्रसंगहि लावण्याचे विषय झालेले आढळतात. आणि लौकिक विषयावर पोवाडेहि आहेत. यावरून पोवाडे व लावणी हा भेद प्रामुख्यानें रचनेवर उभारलेला आहे हें दिसून येतें. माधवसुताची सवाई माधवरावावर लावणी आहे ( म. सा. २–२८५ ). रामजोशीचा दुष्काळावर लावणीवजा पोवाडा आहे. अनंतफंदीनें पेंढाऱ्यांच्या धुमाकुळाचें वर्णन लावणींत केलें आहे. होनाजीची खडकीच्या लढाईवर पोवाडेवजा लावणी आहे. रामजोशीनें उपदेशपर ३३ लावण्या लिहिल्या आहेत. प्रभाकराच्या पौराणिक आख्यानांवर ११९ लावण्या आहेत. पोवाड्यांतहि लावणींत प्रामुख्यानें येणारीं समाजजीवनाचीं, विलासाचीं, शृंगाराचीं वर्णनें आढळतात. कारण शाहिरांचा मुख्य रोख ऐतिहासिक घटनांचें उद्बोधन करणें, इतिहासाचें कांहीं उदात्त हेतूनें पुनरुज्जीवन करणें असा असण्यापेक्षां इतिहासाच्या निमित्तानें चित्ताकर्षक अशीं दृश्यें श्रोत्यांच्या

डोळ्यांसमोर उभीं करणें हाच असल्याचें दिसतें. परंतु शृंगारप्रधान विलासानें लावण्यांचा बराच मोठा भाग व्यापलेला आहे. अशा वर्णनास इतिहासापेक्षां श्रीकृष्णचरित्रच जास्त उपयोगी पडलें आहे ! आणि या अप्रत्यक्ष मार्गापेक्षांहि प्रत्यक्ष डोळ्यांसमोर दिसणारीं अत्यंत प्रबल अशा कामवासनांचींच चित्रें त्यांनीं अतिशय उघडपणें रंगविलीं आहेत. दुसऱ्या बाजीरावावर लिहिलेल्या लावण्यांत त्यालाच ‘ श्रीकृष्ण ’ करून टाकलें आहे !

‘लावणी हें महाराष्ट्राचें खरें खुरें जिवंत काव्य आहे. महाराष्ट्र समाज-जीवनाचें तें मूर्तिमंत चित्र आहे ’ अशीं विधानें वारंवार एेकू येतात, परंतु तीं पूर्णपणें सत्य नाहींत. एक तर लावणींत रंगविलेलें जीवन बहुतांशीं तत्कालीन शहरांतलें आहे. पेशवाईतील वैभवाचा उपभोग घेण्याची जी शहरी तऱ्हा होती तीच लावण्यांत विशेषेंकरून रंगविलेली आहे. महाराष्ट्रांतील जानपदाचें जीवन त्यांत तितकेंसें आढळून येत नाहीं. बहुतेक शाहीर श्रीमंत सरदारांना खूष करण्यासाठीं झटणारे. त्यांचा श्रोतृवर्ग त्या श्रीमंतांच्याच आसपासचा. अर्थात् त्यांच्या ओळखीचे, अनुभवाचे असेच प्रसंग शाहिरांनीं रंगविले. त्यांचें श्रवण करतांना श्रोतृवर्गांतल्या श्रीमंतांना पुनः प्रत्ययाचा आनंद लाभत असणार आणि इतरेजनांना इच्छापूर्तीचें सुख अनुभवतां येणार !

लावण्यांत वेदांतांतील कूटप्रश्नावर रचलेल्या लावण्यांचा एक प्रकार आढळतो. त्यांना ‘ भेदिक ’ लावण्या असें म्हणतात. शिव-शक्ति, ब्रह्म-माया यांच्या विषयींचें कांहीं ‘ गूढ ’ सर्वसामान्य माणसांच्याहि कानांवर त्या काळीं जात असे. वेदांताची परिभाषा सर्वांना परिचित झाली होती. शाहिरांनीं त्यावर आधारलेल्या लावण्या रचून आपलें चातुर्य दाखविलें आहे. परंतु या भेदिक लावण्यांत वेदांतपर असे खुणेचे कांहीं शब्द वा चरण सोडल्यास इतर भाग हा शृंगाराच्याच सदरांत सहज जमा होण्यासारखा आहे.

शाहिरांना आपल्या रचनाकौशल्याबद्दल विशेष अभिमान वाटे. त्यासंबंधीं त्यांची चुरस असे. स्वतःच्या रचनाकौशल्याबद्दल निःसंकोच-

पणें ते घोषणा करीत. त्यांना याबद्दल ज्यांच्याकडून प्रशंसेची अपेक्षा होती ते बहुतांशीं शिष्ट वर्गातील असत. शाहिरांनीं शिष्टांच्याच भाषेचा आश्रय प्रामुख्यानें केला आहे. लावणींतील जीवनाप्रमाणें लावणींतील भाषाहि बरीचशी नागर आहे. रामजोशी, अनंतफंदी, प्रभाकर हे तर चांगली घोटीव भाषा बोलतात !

विषयांची विविधता लावण्यांत आहे. शृंगारास राजपद आहे खरें; पण त्याच्या आसपास इतरहि रस त्या दरबारांत आहेत. शहरांचीं वर्णनें, क्षेत्रांचीं वर्णनें, दंगा, दुष्काळ यांचीं शब्दचित्रें, स्त्रीजीवनांतील प्रणयाप्रमाणेंच, मातृत्वाची तीव्र तळमळ, पातिव्रत्याचा अभिमान, शीलाची ऐट, इत्यादि लावण्यांत ठिकठिकाणीं दिसतात.

शाहीर पोटासाठीं कवनें करीत असले आणि त्यांनीं डोळ्यासमोर दिसेल त्या जीवनापलीकडे फारसा विचार केला नसला, प्रसंगीं त्यांनीं आपल्या काव्यशक्तीचा बाजार केला असला तरी ते कवि होते, यांत तिलप्राय शंका नाहीं. कल्पनाविलासाचीं वाटेल तेवढीं उदाहरणें त्यांच्या कवनांत आढळतात. अत्यंत अर्थवाहक अशा नादयुक्त शब्दांची योजना करून श्रोत्यांचें श्रवण आणि अंतःकरण या दोहोंवरहि अधिकार गाजविण्याचें त्यांचें कौशल्य अप्रतिम आहे. शिष्टांच्या मताची त्यांना रुखरुख नसल्यानें त्यांची प्रतिभा स्वैरपणें विहार करीत असते. शाहिरांची कविता ही ऐकण्यासाठीं निर्माण झालेली आहे. डफ, तुणतुणें अशीं साधीं साधनें, चित्ताचा वेध करणारा सूर आणि त्यांस अंगविक्षेपाची, हावभावाची मनमोकळी साथ या सर्वांमिळून शाहिरी कवनाची रससिद्धि होते. फडांतल्या कविइतकें, शाहिराइतकेंच तें बेमालूम वठविणारास, होनाजी इतकेंच त्याचें कवन वठविणाऱ्या 'बाळा' स महत्त्व होतें. महाराष्ट्रांतच हा लोकविलक्षण संप्रदाय आणि तोहि एकाएकीं उदयास आला. महाराष्ट्राच्या वैभवाबरोबर तो कळसास पोहोंचला आणि लुप्तप्रायहि झाला !

**अनंतफंदी** ( इ. स. १७४४–१८१८ ) हा संगमनेरचा राहणारा होता. याचें आडनांव घोलप. त्याच्या घराण्यांत गोंधळीपणाचा धंदा होता.

मलकफंदी नांवाच्या एका फकिराशीं स्नेह जडल्यावर त्यानें 'फंदी' हें पद आपल्या नांवास जोडलें.

आपल्या कवित्वाच्या जोरावर तो पेशव्यांचा दरबारी कवि झाला ! दरबारी कवीचे सर्व गुणदोष त्याच्या काव्यांत दिसतात. परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन त्यास लाभलें. परंतु तिचा अर्थ सांगतांना धन्याचा कल संभाळून इतिहासाची ओढाताण करावी लागली. खर्ड्यांची लढाई त्यांत सांगावयाची; पण ती श्रीमंतांच्या पुढें. अर्थात् त्यात श्रीमंतांच्याच गुण-वर्णनाचा भाग जास्त आलाच पाहिजे ! परंतु सर्वांत वडील अशा या शाहिरापासून तो शेवटच्या शाहिरापर्यंत कवित्व आणि पोट याचा हा झगडा दिसतोच !

पोवाडे,लावण्या आणि उपदेशपर कटाव आणि फटके अशी यानें विविध कविता लिहिली. मराठेशाहीचीं अखेरीचीं साठ वर्षें अनंतफंदीनें पाहिलीं. सवाई माधवराव ते रावबाजीपर्यंत झालेली हकीकत याच्या माधवग्रंथ किंवा माधवनिधनकाव्य या ओवीबद्ध ग्रंथांत आहे. ग्रंथांतील हकीकत रावबाजीनें स्वतः लिहून दिली व अनंतफंदीनें त्यावर कवित्व केलें. अर्थात् त्यांत बाजीरावाची बाजू प्रामुख्यानें मांडली आहे. परंतु ग्रंथाचा सहावा अध्याय बाजीरावाच्या कारकीर्दीतील बेबंदशाहीचें वर्णन आहे. पेंढार आणि दुष्काळ यांचें वर्णन केलें आहे. हा सहावा अध्याय बाजीरावाशीं वितुष्ट आल्यानंतर लिहिला असावा. पेंढारी आणि दंगा या आपत्तींचें उद्बोधक चित्र अनंतफंदीनें कांहीं लावण्यांतूनहि रेखाटलें आहे. बाजी-रावपुरस्कृत असा भाग हा उघड उघड अनंतफंदीनें पोटासाठीं सत्यासत्याची पर्वा न करितां स्वीकारला आहे ! परंतु त्याला बाजीरावबद्दल मनांतून जें वाटत होतें तें नंतरच्या सहाव्या अध्यायांत आलें आहे.

'फंदी अनंत कवनांचा सागर' या त्याच्या स्वतःविषयींच्या उद्गारा-प्रमाणेंच त्याचें कवित्व आहे. माधवग्रंथाखेरीज त्यानें पोवाडे व लावण्या रचल्या. पोवाड्यांत खर्ड्यांच्या लढाईचा पोवाडा आहे. दरबारी कवि असल्यानें त्या पोवाड्यांत नानांच्या स्तुतीनें बराच भाग व्यापला आहे नानांवर त्याचा एक स्वतंत्रहि पोवाडा आहे. फत्तेसिंग गायकवाड

होळकर, सांगलीकर, मिरजकर व त्यांच्या राजधान्या असे वाटेल त्या विषयावर अनतफंदी कवित्व करीत असे. पोवाडे हा त्याच्या पोटाचा व्यवसायच होता. त्यांत त्याच्या कवित्वशक्तीची बरीच कुचंबणा झाली. परंतु लावण्यांत तसें न घडल्यानें तेथें त्याचें खरें कवित्व दिसतें. चंद्रावळ ही त्याची प्रसिद्ध लावणी म्हणजे कृष्णाच्या जीवनांतील प्रसंगाच्या आधारें शाहिर, श्रोत्यांची शृंगाराची भूक कशी भागवीत असत याचा नमुना आहे ! तरी अनंतफंदीच्या काव्यांत स्पष्टवक्तेपणा असला तरी अश्लील-पणा पुष्कळच कमी ! वर्णनें करतांना शब्दासाठी तो अडावयाचा नाहीं. उपमेच्या युक्तायुक्ततेचा विचार करावयास त्याला सवडच नाहीं. पायां-तल्या जोडव्यांचा खणखणाट सांगताना तो 'जस घोड्याचे नाल वाजती' असें सांगून मोकळा होईल !

लावण्यापेक्षांहि उपदेशपर कटावाबद्दल अनंतफंदी जास्त प्रसिद्ध आहे. तरुण मुलास व्यवहाराच्या बारीक सारीक खाचाखोचा सांगणाऱ्या त्याच्या फटक्यांतील 'स्नेह्यासाठी पदर मोड कर परतु जाभिन राहूं नको. ' अशा ओळी सुभाषितें झाल्या आहेत. अनंतफंदी स्वत: कीर्तनें करी. कीर्तनाच्या वेळीं त्याचे असे कटाव व फटके फारच परिणामकारक ठरत. आजहि ते कीर्तनकारांच्या तोंडीं नेहमी ऐकूं येतात.

**परशुराम**—( इ. स. १७५४ ते १८४४ ) सिन्नर तालुक्यांतील वावीगांवचा हा राहणारा. इतर शाहीरापेक्षां सामान्यजनताजीव-नाचीं चित्रें आणि विषयवैचित्र्य ही परशुरामामध्यें जास्त दिसून येतात. त्याचप्रमाणें राजकीय परिस्थितीचें इतकें स्पष्ट आणि निर्भीड चित्र इत-रांनीं रंगविलें नाहीं. फारसें अध्ययन नसतांना बहुश्रुततेच्या जोरावर त्याचें काव्य संपन्न झालें आहे.

कृष्णचरित्र हा त्याच्याहि लावण्यांचा मुख्य आधार आहे. अर्थात् त्यात अवांतर भाग पुष्कळच आहे. कृष्णचरित्रपर अशा २।३ लावण्याखेरीज द्रौपदीवस्त्रहरणावर त्यानें लावणी केली. वस्त्रांच्या याद्या देतांना खंबायती पीतांबर, अष्टीचा धोतरजोडा, हेहि त्यांत समाविष्ट झाले आहेत ! कृष्ण-चरित्रांत लोकप्रिय असा भाग ठरलेला आहे. राधा किंवा गोपी यांचीं

तारुण्यसहज आतुरता आणि प्रत्युत्तरादाखल कृष्णाचे विलास हीं परशुरामांतहि येतात. परंतु यांत कांहीं वेदांत आहे हें सांगण्याची परशुराम नेहमीं आठवण ठेवतो. नवराबायकोच्या भांडणावर केलेल्या लावण्यांत तत्कालीन सामान्य समाजांतील समजुती, नवससायास चालीरीति या प्रमाणेंच वैवाहिक संबंधांचें शैथिल्यहि दिसून येतें. त्यांत बालेघाटी लावण्यांत गांवढ्यांतील जीवनाचें प्रतिबिंब जास्त स्पष्ट दिसतें. इतर शाहिरांनीं स्त्रीपुरुषांतील प्रणयाचें वर्णन करतांना दाखविलेली कलाकुसर परशुरामांत नाहीं. तसेंच कामवासनेचा इतका उग्र वासहि त्यांत नाहीं. दरबारी कारस्थानाची झळ न लागलेला, शहरच्या चोंचल्याची बाधा न झालेला, रावबाजीच्या अनीतिकर्दमापासून अलिप्त असलेला, खेड्यापाड्यांतील, शेतांमाळांवरील, झोपड्याखोपटांमधील, मोकळा, स्वतंत्र, साधाभोळा, दिलदार, बाणेदार, हौशी, उघड्या मनाचा खरा मराठा, परशुरामाच्या लावणींत पहावयास मिळतो. ( म. शा. २२५ ).

इंग्रजी अमदानीपूर्वीच्या प्रसंगांपैकीं रघुनाथरावानें कोपरगांवीं जी नवी वसती केली तिचें वर्णन त्यानें एका लावणींत आहे. पण तें ऐकून रघुनाथरावनें देऊ केलेलें इनाम परशुरामानें नाकारलें ! तरी शेवटीं पोटासाठीं त्यास स्वाभिमान विकावाच लागला. इंग्रजी अंमलाचें तो अतिशय सूक्ष्म निरीक्षण करतो. “ हें लक्ष्मीला मूळ आलें आहे ! ” असें तो म्हणतो. इंग्रजी झाल्यापासून ‘ राजांचे झाले फर्जी ’ मोठमोठे उमराव धारकरी ‘ राघ्यापरि पिंजऱ्यांत कोंडिले ’ ‘ शूरत्वाशीं डाग लागला ’ हें इंग्रजी अंमदानीचें अंतरंग परशुरामाइतकें इतरांनीं ओळखलें नाहीं किंवा कळूनहि ते गप्प बसले ! पण परशुरामासहि शेवटीं होळकरशाहींत आणि गायकवाडींत पोटासाठीं खुषमस्करी करावी लागलीच !

**रामजोशी** ( इ. स. १७६२ ते १८१२ ) इतर शाहिरांपेक्षां, शिष्ट समाजांत विशेष मान्यता पावलेला हा कविवर ‘पंडित कवि आणि शाहिर कवि यांना जोडणारा दुवा आहे’ ( म. शा. २३ ) विद्वत्ता आणि वर्णश्रेष्ठता यांच्या जोरावर रामजोशींनीं लावणीला प्रथम शिष्टमान्यता मिळवून दिली असें दिसतें ( म. शा. २९ ). लहानपणापासून

हूड स्वभाव असल्यानें त्यास लवकरच भावापासून विभक्त व्हावें लागलें. नंतर तो धोंडीबा शाहिराच्या फडांत दाखल झाला आणि अंगच्या कवित्वामुळें फार लोकप्रिय झाला. घराण्याच्या लौकिकाच्या जोरावर जोशीबुवांनीं कर्ज काढून पैसा उभारला आणि गांवोगांव शाहिरी दौरे सुरू केले ! घरांतून विभक्त झाल्यावर मध्यंतरीं त्यानें पंढरपुरास राहून पाध्येशास्त्र्यांकडे बरेंच अध्ययन केलें आणि पुराणें व कीर्तनें यांवर उपजीविकाही आरंभिली. परंतु पुढें तमाशांत पैसा आणि लौकिक हीं दिसल्यावर त्यानें शाहिरी स्वीकारली ! मोरोपंताच्या उपदेशानें त्याचें परिवर्तन झालें या वृत्तांतांत सत्य किती आणि दंतकथा किती याबद्दल अभ्यासक साशंक आहेत. परंतु ' मोरोपंताच्या काव्यरचनेची छाया रामजोशींच्या कवनांत दिसतें हें मात्र खरें ' ( म. शा. ३० ) संस्कृतच्या अध्ययनामुळें त्याच्या कवनास, विशेषतः शृंगारास संस्कृत वाङ्मयांतील शृंगाराचें वळण लागलें.इतर शाहिराइतकी त्याच्या लावण्यांत मराठी वळण, मराठी भावना हीं आढळत नाहींत रामजोशीनें संस्कृतांतहि लावण्या रचल्या आहेत. शिष्ट समाजाचे प्रभावी संस्कार त्यांच्या वाङ्मयांत जास्त दिसतात. एकंदर शाहिरी काव्यांत त्याची सभ्यता विशेष दिसते त्याच्या लावण्यांत स्त्रीच्या यौवनाची, प्रियकरासाठीं होणाऱ्या तळमळीचीं वर्णनें असलीं तरी ती सर्व वैवाहिक जीवनांतील, प्रस्थापित नीतीच्या मर्यादेंत राहिली आहेत ! त्याच्या नायिका विषयीं लिहितांना 'सती, सुमती, गुणवती' अशी विशेषणें श्री. वर्दे यांनीं योजिलीं आहेत. (म. शा.४४) ज्या काळांत त्यानें काव्यरचना केली त्या काळांतील शिष्ट सांप्रदायाचें उल्लंघन त्याच्याकडून झाल्याचें आढळत नाहीं ( म. शा. ८९ ).

कृष्णलीला हा विषय रामजोशीनेंहि हाताळला परंतु त्यांत सद्भि-रुचीचीं बंधनें कटाक्षानें पाळिलीं आहेत. शृंगार आहेच परंतु तो विप्रलंभ आहे. संभोगांत त्याचें पर्यवसान सहसा होत नाहीं. ग्राम्य असा केवळ एकच शब्द रामजोशींच्या कवनांत आहे इतकें श्री. वर्दे निक्षून सांगतात ( म. शा. ३८ ). रासक्रीडेवरील लावण्यांतील कृष्ण जीवना-तहि गोपींच्या वर्णनांत सखू, साळू, मैना इत्यादि मराठा युवतीचींहि

चित्रें आहेत. या लावण्यांत श्रीहरीनें केलेल्या ' दंग्या'चें वर्णन करतांना रामजोशींच्या मनांत राववाजीनें घातलेला गोंधळच घोळत होता असें दिसतें. 'काय चांगट तरि गोरटा। पुरुषाएवढा पुरुष असुनि तूं खेळसि काय पोरटा ।' या नगरीमध्यें अशा रितीनें राही न पाखरू ' हें सगळें रावबाजीच्याच रोखानें लिहिलें आहे ! रावबाजीवर प्रत्यक्ष न लिहितां रामजोशीनें असा कार्यभाग साधला. कृष्णजीवनावरील रामजोशीच्या लावण्यांत गोपींना कृष्णविलास सुखदायक वाटत नाहीं, त्या सन्त्रस्त झालेल्या आहेत; असा एक सूक्ष्म परंतु महत्वाचा मुद्दा श्री. वर्दे यांनीं मांडून रामजोशीचा सद्भिरुचीविषयींचा कटाक्ष नमूद केला आहे. 'छेकापन्हुति' या अलंकारांतील एका स्वतंत्र लावणींत रामजोशींचें भाषाप्रभुत्वाचें सारसर्वस्व जसें प्रकट झालें आहे तसेंच वरील वैशिष्टयहि व्यक्त झालें आहे. या लावणींत ' सिंहादत्युग्रतरो मे भर्ता ! सावध हो पुर्ता ' असा संस्कृत आणि मराठी यांचा कर्णमधुर संयोग झाला आहे.

परंतु कृष्णलीला वर्णनांतच गोपींशी केलेल्या शरीरनिष्ठ शृंगार चेष्टांचीहि वर्णनें रामजोशीनें केलीं आहेत. हें श्री. वर्दे यांनाहि दृष्टीआड करता आलें नाहीं. आणि शेवटीं त्यांना असें सांगावें लागलें कीं, "जसे श्रोते असतील तशी लोकांच्या मगदुरासारखी भाषा त्याला वापरावी लागे ' ( म. शा. ७७ ) अर्थात् येथें भाषा या शब्दानें भावनांचाहि उल्लेख झाला आहे. कृष्णाच्या निमित्तानें रावबाजीचे विलास वर्णन करणें यांत श्रोत्यांची अभिरुची प्रभावी ठरली. आणि त्या विलासासंबंधीं केलेली थोडी टीका ही रामजोशीची अभिरुची एवढेंच फार तर म्हणतां येईल. रावबाजीची खुषमस्करी करण्याचा प्रसंग त्याच्यावर आला नाहीं म्हणून त्याला अशा टीकेची पुस्ती जोडता आली. परंतु भोवतालच्या श्रोतृवृंदास रावबाजीचे रगढंगच चघळीत चघळीत ऐकावेसें वाटतात हें ओळखून त्यानें तें सुख त्याना मनसोक्त पुरविलें !

रामजोशीच्या उपदेशपर लावण्यामुळें त्यास मोरोपंतांकडून कविवर अशी मान्यता मिळाली. 'भला जन्म हा तुला लाधला' 'नर जन्मामधीं नरा करूनि घे नर नारायण गडी' इत्यादि लावण्यांतला खडखडीत उपदेश,

'हटा तटानें पटा रंगवुनि जटा धरिसि कां शिरीं ? अशी मर्मभेदक टीका असा रामजोशीच्या काव्यांत बराच भाग आहे आणि त्यामुळें कीर्तनकार आणि हरिदास यांच्याबरोबर रामजोशी काव्यरूपानें देवळांत गाभाऱ्यापर्यंत पोहोंचूं शकला ! या उपदेशाशीं त्याचें वर्तन विसगत असल्यानें रामजोशीवर बराच गहजब झालेला आहे. परंतु जीवन आणि काव्य यांचा मेळ बसण्याची अपेक्षा संतकालानंतर सोडूनच द्यावी लागते. कलावंत हा कवींचा एक स्वतंत्र विभाग करावा लागतो. शाहीर हे त्यांपैकीं होत. त्यात रामजोशीचा दर्जा बराच वरचा आहे.

देवादिकांचीं वर्णनें करतानाहि पुराणातील वातावरणापेक्षां आपल्या-भोवतालच्या समाजात देवदेवतांविषयी रूढ असलेले आचारविचार त्यानें सूक्ष्मपणें वर्णिले आहेत. पंढरपूरचें वर्णन करतांना अस्सल वारकऱ्याइतकी उत्कट भक्ति त्याच्या कवनात प्रकट होते. विविध विषयांत तन्मय होण्याचा हा गुण सर्व शाहिरांत आढळतो. ही विविधता प्रसंगामुळें, पोटाच्या सोईमुळें आलेली असली तरी तींत त्यांच्या मूळच्या काव्यशक्तीचाहि प्रत्यय येतो.

रामजोशीचे तीन पोवाडे आहेत. ब्राह्मणी राज्यावरील पोवाड्यांत पुण्याचें आणि पेशवाईचें वैभव वर्णिलें आहे. त्या वैभवाची पेंढारी व दुष्काळ यांनीं धुळधाण केली. पोटासाठी वाटेल तसे अनाचार करूनहि पोट भरेना. या दुःस्थितीचेंहि कारुण्यपूर्ण चित्र दुष्काळाच्या पोवाड्यांत त्यानें काढलें आहे. 'ब्राह्मणी राज्याचा पोवाडा' नानासाहेबांच्या मृत्यूनंतर तीस वर्षांनीं लिहिला आहे. 'रंगाचा दरबार' नानासाहेबांच्या कारकीर्दीच्या शेवटीं सुरू झाला. दुष्काळाचें स्वरूप रामजोशीनें प्रत्यक्षच पाहिलें. ( १८०४–५ ) तिसरा पोवाडा म्हणजे होळकराच्या धामधुमीचा ( म. शा. ५५ ) या धामधुमीचें व संकटाचें पर्यवसान सर्वनाशांत होईल असें त्यानें भविष्य वर्तविलें. तें पाहण्यास तो हयात नव्हता. काशीयात्रा करून आपलें रंगेल, स्वैर जीवन संपवावें असें त्यास शेवटीं शेवटीं फार वाटे. परंतु पुण्यास याचना करूनहि त्याची काशीयात्रेची इच्छा पूर्ण झाली नाहीं !

**प्रभाकर** ( १७६९–१८४३ ) नाशिक जिल्ह्यांत गंगापूर येथें प्रभाकराचा जन्म झाला. विसाव्या वर्षी तो पुण्यास येऊन खंडेराव रास्ते यांच्या आश्रयास आला. पेशवाई बुडाल्यावरहि रास्ते यांच्याकडून प्रभाकरास ऐंशी रुपयांचें वर्षासन मिळत राहिलें. रास्ते यांच्या द्वारां प्रभाकराचा पेशव्यांच्या दरबारांत प्रवेश झाला.

सर्व शाहिरापेक्षां प्रभाकरानें जास्त पोवाडे रचले. त्याचे १३ पोवाडे उपलब्ध आहेत. त्यांत सवाई माधवरावावर दोन, रावबाजीवर दोन, सयाजीराव गायकवाडावर एक, अहिल्याबाईवर एक, रघूजी आंग्रे यावर एक, याखेरीज नानाशंकर शेट, प्रिंगल साहेबाचें मोजणी ऑफिस, विकाजी व पेस्तमजी शेट इत्यादि मुंबईचे शेट-सावकार इत्यादिकांवर प्रभाकरानें पोवाडे रचले. बाजीरावच्या अधःपातानंतर आपल्या काव्यगुणाच्या जोरावर शेट सावकारांना खूप करीत प्रभाकर गुजराण करूं शकला.

सवाई माधवरावावरील पोवाड्यांत ‘ रंगाचा पोवाडा ’ हा प्रसिद्ध आहे. श्रीमंतांच्या नेतृत्वाखालीं पुणें शहरीं चालणारे विलास प्रभाकरानें तन्मयतेनें रंगविले आहेत. माधवरावाच्या मृत्यूवरील पोवाड्यांत राजदरबारच्यीं कारस्थानें, त्यामुळें माधवरावाचा शोचनीय अंत, यशोदाबाईचा हृदयद्रावक शोक या भागामुळें तो पोवाडा अविस्मरणीय झाला आहे. खर्ड्यांच्या लढाईवरील पोवाड्यांत माधवरावाविषयींची हकीकत विस्तारानें देऊन शेवटीं लढाईचें वर्णन आहे. सवाई माधवरावाविषयीं इतका नितांत आदर दाखविणारा प्रभाकर, रावबाजीच्याहि स्तवनांत तितकाच तन्मय झालेला दिसतो ! धनी कसाहि, कोणीहि असो त्याच्या सेवेसाठीं प्रभाकराचें कवित्व हजर असावयाचें ! त्यांत भावनेच्या दृष्टीनें चढउतार व्हावयाचा नाहीं ! कोणत्याच शाहिरास तशी गुणदोष चिकित्सा परवडतच नव्हती. आपल्या कवनानें श्रोत्याना डोलवावें हाच त्यांचा खरा आनंद. याबद्दलच त्यांच्यांत चढाओढ चाले. ती उघड उघड ‘ लावणी ’ ची, कौशल्याची शर्यत होती आणि पोटाचा सवाल होता. त्यांत स्वतंत्रपणें, तटस्थपणें स्वतःचा अभिप्राय व्यक्त करणारा अगदीं अपवादच !

प्रभाकरास बाजीरावाचा चांगला आश्रय असल्यानें बाजीरावावरील पोवाड्यांत त्याच्या शोचनीय स्थितीबद्दलच विशेष कळवळ्यानें लिहिणें प्रभाकरास भाग होतें. 'राव दुर्बिणींतून युद्ध लक्षीत होते' याचेंहि सेवकास कौतुक आहे ! 'कर्म पुढें प्रारब्ध धांवतें लगबग मागून' असे दैववादाचे उद्गार प्रभाकर बाजीरावाच्या पलायनाबद्दल काढतो. आणि 'शंकराच्या कृपेनें राव पुन्हां दिसतील' अशी अस्सल स्वामिनिष्ठास शोभेल अशी आशा इतराप्रमाणें तोहि व्यक्त करतो ! परंतु या आशेवर जगणें त्यास शक्य नव्हतें. दुसरा धनी शोधणें त्यास भाग होतें. हा कविभ्रमर कर्जाच्या कमळांत गुंतला आणि बडोदेकरांची तो करुणा भाकूं लागला ! राघोजी आंग्रे यासहि त्यानें हांक मारली. शेवटीं मुंबईच्या मोजणी हफीसराची, शेट सावकाराची खुशामत करीत प्रभाकर जीवन कंठीत राहिला. उत्तर कालांतील त्याच्या पोवाड्यांत तत्कालीन मुंबई-च्या सुखवस्तु वर्गाचें जीवन प्रतिबिंबित झालेलें आहे.

प्रभाकराच्या ११९ लावण्या उपलब्ध आहेत. त्यांत लौकिक विषया-प्रमाणें देवादिकावरहि लावण्या आहेत. त्यांत मुरली या लोकप्रिय विषयावर तीन लावण्या आहेत. पौराणिक प्रसंगांतील भावनात्मक भागा-पेक्षां बाह्यवर्णनांतच त्याचें कौशल्य दिसतें. कांहीं वेळां तो देवा-दिकांनाहि भलत्या अवस्थेस आणून पोहोंचवतो. उदा० लक्ष्मणानें संतापून सीतेस चांडाळणी म्हणून शाप देणें हें प्रभाकराचें ' रामायण ' आहे ! इंग्रजी अमदानीच्या केंद्रस्थानीं मुंबईस पोट भरीत असतांहि नव्या राजवटींतील लोकस्थितीकडे प्रभाकराचें फारसें लक्ष गेलें नाहीं. तें काम परशुरामानें चांगलें केलें. प्रभाकरासारख्या ' उच्च ' वर्णीयास नव्या राजवटींतील विपरीत परिस्थितीची इतकी झळ लागली नाहीं हें याचें कारण असावें, असें श्री. वर्दे यांचें म्हणणें आहे. ( म. शा. १८९ ) रावबाजीच्या या आश्रितानें आपल्या लावण्यांत काय कहर केला असेल याची सहज कल्पना कारितां येईल. सुमारें २० लावण्यांत स्वत: 'श्रीमंत' हेच नायक आहेत. कांहीं लावण्यांत पतिपत्नी नात्याची चौकट असली तरी त्यांत प्रक्षुब्ध कामवासनेचींच भडक चित्रें आहेत ! हृदयास तेथें

जागा नाहीं ! पण हें त्यानें केवळ पोटासाठीं केलें असेल हें वारंवार आठवणें भाग आहे आणि मग त्यांतील त्याचें सूक्ष्म अवलोकन, ढंगदार शब्दयोजना, इत्यादि काव्यगुण लक्षांत येतात.

**सगनभाऊ** (स. १७७८-१८४०) जातीनें मुसलमान असून महाराष्ट्राच्या लौकिक आणि पारमार्थिक जीवनाशीं सगनभाऊ अतिशय समरस झालेला दिसतो. मराठे वीर, महाराष्ट्रीय संत, महाराष्ट्रांतील धर्मक्षेत्रें व आराध्यदैवतें याच्याविषयीं त्यास अतिशय आदर वाटे.

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत त्याची प्रसिद्धी झाली आणि त्याचा प्रतिस्पर्धी होनाजी बाळ याच्याशीं तो चुरशीचे सामने देऊं लागला. बाजीरावाबरोबर पेशवाई हादरल्यावर पेशवाईच्या नाशाचें वर्णन करीत त्यानें सातारकर महाराजांचा आश्रय मिळविला. छत्रपतींच्याहि गादीच्या नाशाचें वर्णन करण्याचें त्याच्या नशीबीं आलें. इ. स. १८४० मध्यें तो मरण पावला.

खडकीच्या लढाईनंतर श्रीमंतांनीं पलायन केल्यावर पुण्याची झालेली दीनवाणी स्थिती सगनभाऊनें वर्णन केली आहे. धन्याचा आश्रय तुटल्याचें तीव्र दुःख सगनभाऊनें आणखी एका पोवाड्यांत तळमळून वर्णन केलें आहे. ‘ आम्ही अंतरलो सुखाला ’ या वैयक्तिक भावनेचेंच, आश्रिताच्या दुःखाचेंच त्यांत आविष्करण आहे. ‘लक्षांचें अन्न गेलें’ ‘बनवास आला राजेंद्राला’ ‘धड आहेव न, रंडकी न, कैसें केलें भगवंतानें’ ही बाजीरावच्या राज्यत्यागाची सगनभाऊची मीमांसा आहे परंतु शाहिरास याहि स्थितींत विश्वास आहे कीं ‘ घोर होईल परि हरण । ’ म्हणून तो मनाला धीर देतो, ‘ चार दिवस स्वस्थ राही ! ’

नंतर सगनभाऊ छत्रपतींच्या आश्रयास गेला. तेथें असतांना त्यानें पानिपतचा पोवाडा रचला. मूळ प्रसंगानंतर इतक्या वर्षांनीं लिहिलेला हा एकमेव पोवाडा आहे. छत्रपतींचीहि रावबाजीसारखीच गत झाली. सगनभाऊ पुन्हां हळहळून म्हणाला ‘ राजा कुणीकडे, प्रजा कुणीकडे ’ ‘जरिपटक्याचा हत्ती आमुचा रुतला गाळांत ! ’ सगनभाऊ बारकाईनें

बघत होता कीं, 'अवघें राज्य करी न लढाई, खंडणी देती बहादुर इंग्रजाला !'

महाराष्ट्रांतील संत आणि दैवतें याविषयीं सगनभाऊस अतिशय आदर वाटे. विठ्ठल त्यास 'माय माउली' वाटत. जनीचा अभंग आणि मुक्तेश्वराची ओवी त्यास सदासर्वकाळ गावीशी वाटते. त्याची नायिका सुद्धां विठाईच्या साक्षीनें आपल्या प्रीतीची ग्वाही देते. रामायण, महाभारत हे ग्रंथ दाखल्याच्या रूपानें त्याच्या कवनांत वारंवार येतात. मायावाद आणि ब्रह्मज्ञान यांचे रूढ उल्लेख त्याच्या कवनात आढळतात.

शाहिरी सांप्रदायास अनुसरून सगनभाऊनेंहि शृंगारिक लावण्या लिहिल्या आहेत. त्याच्या लावण्यात भावनांचे विलास नाजुक शब्दानें व्यक्त होतात. प्रियकरानें लाविलेली ओढ आणि नंतर त्यानें केलेली बेइमानी तीव्र शब्दांत सगनभाऊनें वर्णिली आहेत.

**होनाजी बाळा** : प्रसिद्ध शाहिराच्या कुळांत या गवळी जातीच्या शाहिराचा जन्म झाला. बाळा करंजकर हा शिंपी त्याचा साथीदार होता. साथीदाराचें बाळा हें नाव होनाजी आपल्या नांवापुढें लावतो. होनाजीचा जीवनवृत्तांत फारसा उपलब्ध नाहीं. सगन व प्रभाकर याच्याबरोबर हाहि रावबाजीच्या दरबारांत गर्जत होता आणि त्याच्या कवित्वानें प्रतिस्पर्ध्यांत इतका तीव्र मत्सर जागृत झाला कीं, प्रतिस्पर्ध्यांनीं शेवटीं मारेकरी घालून त्याचा शेवट केला !

रावबाजीच्या हौशीसाठीं होनाजीनें लावण्यांना रागदारीची जोड देऊन एक नवा उपक्रम केला. 'घनश्याम सुंदरा' या लावणीनें होनाजी महाराष्ट्रांत घरोघर स्मरणांत राहिला आहे. होनाजीच्या हयातींतच ही लावणी इतकी लोकप्रिय झाली होती कीं, प्रभाकर व परशुराम यांनीं होनाजीच्या या भूपाळींतील शब्द घेऊन कल्पनांचेंहि अनुकरण केलें (म. शा. १२६) आणि तीं अनुकरणें होनाजीचें पदलालित्य व प्रसादयुक्त रचना हीं जास्तच स्पष्ट करतात.

होनाजीनें पांच पोवाडे रचले आणि पौराणिक व लौकिक लावण्या

रचल्या ! बाजीरावाच्या हौशीखातर त्यानें लावण्यास रागदारीची जोड दिल्यानें. लावणी सांप्रदाय त्यामुळें बैठकींत स्थानापन्न झाला.

होनाजीनें आपल्या बाजीरावावरील लावण्यांत आपल्या आश्रयदात्याचे अनेक प्रकारचे रंगढंग मुक्तकंठानें गायिले आहेत. या वर्णनांत इतकी तन्मयता दुसऱ्या कोणा शाहिरानें दाखविली नांहीं ! बाजीरावावर त्यानें पोवाडेहि रचले. त्याच्या पांच पोवाड्यांपैकीं तीन बाजीरावावर आहेत. त्यांत रंगाचा पोवाडा विशेष ढंगदार आहे. खडकीच्या पोवाड्यांत त्या लढाईनंतर, पेशवे आणि पेशवाई यांच्या अधःपातानंतर प्रजेचें झालेलें अनाथ जीवन त्यानें परिणामकारक रंगविलें आहे. परंतु त्यास बाजीरावच जबाबदार आहे असें होनाजीस वाटणें शक्य नाहीं. उलट त्यांस हें सगळें ' ईश्वरी सूत्र ' वाटतें आणि त्या ईश्वरीसूत्रानेंच 'स्वामींची पुन्हां भेट होईल' अशी दृढ आशा तो व्यक्त करतो.

पौराणिक आणि लौकिक लावण्यापैकीं पौराणिक लावण्या मल्हारीमार्तंड, बाणासूर, गोपीचंद, द्रौपदीवस्त्रहरण, नलदमयंती इत्यादि लोकप्रिय कथांवर रचिल्या आहेत. द्रौपदीवस्त्रहरणांत भगवंतांनीं कलकत्याचीं पातळें मिळविलीं आहेत ! अशीं कालविपर्यासाचीं अपवादात्मक उदाहरणें वगळल्यास मूळ कथानकांत डवळाढवळ न करतां होनाजी त्यांस भावनाविलासाची शोभा चढवितो. लौकिक लावण्यांतील होनाजी व बाजीराव सेवक होनाजी हे अगदीं भिन्न वाटतात. त्याच्या लौकिक लावण्यांत पातिव्रत्याचें माहात्म्य, सामर्थ्य आवर्जून वर्णिलें आहे. त्यांतील पतिव्रता आपल्या कामसू पतीचा कडाडून निषेध करीत आहेत. बाह्य सौंदर्याची तेथें मुळींच बढाई नाहीं. तर शुद्ध व सात्त्विक अंतःकरणाची तळमळ त्यांत आहे. स्त्रीच्या ठिकाणीं प्रकट होणारा यौवनाचा उन्माद होनाजीनेंहि वर्णिला आहे. अशा युवतींचीं अत्यंत रेखीव शब्दचित्रें होनाजीनें रंगविलीं आहेत. परंतु या बाह्यरंगास अंतरंगाची संगति असावी असें होनाजी वारंवार सांगतो, शरीरनिष्ठ आकर्षणाचें पर्यवसान नीतिप्रद संबंधांत झालें पाहिजे असें होनाजी सांगतो. ' पुष्प कवळें, पक्व होतां अधिक सुवासावें। तसें प्रीतीचें लक्षण

दिसेंदिस झालें ढोंव ' ही होनाजीची भावना आहे ! अशा वृत्तीच्या शाहिरास रावबाजीसारखा आश्रयदाता लाभावा हें त्याचें दुर्दैवच होय ! ' मी करीन पवित्र पवित्रार्शी ' असा त्याचा आत्मविश्वास होता.

" तरुण मनाचा उल्लूपणा, त्याची हावरी महत्त्वाकांक्षा, त्याची अल्लड हौस व उतावळा हुरूप, त्याच्या कामना, कल्पना आपल्या कवनांतून रेखाटण्याचा प्रयत्न या शाहिरांनीं केला व महाराष्ट्राच्या सारस्वतांत पोवाडे आणि लावण्या यांना जर कांहीं महत्त्व असेल तर तें केवळ या लौकिक भावनेमुळें. वैराग्याचा उसना उपदेश, भोळया भावाची आळवणी, मुलुखगिरीची घमेंड, पराक्रमाच्या बढाया, कामुक मनाचा चवचालपणा याचें इतकें उघड, इतकें भेदक व इतकें बेफाम वर्णन दुसऱ्या वाङ्मयांत वाचायला मिळणें कठिण. "

—ग. त्र्यं. माडखोलकर. जीवन साहित्य पृ. ९८

# २१. नवयुगाचा आरंभ

## ( १८१८–१८७४ )

" पेशवाई बुडाल्यानंतर एकही नवा शाहीर उत्पन्न झाला नाही. थोडे जुने शाहीर पुढें कांहीं काल हयात होते व प्रसंगविशेषीं ते कवनही करीत. पण त्यांचें कवन हे एखाद्या पोरक्या पोराप्रमाणें कळाहीन निस्तेज झालेलें दिसतें. कालमानानें जेव्हां हे जुने शाहीर दिवंगत झाले तेव्हा मराठी वाङ्मयाचा प्रवाह अगदींच आटला व सुमारें २०–२५ वर्षांनंतर जेव्हा तो पुन्हा किंचित् वाहूं लागला तेव्हा त्याचें स्वरूप व गति सर्वस्वी बदललेली दिसूं लागली. " ( म. सा. स. ३६ )

**राजकीय पार्श्वभूमि** : १८१३ मध्यें एतद्देशीय शिक्षणासाठीं ईस्ट इंडिया कंपनीनें पैसा खर्च करण्यास आरंभ केला. १८३२ मध्यें मेकॉले साहेबाच्या अट्टाहासानें आणि ग. ज. बेंटिंक याच्या पाठिंब्यानें इंग्रजी शिक्षणाचा प्रयोग जारी झाला. तरी प्रांतिक गव्हर्नराच्या स्वातंत्र्याचा फायदा घेऊन मुंबईचे पाहिले गव्हर्नर मौट स्टुअर्ट एलफिस्टन यांनीं ( १८१८ ) एंजिनिअरिंग व वैद्यकी शिक्षणांतहि मराठीचें प्रभुत्व राखण्याचें ठरविलें आणि इंग्रजींतील शास्त्रीय ग्रंथाच्या भाषांतराची चळवळ जोरांत सुरू झाली. बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी ( १८२२ ) मोठ्या सरकारी मदतीनें शाळांसाठी मराठींतून ग्रंथ लिहून घेऊं लागली. १८२६ त पहिलें मराठी व्याकरण झालें. १८२९ त पहिला कोशहि तयार झाला. आणि १८२९ त सोसायटीनें शिळाछापखाने काढून स्वतः ग्रंथ छपाईस आरंभ केला. पेशवाईतील पांच लाखाच्या दक्षिणाफंडापैकीं तीस हजार रुपये ग्रंथ निर्मितीसाठीं खर्च करण्याचें ठरलें व त्यासाठीं दक्षिणा प्राइझ कमिटी स्थापन झाली. ( १८५१ ) १८२८ त एलफिन्स्टन जाऊन मालकम साहेब आले. त्यांनीं एलफिन्स्टनचेंच धोरण चालूं ठेविलें. १८२६ ते १८३० या काळात पुस्तक छपाईसाठीं ९७२२३ रु. व ग्रंथांना बक्षिस म्हणून ३२७०० रु. सरकारांतून खर्च झाले.

१८४० त बोर्ड ऑफ एज्युकेशन स्थापन झालें. शिक्षणाच्या माध्यमाविषयीं कडाक्याचा वाद झाला. पण बोर्डाचे चिटणीस कर्नल पेरी यांनीं मराठी माध्यमाचा पक्ष लढविला. त्यानें या पूर्वीच स्वतः पुष्कळ शास्त्रीय ग्रंथांचीं भाषांतरें केलीं होतीं व एंजिनिअरिंग कॉलेजांत मराठीतून यंत्रविद्या यशस्वीपणें शिकविली होती. मातृभाषामाध्यमपक्षास स्वतः गव्हर्नर साहेबांनी दुजोरा दिला. मराठी समृद्ध करण्याचा उपक्रम जारीनें पुन्हां चालू झाला. १८४१ त गणपत कृष्णाजी यांनीं मुंबईत स्वकीयाच्यासाठीं मराठी ग्रंथ छापण्यास आरंभ केला. १८५४ मध्यें कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें शिक्षणांत वर्गवारी करून प्राथमिक शिक्षण क्षेत्रापुरतेंच मराठीचें कार्यक्षेत्र बहुतांशी मर्यादित केलें. १८५४ पासून मराठीचा नवा राजाश्रय जवळ जवळ संपला. इंग्रजीचा बोजा सरकारनें लादला आणि एतद्देशीयांनीं तो हौशीनें अहमहमिकेनें डोक्यावर घेतला ! निमसरकारी, बिनसरकारी व खासगी मार्गानें तेव्हांपासून मराठीची सेवा चालू आहे. पुणें विद्यापीठ आता मराठीच्या उत्कर्षासाठीं सिद्ध झालें आहे. तरी एलफिन्स्टन, जर्व्हिस यांच्या इतका धीर आजच्या मराठीच्या संसारांतील कर्त्याकरवित्यानाहि वाटत नाहीं. इंग्रजीवांचून कसें होईल हा प्रश्न १८१८ पेक्षां १९४८ साली जास्त गंभीर स्वरूपाचा झाला ! पण लोकाश्रयाचें बळ वाढलें आहे. मराठीचें वैभव वाढत आहे, तें वाढतच राहणार !

हा ' सरकारी ' इतिहास ही आंग्लाईतील मराठी वाङ्मयाच्या चढउताराची पार्श्वभूमि आहे. ती मराठी वाङ्मयाच्या बाबतींत फार परिणामकारक ठरली आहे. प्रतिज्ञेनें मराठी लिहिणारे, प्रज्ञेनें वाचकास जिंकणारे, मूळच्या उर्मीनें सिद्ध झालेले असे वाङ्मयसेवक आज उपेक्षितासारखे झाले आहेत. पण तो विचार फार अलीकडचा आहे. प्रस्तुत १८७४ पर्यंतचीच हालहवाल पहावयाची आहे.

" तत्कालीन प्रचलित असलेल्या बहुतेक शास्त्रीय विषयावर स्वतंत्र ग्रंथ तयार झाले. यावरून त्या वेळीं—पाऊणशें वर्षांपूर्वी—मराठी भाषेची उपयुक्तता लोकाना पटली होती ही एक व परिभाषेच्या काल्पनिक अड-

चणीमुळें ग्रंथानिर्मिति थांबली नाहीं ही दुसरी या दोन्ही गोष्टी एकदमच सिद्ध होतात. प्रबल इच्छा आणि लेखनशैली असल्यावर तज्ज्ञाला शास्त्रीय विषयाची मातृभाषेंतून फोड करण्यांत आनंद वाटावा का कष्ट पडावे ? परंतु जी गोष्ट शंभर वर्षांपूर्वी सहज होत होती तिच्या शक्याशक्यते-विषयीं आज शुष्क वादविवाद चालू आहे. " ( गो. रा. परांजपे. प्रदक्षिणा पृ. ६२ ).

सरकारी प्रयत्नाबरोबर मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठीं अनेक संस्था निघाल्या. विद्योत्तेजक सभा, ( १८१५ ) नेटिव्ह स्कूल बुक आणि स्कूल सोसायटी ( हिंद शाळा पुस्तक मंडळी १८२५ ), बॉम्बे बुक अँड ट्राक्ट सोसायटी ( १८२७ ), स्टुडण्डस् लिटररी ॲन्ड सायंटिफिक सोसायटी ( १८४८ ), दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी ( १८४९ ), कल्याणोन्नायक मंडळी, ज्ञानप्रकाश सभा, दक्षिणा प्रैज कमिटी ( १८५१ ) या संस्था मराठी ग्रंथनिर्मितीस उत्तेजन देऊन व स्वतः ग्रंथनिर्मिति आणि प्रकाशन करून अतिशय मोठें कार्य करीत होत्या.

अर्वाचीन काळांतील वाङ्मयाचा नवयुगांतील एका अत्यंत सामर्थ्यवान् यांत्रिक कलेशीं अतिशय जिव्हाळयाचा संबंध आहे. ती कला म्हणजे मुद्रणकला होय. हिंदुस्थानांत पहिला छापखाना इ. स. १८०० मध्यें ख्रिस्ती धर्मप्रसारकांनीं बंगालमध्यें श्रीरामपूर येथें काढिला. मराठी भाषेचें व्याकरण व सेंट मॅथ्यू हीं दोन पुस्तकें १८०५ मध्यें छापून डॉ. केरी यांनीं मराठी मुद्रणकलेचा पाया घातला.

अशा रीतीनें सरकार, संस्था, व्यक्ति व यंत्र यांच्या सामुदायिक प्रयत्नानें मराठी वाङ्मयाची चौफेर प्रगति होण्याची अनुकूलता निर्माण झाली.

पाश्चात्य देशांतील विविध विषयांच्या ज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं ज्ञानप्रसारक, विद्याकल्पतरु, ज्ञानदर्शन हीं नियतकालिकें निघालीं. हिंदु-धर्मरक्षण व ख्रिस्ती धर्मप्रचाराचें निराकरण करण्यासाठीं उपदेश चंद्रिका ( १८४४ ), विचारलहरी ( १८५२ ), सद्धर्मदीपिका ( १८५५ ) हीं

नियतकालिकें निघालीं. प्रचलित विषयावर चुरचुरित टीका करणारें ' दंभहारक ' निघालें. प्रजेच्या तक्रारींचा पुरस्कार ' प्रभाकरांतून ' होऊं लागला. ' पुणें पाठशाळा पुस्तक ' शिक्षण विषयास वाहिलेलें होतें. ' स्त्रीज्ञानप्रदीप, ' स्त्रीशिक्षण व स्त्रियांचे प्रश्न यांचा ऊहापोह करी. या नियतकालिकातून ज्ञानप्रकाश (१८४९) विविधज्ञानविस्तार (१८६७) यानीं नियतकालिकांच्या जगात आपलें स्वतंत्र स्थान निर्माण केलें.

या काळांतील ग्रंथसंपत्तीची मोजणी न्या. रानडे यांनीं प्रथम केली. यावरून असें दिसतें कीं,

१८१८ ते १८६४ पर्यंत ६६१ ग्रंथ झाले. त्यांत ४३१ गद्य व २३० पद्य होते. गद्यांत शालोपयोगी ९८ व इतर ३३३. त्यांत इतिहास २३, कथागाथा ३९, निबंध ३३, चरित्रें १०, प्रवासवर्णनें ४, पौराणिक बखरी ११, धर्मतत्त्वज्ञान २०, भौतिक शास्त्रें ११, राजकारण ५, पत्रें, मासिकें १०, संकीर्ण ५६. अशीं सुमारें २२१ पुस्तकें लोकानुरंजक स्वरूपाचीं व इतर किंचित् अभियुक्त जातीचीं. त्यांत शास्त्रीय ६८ ( ६ अर्थशास्त्र, २२ वैद्यक. बाकी इतर ) कायदा ४१ ( २८ कायदेकानूंची व इतर तात्त्विक ) अशी सुमारें ३३३ पुस्तकांची विल्हेवारी न्यायमूर्तींनीं ढोबळपणें लाविली आहे. या पुस्तकांविषयीं न्यायमूर्तींनीं ठिकठिकाणीं ' of no marit ' असा शेरा मारिला आहे. तथापि हा वाग्विस्तार त्यांनीं गौरवाई ठरविला याचें कारण एवढेंच कीं, तो सुलक्षणी होता. ( म. ग. इं. अ. ९ )

या वाग्विस्तराचें विषयवारीनें स्वरूप पाहिल्यास त्याच्या अंतरंगाची थोडी कल्पना येईल.

## काव्य : भक्तिपर कविता :

राजकवि चंद्रशेखर यांनीं संपादिलेल्या ' अर्वाचीन कविता ' या पुस्तकांत ' पहिला अर्वाचीन कवि ' म्हणून हंसराज याच्या कवितेंतील उतारे दिले आहेत. या साधु पुरुषाचे ( शके १७२०-१७७७ ) लहान मोठे मिळून वेदांतावर अकरा ग्रंथ आहेत. वेदांतासारखा विषय साध्या

सरळ पद्धतीनें बिंबविण्याची शैली त्याच्यांत आढळते. हंसराजानें अभंगबद्ध अध्यात्मरामायण लिहिलें आहे. अर्वाचीन काळांत हंसराजासारखा कवि अपवादच होय. भक्तिपंथांतल्या कवितेसारखी कविता लिहिणारे थोडे कवि या काळातहि आढळतात. भा. दा. पाळंदे (इ. १८३२-१८७४) यांनीं गीतेचें ओवीबद्ध भाषांतर केलें आणि रत्नमाला नांवाचा एक ईश्वरभक्तिपर पद्यग्रंथ लिहिला. रचनावैचित्र्यामुळें विशेष प्रसिद्ध असे नामांकित सत्पुरुष, पंडित, कवि विठोबा अण्णा दप्तरदार (इ. १८१३-१८७३) यांची काव्यरचना, पदें, कटाव, वगैरे स्फुट स्वरूपाची आहे. आपल्या संस्कृत ग्रंथरचनेंतील पांडित्य मराठी पदांत आणण्याचा अट्टाहास न केल्यानें यांचीं भक्तिरसपूर्ण पदें फार लोकप्रिय झालीं आहेत. डॉ. कीर्तिकर (इ. १८४९-१९१९) यांची भक्तिसुधा या भक्तिपरंपरेंत समाविष्ट होण्यासारखी आहे. अर्वाचीन काळातील, प्रस्तुत कालखंडांतले, भक्तिपरंपरेचे हे अगदीं तुरळक असे अवशेष म्हणतां येतील.

**सृष्टिपर कविता** : सृष्टिवर्णनें मुक्तेश्वरादि कथानककवींच्या काव्यांत होतीच; परंतु तीं कथानुरोधानें येत. सृष्टि हाच काव्याचा विषय होऊन स्वतंत्रपणें सृष्टिवर्णनें इंग्रजी वाङ्मयांत आहेत तशीं मराठींत या काळांत येऊं लागलीं. 'बालकवि' चिंतामणी पेठकर (इ. स. १८५१–१८७९) यांचें गंगावर्णना (इ. स. १८७४) व राजकवि बापूसाहेब कुरुंदवाडकर (इ. स. १८३८–१८९९) यांचें गंगावर्णन हीं यांपैकीं होत. अर्थात् इंग्रजींतील असल्या काव्यांत न आढळणारा भक्तिभाव हा या मराठी काव्यांतील संस्कृतिविशेष आहे. यापूर्वींच्या, नद्यांच्या देवताभावानें केलेल्या वर्णनापेक्षां वरील काव्यांत प्रत्यक्ष 'दृश्य' वर्णन जास्त व रेखीव आहे. पुन्हा पेठकरांनीं आपलें काव्य निर्यमक आणि मुक्तछंद करण्याचाहि प्रयत्न केला आहे. २८ व्या वर्षी पेठकरांचा मृत्यु झाला. एवढ्या अल्पवयांत ते बहुभाषाकोविद झाले होते व गंगावर्णनासारखी अविस्मरणीय काव्यरचना करूं लागले होते !

कालिदासादिकांच्या पद्धतीचीं स्वतंत्र काव्येंहि या काळीं झालीं.

पां. गो. पारखी ( १८४४–१९११ ) यांचें ' षड्ऋतुवर्णन ' ऋतु-संहाराच्या पद्धतीचें आहे. कृष्णशास्त्री राजवाडे याचा ' उत्सवप्रकाश ' हें ( इ. स. १८७४ ) हिंदूंच्या सणाचें रसभरित वर्णन आहे. त्यांत प्रसगवैचित्र्य व शाहिरी पद्धतीचाहि थाट आहे. तत्कालीन समाजजीवनाच्या दृष्टीनेंहि उत्सवप्रकाश वाचनीय आहे.

इंग्रजी काव्याच्या भाषांतरांत बजावा प्रधान यांचें दैवसेनी हें ' लेडी ऑफ दि लेक 'चें भाषांतर विशेष लोकप्रिय झालेलें दिसतें. काव्याच्या दोन आवृत्त्या ( १८६७ व १८७४ ) निघण्याचें अपूर्व भाग्य त्यांना हयातीतच लाभलें. ' मराठी भाषेंतला हा पहिलाच काव्यप्रकार ' ( सरवटे म. सा. स. ४९ ) इतका लोकप्रिय झाला.

संस्कृत काव्याच्या भाषांतरांत गणेशशास्त्री लेले ( इ. स. १८२५–१८९८ ) यांचें रघुवंशाचें समवृत्त भाषांतर हें विशेष लोकप्रियता पावलें. याशिवाय जयदेवाच्या गीतगोविंदावर प्राकृत टीका झाली. ( १८५३ ) शृंगारशतकाचें ( १८६२ ) व नैषधचरिताचें मराठी भाषांतर ( १८७३ ) प्रसिद्ध झालें.

देशपरिस्थितीचें काव्यांतून कांहीं उद्बोधन करण्याचा विचार कवींच्या मनात आला. परंतु त्यांत इंग्रजी राज्याविषयींचा भाबडा आदरच विशेष आहे. परशुराम तात्यांनीं मराठी इतिहासावर अशा सोप्या कविता लिहिल्या. देशांतील नव्या विचारप्रवाहाकडे लक्ष देऊन मु. बा. जोशी यांनीं ' भारतवर्षिणी 'त सुशिक्षितांची मनःस्थिति रंगविली. आणि आंग्लभूमींतील लोकांचा आदर्श दाखवून ' उद्यमें देश संपत्तिवृद्धि,' करण्याचा उपदेश केला आहे.

नवयुगांतील क्रांतिकारक प्रयत्न कुंटे यांनीं ' राजा शिवाजी ' या महा (!) काव्यानें केला. वरच्या वर्गांतील उच्च भावना व उदात्त विचार खालच्या वर्गांपर्यंत पोहोंचवाव्यात, दोन्ही वर्ग जवळ आणून राष्ट्र एकजीव करावें या राष्ट्रहिताच्या बुद्धीनें म. मो. कुंटे हे १८६८ त काव्यप्रांतांत उतरले. विषयाबरोबर भाषाहि जनतेस समजेल अशी, खेडवळपणाच्या आरोपाची पर्वा न करितां लिहिण्याचा उपक्रम ' राजा

शिवाजी ' या अपूर्ण आणि वरील दृष्टीनें अपूर्व अशा महा (!) काव्यानें केला. भाषेच्या बाबतींत क्रांतिकारक प्रयत्न या दृष्टीनेंच राजा शिवाजीचें हें काव्य उल्लेखनीय आहे. परंतु कुंटे यांनीं सुलभतेचा कांहीं वेळां अतिरेक केल्यामुळें काव्य असें थोडेंच राहिलें.

**स्वराज्यांतील गद्य :**

महानुभवांच्या गद्य वाङ्मयाखेरीज १६ व्या शतकापासून जें गद्य वाङ्मय उपलब्ध आहे त्यांत फादर स्टीफन हा प्रमुख आहे. इ.(१५४९-१६१९) हिंदुस्थानांत येणाऱ्या या पहिल्या इंग्रजानें मराठींत खिस्त-पुराण सांगून मराठी भाषेविषयीं अतिशय गाढ भक्ति व्यक्त केली आहे. त्याच्या या ओवीबद्ध पुराणाच्या आरंभीं लहानशी गद्य प्रस्तावना आहे. स्वधर्मनिष्ठा आणि परभाषेविषयीं जिव्हाळा या ग्रथकाराच्या ठिकाणीं आहे. ' परमेश्वराच्या वस्तु निरोपूंसी योग्य ' अशी ही भाषा आहे अशी त्याची भावना आहे.

शिवाजीचा आद्य चरित्रकार कृष्णाजी अनंत सभासद याची सभासदांची बखर ( श. १६१९ ) शिवाजीचें समकालिनानें व निकटवर्ती व्यक्तीनें लिहिलेलें ' शब्दचित्र ' आहे.

इ. स. १७१६ त लिहिलेलें आज्ञापत्र हें राजनीतीविषयींचें विवेचन आहे. तें रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्या नांवावर आहे. ग्रंथकर्त्या-बद्दल कांहीं अभ्यासकांना शंका आहे. राज्यव्यवहारशास्त्राचें अतिशय सूत्रबद्ध गोळीबद वाक्यांत केलेलें व सरळ सुबोध भाषेंत केलेलें विवेचन म्हणून आज्ञापत्र महत्त्वाचें आहे. सरळ सुबोध असें बखरींतच जमा होणारें नाना फडणीसांचें ( १७४२-१८०० ) आत्मचरित्र अत्यंत नि.संकोचानें केलेल्या आत्मनिरीक्षणानें वाचनीय झालें आहे. माधवरावास पेशवेपद मिळेपर्यंतचा वृत्तांत नानांनीं लिहिला आहे.

भाऊसाहेबांचा बखरीचा लेखक अनिश्चित आहे. परंतु तो मोठा साक्षेपी गृहस्थ आहे हें खास. पानिपत प्रसंगीं झालेले कारुण्यांत पर्यवसान पावलेले वीररससंपन्न प्रसंग रंगवितांना वाचकाचे बाहू स्फुरावेत आणि

डोळयांत आंसवें उर्मी राहावींत असें कांहीं विलक्षण ओज लेखकाच्या लेखणींत आहेत. लहानमोठया राजपुरुषांच्या स्वभावांतील बारीक छटा संभाषणांत दाखविण्याचें कौशल्य बखरकारांत आहे. पानिपतच्या पाठोपाठ (इ. १७६४-६५) रघुनाथ यादवानें पाणिपतची बखर लिहिली आहे. एकाच प्रसंगाचीं हीं दोन शब्दचित्रें असून लेखकांच्या वैशिष्ट्यामुळें दोन्ही वाचनीय झालीं आहेत.

'भाऊसाहेबाच्या बखरींतील युद्धाच्या 'तमाशा'चें वर्णन वाचतांना स्फुरण होत नाहीं किंवा पानिपतच्या पळ वाचतांना गहिंवर येत नाहीं असा पाषाण कोणी आढळणार नाहीं.' (म. ग. इं. अ. ७)

इंग्रजी अंमलाच्या आरंभीं कोरलेला (इ. १८०३) तंजावर येथील देवालयांत कोरलेला हा प्रचंड शिलालेख आहे. त्यास तंजावरची बखर म्हणतात. तो लेख म्हणजे छापील शेंसवाशें पृष्ठांचा मजकूर आहे. (प्रा. म. ग. १८७). छत्रपति सरफोजी यांनीं त्यांत मराठेशाहीची हकीगत खोदविली आहे. ऐतिहासिक सत्य वा भाषा या दोन्ही दृष्टींनीं ही बखर उपेक्षणीय आहे. पण तंजावरी मराठी गद्याचा तो एक नमुना आहे.

मल्हार रामराव चिटणीस (साताराच्या प्रतापसिंहाचा चिटणीस). यांचीं सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र बखर इ. स. १८१० मध्यें रचिली आहे. शिवाजीच्या मृत्यूनंतरहि शिवचरित्रांतील प्रसंग चिटणीस आजहि आपल्या डोळयासमोर उभे करूं शकतात इतकी त्यांची स्मृति आणि दृष्टि सूक्ष्म आहे. चिटणीसानी मराठी राजांच्या आणखीहि बखरी लिहिल्या आहेत. राजकारणी पुरुषाच्या जीवनाचें अतिशय सूक्ष्म ज्ञान चिटणीसांच्या ठिकाणीं आहे हें बखरीत स्पष्ट दिसतें.

पेशवे यांच्या बखरींपैकीं सोहोनी यांची पेशव्यांची बखर १९ व्या शतकाचे प्रारंभीं रचिली आहे. पेशवाईच्या अस्तानंतर लगेच लिहिलेलें त्या राजवटीचें हें जीवनचरित्र आकर्षक आहे.

हनुमानस्वामींच्या बखरीत (इ. स. १८१८) शिवाजी आणि रामदास यांच्या अंतरंगाचें अतिशय भव्य दर्शन होऊन दोघांची स्वभाववैशिष्टयेंहि

कळतात. लेखक जणुं काय त्या प्रसंगाचा चित्रपटच घेत आहे असें वाटतें. ही बखर प्रथम श. १७१५ मध्यें रचिली व श. १७४० त सुधारून वाढविली. 'बखर' या नांवाखालीं रामदासांचें हें विस्तृत चरित्रच आहे.

बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन याची हरिवंशाची बखर हरभट पटवर्धन यांच्या वंशांतील पटवर्धन सरदारांचा वृत्तांत इ. स. १८४२ मध्यें रचिली आहे.

ऐतिहासिक साधनें या दृष्टीनें बखरीची योग्यता पुष्कळ वेळां फारच कमी ठरते. लेखकाचे वैयक्तिक विकार, विचार बखरींत प्रभावी ठरल्याचें दिसतें. त्यामुळें सत्यासत्याची चिकित्सा केलेली नसते. परंतु वाङ्मयदृष्ट्या बखरींनीं मराठी गद्याचें एक गुणसंपन्न दालन उभारिलें आहे.

एकंदरींत पाहतां इ. १८१७ त पेशवाईची समाप्ति होईपर्यंतच्या स्वराज्य-आमदानींत "मराठी गद्याचा जो स्वरूपाविष्कार दिसतो तो जरी नीटस, रेखीव किंवा घोटीव नाहीं तथापि आहे तो जोरकस, भरदार, रसदार व इभ्रतदार असाच आहे असें कोणासहि अवलोकनातीं कळून येईल" ( म. ग. इं. अ. ९ )

## गद्याचा 'इंग्रजी' अवतार

**कथाः** पेशवाईनंतर इंग्रजी राज्यांत अपूर्व अशी घटना घडली ती म्हणजे सरकारनें शिक्षणाचा 'कारभार' करणें ही होय. शिक्षणासाठीं पुस्तकें हवीं होतीं. म्हणून या कालाच्या आरंभीं व पुढेंहि शालोपयोगी असेच बरेच ग्रंथ झाले. त्यांत कथाविभागांतहि पुष्कळ ग्रंथ झाले. यांतील पुष्कळसे ग्रंथ भाषांतरित आहेत. छापलेला असा पहिला मराठी लेख सिंहासनबत्तिशी ( १८१४ ) श्रीरामपुरास छापला गेला. तें वैजनाथ पंडितांनीं केलेलें भाषांतर होतें. महाराष्ट्रांतहि नीतिपर आणि मनोरंजक असे अनेक शालोपयोगी कथाप्रधान ग्रंथ झाले त्यांत स. का. छत्रे ( १७८८-१८३० ) यांचा बालमित्र भा. १ ( १८२८ ) अतिशय लोकप्रिय झाला. तो मूळच्या फ्रेंच ग्रंथांच्या इंग्रजी भाषांतराचें भाषांतर आहे. हितोपदेश, पंचतंत्र, सिंहासनबत्तिशी, इत्यादि संस्कृतांतील कथांचीं भाषांतरें झालीं.

प्रौढासाठींहि मनोरंजक कथांचीं भाषांतरें झालीं. त्यांत अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ( भाग ५ ) कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं ( इ. १८२४–७८ ) सांगितल्या. तो ग्रंथ भाषांतराचा एक उत्कृष्ट नमुना आहे. रासेलस ( १८७३ ) हा चिंतनपर ग्रंथ असूनहि भाषांतरामुळें कृष्णशास्त्र्यांनीं तो अतिशय वाचनीय केला आहे.

" पुष्कळ भाषांतरें होतील पण कृष्णशास्त्र्यांच्या रासेलससारखें भाषांतर आढळणें मुष्कील ! मुळांतला अभिप्राय मनांत उतरवून मग तो पुनः स्वतःचे डोक्यांतून मराठींत आपलासाच दिसेलसा उतरून त्याचा जुना वास बिलकूल घालवून, वाचकास सादर करण्याची हातोटी कृष्णशास्त्री यांस उत्तम साधली होती. " ( म. ग. इ. अ. ८३ )

पुराणांचे गद्यात्मक सुरस सारांश बखर नावानें प्रसिद्ध झाले. शेक्स्पीअरच्या नाटकांच्या लॅंबच्या ग्रंथांतील कथांचीं भाषांतरें झालीं. नारायणबोध ( १८६० ) नीतिदर्पण ( १८३७ ) मराठी भाषेंतील सुरस गोष्टी ( १८७० ) महाराष्ट्र भाषेंत मनोरंजक गोष्टी ( १८७०–७३ ) इत्यादि या काळांतले कथात्मक ग्रंथ हे स्वतंत्र आहेत.

कादंबरी :

मराठींतील पहिली ' नावल ' किंवा कादंबरी ' यात्रिक क्रमण ' हें पिलग्रिम्स प्रोग्रेसचें भाषांतर हरि केशवजी ( १८०४–५८ ) यांनीं केलें. ( १८४१ ) आणि कादंबरी विभागातहि भाषातरानेंच आरंभ झाला.

मराठींतील पहिली स्वतंत्र कादंबरी अशी यमुनापर्यटण ही होय. ती बाबा पदमजी ( १८३१–१९०६ ) यांनीं १८५७ मध्यें लिहिली. बाबा खिस्ती झाल्यानंतर त्यांनीं ही कादंबरी लिहिली. मराठींतील या पहिल्या स्वतंत्र कादंबरींत हिंदु विधवांची शोचनीय स्थिति वर्णिली आहे. तरी पुनर्विवाह हा त्यावर एकमेव उपाय नाहीं असें दाखवूनहि विधवा नायिकेला प्रभु येशूच्या कृपेनें शेवटीं एका खिस्ती माणसाशीं विवाह लावून सुखाचा मार्ग मोकळा करून दिला आहे. यापेक्षां खास मराठी अशी पहिली कादंबरी लक्ष्मणशास्त्री हळबे यांची मुक्तामाला ( १८६१ ) ही होय. नीतिमंतास

परमेश्वर सर्व संकटांतून मुक्त करतो व शेवटीं सुखी करतो हें दाखविण्या-करितां शास्त्रीबुवांनीं हा 'इतिहास' लिहिला.

मुक्तामालेनंतर मंजुघोषा ( १८६८ ) ( पृ. १६० ) ही कादंबरी रिसबुड यांनीं लिहिली. ती अद्भुत घटना, पल्लेदार वर्णनें, अनेक प्रकारची विसंगती इत्यादींनीं भरलेली आहे. मुक्तामालेशीं तिचें बरेंच साम्य प्रा. पोतदार यांनीं दाखविलें आहे. ( म. ग. इ. अ. ८१-८२ ) कादंबरी हा शब्द रिसबुडांनीच प्रथम योजिला असावा. मंजुघोषेच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात "आपण ज्यास इंग्रजींत नॉव्हेल्स किंवा संस्कृतांत कादंबरी असें म्हणतों असल्या ग्रंथाचें मूळ पाहिलें तर ज्या कुत्र्या-मांजराच्या गोष्टी आपण लहानपणापासून ऐकतों त्यातच आहे" अशी ही 'नावला' बद्दलची तत्कालीन कादंबरीकारांची कल्पना होती.

मुक्तामालेनंतर दोन वर्षांनीं मोरोबा कान्होबा विजयकर (१८१३-७१) यांनी घाशीराम कोतवाल ही कादंबरी लिहिली. ( १८६३ )

ही कादंबरी म्हणजे अंदाधुंदी व अशुद्ध नीतिमार्ग यांचा परिचय करून देण्यासाठीं 'मनोरंजनार्थ व उपदेशार्थ' लिहिलेल्या गोष्टी आहेत. या ग्रंथांत २८ गोष्टी आहेत. संवादांत तत्कालीन अनेक गोष्टींच्या माहितीबरोबर इतिहास, सृष्टिशास्त्र, वाङ्मय, इत्यादि विषय आले आहेत. हिंदूना नवें ज्ञान लाभावें व युरोपियनांस तद्देशीयांविषयीं माहिती व्हावी असा दुहेरी हेतु साधण्याचा लेखकाचा बेत होता असें प्रस्तावनेवरून दिसतें.

१८७१ मध्यें मोचनगड ही पहिली ऐतिहासिक कादंबरी रा. भि गुंजीकर ( १८४३-१९०१ ) यांनीं लिहिली. इतिहास आणि कल्पना यांचें मिश्रण करून आकर्षक प्रसंग आणि चित्तवेधक वर्णनांनीं कादंबरी सजविली आहे. ती स्कॉटच्या इव्हॅनव्होच्या धर्तीवर रचिली आहे.

या काळांतील आणखी एक उल्लेखनीय कादंबरी बाबाजी गोखले यांची राजा मदन ही होय ( १८६५ ). त्यांत इतर कादंबऱ्यांचे सर्व गुणावगुण आहेतच; परंतु दुःखपर्यवसायी अशी ही या काळांतील एकमेव कादंबरी होय.

समाजांतील अज्ञानमूलक चालीवर टीका करून कौटुंबिक कर्तव्यापेक्षां परोपकार श्रेष्ठ आहे हें पटविण्याचा गंभीर प्रयत्न के. ल. जोखेकर यांनीं ' विचित्रपुरी ' या कादंबरीनें ( १८७० ) केला. तिच्यांत बरेच हास्यास्पद प्रकार असले तरी कादंबरीचा एक नवीन प्रकार म्हणून तिचें त्या वेळीं स्वागत झालें ( अ. म. ग. पू. ७५ ).

या वेळच्या कादंबऱ्यात वर्णनें खच्चून भरलेलीं असत. पात्रें सद्गुणाचे वा दुर्गुणाचे अपरिवर्तनीय पुतळे असावयाचे. तसेंच सुखदुःखादिकांचे परिणाम नेहमीं अतिशयोक्त असावयाचे. कोणतेंहि दुःख मरणप्राय आणि आनंद स्वर्गतुल्य ! कालविपर्यासाची तर कमालच असावयाची. मंजुघोषेंत घड्याळें, विमानें, स्टुडिओ, आणि त्याच्या अगदीं उलट पुराणकालीन वस्तूंचीहि गर्दी आहे. हे दोष असूनहि लेखकाचा हेतु असा कीं, साहसानें अकल्याण होतें, मातृपितृ-आज्ञाभंग केल्यानें दुःख प्राप्त होतें, व सन्मार्ग हाच सुखाचा मार्ग हे पटवावें ! परंतु वाचकास मात्र असें वाटतें कीं, ही एखादी साधुवाण्याची सत्यनारायणाची कथाच म्हणाना; पण जरा अधिक मसालेदार व खमंग ! ( म. ग. इं. अ. ८१ ).

या स्वतंत्र प्रयत्नांखेरीज इंग्रजींतील अभिजात वाङ्मयाचीं भाषांतरें झालीं. त्यांत शेक्स्पीअर हा अग्रभागीं आहे. लॅम्ब्सच्या ग्रंथाधारेंच शेक्स्पीअरच्या नाट्यकथा मराठी वाचकांस लाभल्या. त्यांत मूळाबरहुकूम भाषांतराबरोबर रूपांतरेंहि होत. 'व्हेनिस'च्या व्यापाऱ्याचें 'उज्जनी'च्या व्यापाऱ्यांत रूपांतर करण्याचें कौशल्य स. प. पंडित यांनीं दाखविलें (१८६८ ).

रॉबिन्सन क्रूसोची चरित्रकथा रावजीशास्त्री गोडबोले यांनीं सांगितली ( १८७१ ). डीफो बरोबर स्कॉटचीहि ओळख ह. वि. बर्वे यांच्या इव्हॅनहोच्या भाषांतरानें झाली ( १८७४ ). इंग्रजींतील नाणावलेल्या कादंबऱ्यांपैकीं ही एकमेव कादंबरी या कालखंडांत अनुवादिली गेली अ. म. ग. पू. ६७ ).

हें सर्व कथावाङ्मय केवळ मनोरंजनासाठीं व बहुतांशीं मुलांसाठीं व अगदीं सामान्य माणसांसाठीं निर्माण झालें. भाषांतरासाठींसुद्धां डिकन्स,

थॅकरे, जार्ज इलियट यांच्याजवळ कोणी गेलेंच नाहीं. आणि या लेखनांनीं जें दिलें तेंहि अद्भुत वाटून संतुष्ट होण्याइतकीच वाचकवर्गाची कुवत होती.

या कालखंडाच्या शेवटीं १८७२ मध्येंच रावबहादुर का. बा. मराठे यांनीं नाटक व नावल याविषयीं निबंध लिहिला. त्यांत नावलाविषयीं ते म्हणतातः "आतांशीं नावलांची कीड फार झाली आहे ! लहान मुलेंबाळें देखील नावलें लिहून पैसे मिळवूं लागलीं आहेत." ( म. ग. इं. अ. ७७ ).

नाटक :

( तजावर येथील सरस्वति महालांतील नाटकामुळें आज मराठी नाटकांचा आरंभ बराच दूरवर शोधणें शक्य झालें आहे. हीं नाटकें १८ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील आहेत ) ( प्रा. म. ग. १४ ).

तंजावर येथें सरस्वति महालांत व्यंकोजीराजे यांच्या नंतरच्या ( इ. स. १६८५ ) राजांच्या नांवावर पांचपंचवीस नाटकें आहेत. तीं पौराणिक आहेत. तमाशा आणि नाटक यांच्यामधील अवस्था दाखविणारीं तामिळी नाट्याचा बराच परिणाम असलेलीं अशी तीं नाटकें काव्यदृष्ट्या सामान्य असलीं तरी ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं आहेत ( प्रा. म. ग. १५ ).

मराठी नाट्यवाङ्मयास चांगला आरंभ इंग्रजी अमदानींतच संस्कृत नाटकाच्या भाषांतरापासून झाला.

प्रबोधचंद्रोदय हें छापलेलें पहिलें मराठी नाटक ( १८५१ ) स. ब. अमरापुरकर आणि रावजी बापूशास्त्री बापट यांनीं श्रीकृष्णमिश्र पंडित यांच्या नाटकाचें भाषांतर होतें. वेदांताचें मानुषीकरण करून यांत नाट्य आणलें आहे. काम, क्रोध, इत्यादि षड्रिपु हे याच नांवानें पात्रें म्हणून नाटकांत वावरतात.

मराठी ज्ञानप्रसारक मासिकांतून ( १८५० ) भा. रा. पाळंदे ( १८३२–७४ ) यांनीं विक्रमोर्वशीय या नाटकाचें भाषांतर केलें.

"संस्कृत भाषेंतील प्रख्यात नाटककाराच्या कलाकृतींचें मराठींत भाषांतर करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय." ( अ. म. ग. पू. ९८ )

परशुराम तात्यानीं ( १७९९–१८७४ ) हें कार्य नंतर अतिशय वेगानें सुरू केलें. वेणीसंहार ( १८५७ ) उत्तररामचरित्र ( १८५९ ) शाकुंतल ( १८६१ ) मृच्छकटिक ( १८६२ ) नागानंद ( १८६५ ) आणि पार्वतीपरिणय ( १८७२ ) इतक्या नाटकांचीं भाषांतरें त्यांनी या कालखंडांत केलीं.

परशुराम तात्यांच्याप्रमाणें कृष्णशास्त्री राजवाडे ( १८२०–१९०० ) यानीं मालतीमाधव ( १८६१ ) मुद्राराक्षस ( १८६७ ) अभिज्ञान शाकुंतल ( १८६९ ) विक्रमोर्वशीय ( १८७४ ) यांचीं भाषांतरें केलीं.

जानकीपरिणय ( १८६५ ) मालविकाग्निमित्र ( १८६७ ) हीं भाषांतरें गणेशशास्त्री लेले ( १८२५–९८ ) यांनीं केलीं. या कालखंडांत अशा रीतीनें १८५१ ते १८७४ पर्यंत एकुण १८ संस्कृत नाटकांचीं भाषांतरें झालीं. या कार्यांत संस्कृत पंडितांनीं लक्ष घातल्यानें मराठी वाचकांस मुळांतील रसाचा आस्वाद भरपूर लाभला.

इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें या मानानें फारच कमी झालीं. म. गो. कोल्हटकर यांनीं या कार्यास अथेल्लोपासून आरंभ केला. ( १८६७ ) ज्युलियस सीझरचें विजयसिंग हें भाषातर ( इ. १८७२ ) काशीनाथ गोविंद नातू यांनीं केलें.

मराठींतील स्वतंत्र नाटकास आरंभ ऐतिहासिक नाटकापासून झाला. नवीन वळणाचें व पहिलें ऐतिहासिक नाटक थोरले माधवराव पेशवे हें वि. ज. कीर्तने ( १८४०–१८९१ ) यांनीं १८६१ मध्यें लिहिलें ५७ पानांत मुख्य पात्रांचें स्वभावदर्शन व शेवटीं कथानकाचें करुण-रसपर्यवसान हे अगदीं प्रगतिपर विशेष या नाटकांत आहेत. हें नाटक लिहितांना नाटककार केवळ २०।२१ वर्षांचा होता. कीर्तन्यांनीं १८६५ त जयपाळ या नाटकानें वास्तव स्वरूपाचें मराठींतलें पहिलें नाटक निर्माण केलें. त्यांत मानवी स्वभावाचें चित्र संसाराच्या माध्यमानें रेखाटलें आहे.

'थोरले माधवराव पेशवे' हें ४ अंकी २२ प्रवेशी नाटक आहे आणि हें ५७ पानांत बसवून हास्य व करुणरस त्यांत चांगले साधले आहेत. ऐतिहासिक सत्याचा अपलाप व अभाव हे दोष यात आहेत. रामशास्त्रीस भलतें महत्त्व दिलें आहे. तर गोपिकाबाईचा कांहें संबंध नाहीं! तथापि लहान वयांत केलेली स्वतंत्र परंतु रम्य कृति ही गोष्टहि मोठीच आहे. वस्तुस्थिति, मनुष्यस्वभाव हीं मनोरम आहेत. रमाबाईचें चित्र रम्य, यथारूप, कुलांगनास भूषणदायक असें वठलें आहे (म. ग. इं. अ. ७०). कीर्तने यांनी नाट्यक्षेत्रांत असा अभिनव आदर्श निर्माण केला.

कीर्तनें यांचें जयपाळ हें नाटक पांच अंकी ८५ पृष्ठांचें आहे. तें एका हिब्रू कथेवरून (जुना करार) सुचलें तरी एकंदर उठाव स्वतंत्र आहे. लेखकाची कुशलता व रसिकता यांचा प्रत्यय त्यांत येतो. पण लिहिण्यांत खोलपणापेक्षा उत्तानपणा अधिक आहे. (म. ग. इं. अ. ७१). शेवटच्या प्रवेशांत प्रासमय नामधारी कवींवर कोरडे ओढून घेतले आहेत!

(स्वतंत्र सामाजिक नाटकाचा आरंभ १८७१ मध्यें मनोरमा या नाटकानें झाला. तें म. बा. चितळे यांनी लिहिलें.) महाराष्ट्रात १८७०-पासून सनातनी–सुधारक रण सुरू झालें. त्याचे पडसाद या नाटकांत आहेत. सासुरवास, विवाहांतील लौकिक आचार, जरठकुमारीविवाह, गतभर्तृकेचें अनिवार्य अधःपतन, परदेशगमन, इत्यादि विषय या नाटकांत येऊन गेले आहेत. नाटकांतील 'चावट'पणाबद्दल बरीच टीका त्या वेळींच झाली, तरी भाषा व रचना या दृष्टीनें तें चांगलें वठलें आहे (म. ग. इं. अ. ७६).

"संवाद रेखीव व चटकदार, प्रवेशाची रचना चढत्या रसोत्कर्षाची इत्यादि कीर्तन्यांच्या रचनेंतील गुणविशेष त्यांची प्रतिभा नाट्यानुकूल होती हें निश्चितपणें दाखवितात. सांसारिक दृश्यें चटकदार रीतीनें दाखवून त्यांच्याद्वारां सामाजिक ऊहापोह करण्याची जी रीत नाटककारानें (मनोरमा) अवलंबिली आहे, ती आजतागायत अमलांत असलेली आपल्याला दिसेल." (प्रा. श्री. ना. बनहट्टी. प्रदक्षिणा १६५.).

या वेळीं गाजलेलें आणखी एक नाटक प्रबोधविद्युत् किंवा स्वैरसकेशा

हें र. शं. अभ्यंकर यांनीं लिहिलें ( १८७१ ). त्यांत जरठकुमारी विवाह, बालवैधव्य, इत्यादि तत्कालीन ' गरम ' विषयांवर बरेंच लिहिलें आहे.

'नीलदर्पण' हें मो. वि बाळवेकर यांचें नाटक ( १८७२ ) इंग्रजीचें भाषांतर आहे. त्यांत निळीच्या मळ्यांतील मजुरांच्या स्थितीचें चित्र वठाविलें आहे. अर्धवट राजकीय प्रश्नावरील नाटक ( प्रदक्षिणा १६५ ) म्हणून तें उल्लेखनीय आहे.

या कालखंडांत पौराणिक अशीं २२।२३ नाटकें झालीं.

का. बा. मराठे यांनीं १८७२ मध्यें नावल व नाटक यांविषयीं लिहिलेल्या निबंधात तत्कालीन कादंबऱ्या, नाटकें यावर टीका केली आहे. ती एका समकालीनाचा अभिप्राय म्हणून उद्बोधक आहे. ' मनोरमा व स्वैरकेशा नाटकांत हलकटपणाचा व दुष्ट वर्तनाचा कडेलोट केला आहे. नीच, कपटी व्यभिचारी लोकांची एक मालिकाच लावली आहे ' असे या निबंधकाराचे उद्गार आहेत.

**नाट्यप्रयोग :**

संस्कृत नाटकाविषयीं तत्कालीन विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांना अतिशय कौतुक वाटत असे. कॉलेजांत इंग्रजी नाटकांचे तर प्रयोग होतच होते परंतु मुंबईची ' कालिदास एलफिन्स्टन सोसायटी ' ह्या विद्यार्थ्यांच्या नाटक संस्थेनें शाकुंतलकालीन वेषभूषा व पार्श्वभूमि निर्माण करून शाकुंतलाचाहि प्रयोग केला. पण तो मात्र इंग्रजी शाकुंतलाचा ! पुण्यास शेक्स्पिअरच्या नाटकाबरोबर उत्तररामचरित, वेणीसंहार, मृच्छकटिक, मुद्राराक्षस या नाटकांचे संस्कृतांतून प्रयोग होत आणि निबंधमालाकार चिपळूणकर, यांच्यासारखी त्या वेळीं विद्यार्थी असलेली शास्त्रीघराण्यांतली मंडळी त्यांत भाग घेऊन ते प्रयोग बेमालूम वठवीत !

'दृश्य,' नाटकें: प्रयोगप्रधान नाटकाचा विचार केल्यास मराठी दृश्य नाटकाचा आरंभ तंजावरांत शाहू महाराजांच्या वेळीं झाला. परंतु त्या वेळीं त्याची प्रगति झाली नाहीं. वस्तुतः पोवाडे आणि लावण्या यांचा उगम ज्याप्रमाणें धार्मिक गोंधळांत आढळतो तसाच नाटकांचा उगम ललिता-

सारख्या धार्मिक विधींत आढळतो. मराठींत पहिलीं नाटकें हीं पौराणिकेंच आहेत. आज उपलब्ध असलेलें ' लक्ष्मीनारायण कल्याण ' हें पहिलें नाटक सर्वस्वीं पौराणिक आहे. परंतु आरंभ झाला तरी तो त्या वेळीं तेथेंच थांबला आणि १८४३ पासून विष्णुदास भावे (१८१९–१९०१) यांनीं सीतास्वयंवरानें (१८४३) मराठी नाट्यास 'पुन्हा' आरंभ केला. तें नाटक कर्नाटकी दशावतारी खेळाच्या धर्तीवर रचिलें आहे. श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन ( सांगलीकर ) यांच्या इच्छेनुसार हें घडलें. आणि अशीं दहा-बारा नाटकें श्रीमंतांना भावे यांनी करून दाखविलीं व नंतर असे सुमारें पन्नास प्रयोग बसविले. मग भावे यांनीं कंपनी काढून मुंबईपुण्याचे दौरे सुरू केले. नाटकें व नाटकमंडळी हीं दोन्ही मराठींत एकाच वेळीं जन्मास आली व मराठी आद्य नाटककार हा स्वतः नट होता ही गोष्ट महत्त्वाची आहे ( म. सा. स. ९४ ). याप्रमाणें एका रसिक श्रीमंताच्या आश्रयानें मराठी दृश्य नाटकाचा जन्म झाला. आद्यनाटककार स्वतः गायक होता व वाद्यकारहि होता हीहि गोष्ट उल्लेखनीय आहे. ' भावे यांच्या नाटकांचें महत्त्व प्रयोगापुरतेंच आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें त्यांची रचना केलेली नव्हती ' ( अ. म ग. पू. ९४ ).

भावे यांच्यानंतर महाराष्ट्रभर ही मंडळ्यांची टूम निघाली आणि मंडळ्यांसाठीं भराभर नाटकेंहि निर्माण झालीं. त्यांत सीतास्वयंवर सुभद्राहरण, रुक्मिणीहरण, चंद्रहास, गोपीचंद, वत्सलाहरण, इत्यादि पौराणिक परंतु नाट्यगर्भ कथानकेंच आहेत. नटी, सूत्रधार, राक्षस, विदूषक ही मंडळी प्रेक्षकास हमखास हंसावयास लावीत. कथानक आणि पात्रें हीं नित्य परिचयाचींच होतीं

कादंबरीच्या मानानें पाहिल्यास या काळांत नाट्यवाङ्मयांत कांहीं महत्त्वाचे प्रयोग सुरू झालेले दिसतात. विशेषतः तरुण पिढीच्या मनांत यासंबंधीं विशेष उत्साह संचारला होता हे कीर्तने, चितळे, इत्यादि तरुण लेखकांवरून दिसून येतें.

चरित्र :

चरित्रलेखनाचीं सूत्रें अर्वाचीन काळांत मुख्यतः सरकारकडूनच

हलविलीं जात होतीं. बक्षिसासाठीं, सरकारच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष इच्छेनुसार अशींच पुष्कळशीं चरित्रें लिहिलीं गेली. तीं अर्थात् पुष्कळशीं परकीयांचीं होती. १८१६ मध्यें बैजनाथ पंडित यानें राजा प्रतापादित्यचरित्र लिहिलें. तें या काळातील पहिलें चरित्र. हें भाषांतर आहे. या काळांत अतिशय चांगलें चरित्र म्हणजे कृष्णशास्त्री चिपळुणकरांनीं (१८२४–७८) लिहिलेलें सॉक्रेटिस चरित्र ( १८५२ ) होय.

विष्णुशास्त्री पंडितांनीं ( १८२७–७६ ) नाना फडनवीस यांची संक्षिप्त बखर (चरित्र) लिहिली (१८५९). ती म्याकडोनाल्डच्या बखरीचा सारांश आहे. भा. ह. भागवत यानी राम मोहन रायचें चरित्र ( १८५८ ) कलकत्ता रिव्ह्यूवरून लिहिलें आहे. जनार्दन रामचंद्रजींनीं कविचरित्र ( १८६० ) या ग्रंथांत सस्कृत, प्राकृत, इंग्रजी पुस्तकांच्या आधारें हिंदुस्तानांतील प्राचीन व अर्वाचीन कवि व ग्रंथकार यांचा इतिहास दिला; पण तो नुसता नांवापुरता इतिहास आहे. वस्तुतः तें दंतकथांतील भारुडच आहे. ( अ. म ग. पू. २०३ )

विष्णुबुवा ब्रह्मचारी याचें चरित्र रा. पां. आजरेकर यांनीं लिहिलें ( १८७३ ) त्यांत विष्णुबुवांनीं स्वतः सांगितलेली माहिती आली आहे.

याखेरीज कोलंबस, लूथर, कॅ. कुक, महंमद, कॅथेराइन, बेंजामिन फ्रँकलिन, जॉर्ज वाशिंग्टन, रॉबर्ट क्लैव्ह, पीटर धि ग्रेट, इत्यादिकांची चरित्रें झालीं.

**आत्मचरित्र** : या कालखंडांत तीन चागलीं आत्मचरित्रें आढळतात. त्यांपैकीं अतिशय प्रसिद्ध असें आधुनिक ‘ पाणिनि ’, विख्यात व्याकरणकर्ते दादोबा पांडुरंग यांचें आहे. तें १८७०–७१ च्या सुमारास लिहिलें आहे. तें अतिशय सुरस व मनोहारी आहे (म. ग. इं. अ. ४३). दादोबांच्या वैयक्तिक जीवनाप्रमाणेंच तत्कालीन सामाजिक जीवनावरहि पुष्कळ प्रकाश पडतो इतकें तें मनमोकळेपणानें व चौकसपणानें लिहिलें आहे. दुसरें आत्मचरित्र 'विष्णुबुवा ब्रह्मचारी ( विष्णु भिकाजी गोखले ) यांचें होय. त्यांनीं वेदोक्तधर्मप्रकाश या आपल्या ग्रंथाच्या २५ व्या प्रकरणांत हें आत्मवृत्त लिहिलें आहे ( इ. स. १८५९ ). तिसरें आत्मचरित्र बाबा

पदमजी यांचें. तें अरुणोदय या नांवानें प्रसिद्ध झालें. तें बाबानीं ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर लिहिलें आहे. बाबांनी १८५४ मध्यें वयाच्या ३३ व्या वर्षी धर्मांतर केलें. तत्कालीन उच्चवर्णीयां-बद्दल व हिंदुधर्माबद्दल आपल्याला उद्वेग कसा येत गेला व त्याच्या उलट ख्रिस्ती धर्माकडे आपण कसे आकर्षिले गेलों याचा वृत्तांत बाबांनीं सांगितला आहे. लेखकाची वृत्ति व भोंवतालचें समाजजीवन, मिशनऱ्यांचें कौशल्य व पहिल्या सुशिक्षितांची उथळ मनोवृत्ति, इत्यादि गोष्टींविषयीं अतिशय उद्बोधक माहिती अरुणोदयांत आहे. तिन्ही आत्मवृत्तें अगदीं साध्या भाषेंत सरळ लिहिली आहेत. त्यामुळें लेखकाच्या आंतरजीवनावर तीं चांगला प्रकाश पाडतात.

## धार्मिक, तात्त्विक वाङ्मय

छापण्याच्या कलेच्या अनेक परिणामांपैकीं एक क्रांतिकारक परिणाम म्हणजे धर्मज्ञानाचीं कपाटे सर्वांना खुलीं झालीं. या कालखंडांत मराठी वाङ्मयांत तेंच कार्य विशेषतः झालेलें दिसतें. वेदविषक वाङ्मयांत पहिला ग्रंथ छापण्याचें कार्य एका ख्रिस्ती धर्मगुरूनें केलें. रेव्ह. स्टिव्हन्सन यानें १८३२ त 'त्रिविद्यात्रिगुणात्मिका' हें लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत ऋग्वेदाच्या कांहीं सूत्रांचें मुळासह सुबोध भाषांतर दिलें आहे.

हिंदुधर्मग्रंथांची चिकित्सा करणारीं फक्त दोनच पुस्तकें झालीं. तीं म्हणजे पुणें पाठशाळेचा संस्कृत भाषेचे मुख्य गुरु मार्तिन हॉग यांचीं दोन व्याख्यानें होत. तीं १८६३ त पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं.

धर्मासंबंधीं क्रान्तिकारक असा स्वतंत्र ग्रंथ वेदोक्तधर्मप्रकाश (१८५९) हा विष्णुबुवा ब्रह्मचारी ( १८२५-७१ ) यांचा होय. विष्णुबुवा या काळांतले मोठे जबरदस्त गृहस्थ होऊन गेले. सनातनी वर्गास धक्के देत आपलीं मतें त्यांनीं मोठ्या आवेशानें मांडलीं. सनातनी व सुधारक यांच्यापेक्षा निराळाच एक मार्ग त्यांनीं काढला. समाजसुधारणांतील तत्त्वें वेदोक्त आहेत हें दाखविण्याचा तो मार्ग होय. वेदांच्या आधारें पण त्यांनीं जवळ जवळ स्वतंत्र अशी विचारप्रणाली

सिद्ध केली. "स्वतंत्र विचाराचा एवढा मोठा मराठी ग्रंथ त्या वेळीं दुसरा नव्हता. वेदोक्तधर्म म्हणून त्यांनीं स्वतःचाच एक नवीन धर्म प्रतिपादिला." ( म. ग. इं. अ. ९१ )

पुराणें, रामायण, महाभारत, इ. धर्मग्रंथांच्या सटीक भाषांतरास या काळांत आरंभ झाला. उदा. धर्मसिंधु मराठींत उपलब्ध झाला (१८७४).

विदुरनीति ( १८२३ ), नारदनीति ( १८५८ ), वृद्धचाणाक्य ( १८४७ ), इत्यादि राजनैतिक प्राचीन ग्रंथ प्रकाशांत आले.

मिरजकर पटवर्धनांनी छापील गीता वांटण्यास १८०५ मध्येंच आरंभ केला होता ( म. ग. इं. अ. परिशिष्ट पृ. १ ). गीता गद्यरूपांत प्रसिद्ध झाली ( भावचंद्रिका १८३९ ). अन्वयार्थ व मराठी अर्थ यांसह पदबोधिनी गीता ( १८५३ ) ही प्रसिद्ध झाली.

हिंदुधर्माबरोबर जगातील अनेक तत्त्ववेत्त्यांचीं मतें व सिद्धांत संकलित केलेला एक ग्रंथ रे. स्टिव्हन्सन यांनीं प्रसिद्ध केला ( १८५२ ).

इतिहासः—

इतिहासाचें संशोधन व संकलन हीं कामें इ. स. १८७४ पर्यंत सुरूहि झालेलीं नव्हती. इतिहासग्रंथाचीं साधनें कशीं उपयोगांत आणावींत हें सर्वस्वीं अज्ञातच होतें. अशा स्थितीत परकीयांनींच आमचे इतिहास लिहिले आणि त्यांचींच पारायणें शाळेंत व शाळेबाहेर होत राहिलीं. ग्रँट डफच्या बखरीचें भाषांतर १८२९ त कॅ. केपन यानें केलें. नंतर ११ वर्षांनीं या बखरीच्या सारांशाचें भाषांतर ( महाराष्ट्र देशाचें वर्णन ) कुशाबा लिमये यांनीं केलें ( १८४० ).

१८६६ मध्यें वि. गो. भिडे यांनीं शिवाजी महाराजांचा वंश व प्रतिनिधि आणि अष्टप्रधान यांचा इतिहास लिहिला. इतर ऐतिहासिक ग्रंथांच्या आधारें ऐतिहासिक ग्रंथ रचण्याचा तो पहिला प्रयत्न होय.

१८६७ सालीं इतिहासावर स्वतंत्र विचार करण्यास आरंभ झाला. नी. ज. कीर्तने या एका कॉलेज विद्यार्थ्यानें ग्रँट डफच्या बखरीवर टीकात्मक निबंध लिहिला. तो खऱ्या इतिहासलेखनाचा अर्वाचीन काळांतील आरंभ होय.

परदेशच्या इतिहासाची माहिती लहानमोठ्या भाषांतरित ग्रंथाच्या द्वारा मराठी वाचकांस मिळूं लागली. युद्धाच्या इतिहासांत शि. म. बाव्रस यांचा फ्रेंच व जर्मन लोकांच्या लढायांचा इतिहास (१८७४) उल्लेखनीय आहे. लेखक स्वतः सॅपर्स-मायनर्स फलटणीचा शिक्षक असल्यानें युद्धग्रस्त देशांतील माहितीबरोबर शस्त्रास्त्रांचीहि माहिती दिली आहे.

हिंदुस्थानच्या इतिहासावर २२ पुस्तकें या कालखंडांत झाली. त्यांत मरे, एलफिन्स्टन, मॉरिस यांच्या ग्रंथांचीं भाषांतरें बरीच आहेत. इंग्रजी ग्रंथाचा सारांश व त्याच्या व इतरांच्या आधारें लिहिलेले पण शालोपयोगी हेतूनें लिहिलेलेच इतिहास पुष्कळ आहेत. १८५७ सारखी भव्य घटना पण तीवर दोनच पुस्तकें आहेत. तीहि परतंत्र अशी. १८५७ च्या बंडावर ख. वा. फडके यांनी लिहिलेल्या ग्रथांत (१८६०) बंडाविषयींच्या तत्कालीन प्रकाशित माहितीचें सार आहे. १८७४ त वि. कों. ओकांनीं लिहिलेल्या इतिहासांत बंडाविषयींच्या भ्रामक समजुती दूर करण्याचा प्रयत्न आहे. ५७ची घटना इंग्रजांच्याच दृष्टिकोनांतून सर्वजण पहात होते.

**प्रवासवर्णन, भूगोल** इ०: शामराव मोरोजी याचा काशीप्रकाश (१८५२) हा अर्वाचीन पद्धतीचा सर्वांत जुना ग्रंथ होय. यानंतर मेजर कॅंडीचें शालोपयोगी हिंदुस्थान वर्णन (१८६०) प्रसिद्ध झालें. हा हिंदुस्थानचा पहिलाच भूगोल होय (म. सा. स. १३०). जिल्हे व प्रांत यांचीहि भौगोलिक माहिती नंतर संकलित होऊं लागली. शहरावर वर्णनात्मक ग्रंथ झाले. त्यांत गोविंद नारायण यांचें मुंबई वर्णन (१८६३) हें अतिशय परिश्रमपूर्वक लिहिलेलें, सर्वांत जुनें, मोटें व माहितीच्या दृष्टीनें परिपूर्ण असें आहे. मुंबईनंतर पुणें आलें. ना. वि. जोशी यांनीं पुणें वर्णनात (१८६८) पुण्याची 'सर्व' माहिती दिली आहे. स्थलवर्णनांत हळू हळू बरेच लेखक मन घालूं लागले. इंग्लंडांतील प्रवास (१८६७) हें कर्सनदासच्या गुजराथी ग्रंथाचें भाषांतर प्रसिद्ध झालें व त्यामुळें इंग्लंड देशाची माहिती प्रवासवर्णनाच्या रूपानें प्रथमच प्रसिद्ध झाली.

**शास्त्रीय ग्रंथ** : या कालांतील शास्त्रीय ग्रंथ हा पाश्चात्त्य विद्येचा प्रत्यक्ष परिणामच होय. संस्कृतांतील शास्त्रीय ग्रंथांची भाषांतरें झालीं (उदा० ज्योतिपरत्न, गार्गाचार्य प्रश्नावलि, जातकालंकार हे ग्रंथ भास्कर जनार्दन भट्ट यांनीं अनुवादिले). परंतु मुख्यतः शालेय पुस्तकेंच जास्त झालीं. या शालोपयोगी ग्रंथनिर्मितीस केरुनाना छत्रे, ज. बा. मोडक, यासारखीं अधिकारी माणसं सिद्ध झालीं. त्यामुळें त्या लहान ग्रंथांनाहि अतिशय महत्त्व प्राप्त झालें.

शालोपयोगी ग्रंथांबरोबर नव्या ज्ञानाच्या साहाय्यानें आपल्या प्राचीन ज्ञानाची चिकित्सा करण्याचा शास्त्रीय प्रगतीस अत्यंत उपकारक असा उपक्रम के. ल. छत्रे, ज. बा. मोडक, बा. प्र. मोडक, नारायणशास्त्री जोशी, बाळशास्त्री जांभेकर इत्यादींनीं केला.

१८४७ पर्यंत शास्त्रीय पुस्तकें हीं शालोपयोगी व इंग्रजी पुस्तकाच्या आधारें लिहिली गेली. या कामीं कॅ. जर्व्हिस, डॉ. मॅक्लेनन याच्याशिवाय बाळशास्त्री जांभेकर यांनीं बरेंच काम केलें. १८४७ नंतर आगगाड्या (कृष्णशास्त्री भाटवडेकर) व यंत्रशास्त्र (गो. गं. फडके) हीं दोन पुस्तकें स्वतंत्रपणें लिहिलीं जाऊन स्वतंत्र शास्त्रीय लेखनास आरंभ झाला. त्यानंतर भाटवडेकरानी लिहिलेलें माधवनिदान, त्र्यंबकी, वैद्यजीवन हे ग्रंथ संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें आहेत. कृष्णशास्त्री गोडबोले यांचें ज्योतिषशास्त्र (इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर) प्रसिद्ध झालें.

(१८५७ ते १८६४ या काळात झालेल्या स्वतंत्र शास्त्रीय ग्रथांत रसायन, वैद्यक, शारीरशास्त्र, विद्युत्प्रकाशलेखन, यंत्रशास्त्र, भूवर्णन या विषयांवर ग्रंथ झाले. प्रो. केरोपंत छत्रे यांनी ग्रहसाधनाचीं कोष्टकें तयार करून संशोधनाचा अभिनंदनीय उपक्रम केला. तत्कालीन प्रचलित असलेल्या बहुतेक शास्त्रीय विषयांवर स्वतंत्र ग्रंथ या कालखंडांत निर्माण झाले, ही एक महत्त्वाची गोष्ट आहे.) पाश्चात्त्य शिक्षणास आरंभ झाल्यावर नवे शास्त्रीय विषय आपल्या लेखकांनी अल्पकाळांत आत्मसात् केले, इतकेंच नव्हे तर त्यावर संशोधनात्मक व स्वतंत्र असें वाङ्मयहि निर्माण केलें. शास्त्रीय लेखनासाठी मराठी भाषा समर्थ आहे हें त्यांनीं सिद्ध करून

दाखविलें. इंग्रजी ग्रंथांच्या भाषांतराबरोबर संस्कृतांतील शास्त्रीय ग्रंथांचींहि भाषांतरें झालीं आणि त्यांतील ज्ञानाची शास्त्रीय चिकित्साहि होऊं लागली. आपल्या प्राचीन शास्त्रीय ज्ञानाचा जीर्णोद्धार करण्याचें कार्य नवशास्त्रप्रवीण शास्त्र्यांनीं केलें.

त्या काळीं ( १८६४–१८९४ ) इंग्रजी वैद्यकग्रंथाची जेवढीं भाषांतरें झाली त्यांच्या दुप्पट भाषांतरें संस्कृतांतून झालीं होतीं (प्रदक्षिणा ६३).

नियतकालिकांनीं शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीस व प्रसारासहि साहाय्य केलें. १८०८ ते १८५७ या काळांतील तेरा मासिकांपैकीं तीन केवळ शास्त्रीय विषयास वाहिलेलीं होतीं. त्यांपैकीं ज्ञानप्रसारक आणि १८६७ सालीं त्यांचेंच रूपांतर असें विविधज्ञानविस्तार मासिक, तसेंच बाळशास्त्री जांभेकर यांचें दिग्दर्शन या नियतकालिकांत शास्त्रीय विषयावर अतिशय सुबोध लेख येत असत. त्यांतून नव्या शास्त्रांची मराठी परिभाषाहि तयार झाली.

व्याकरण : मराठी शिकविण्यास आरंभ झाल्यावर व्याकरणाची उणीव भासूं लागली. १८३६ त बाळशास्त्री जांभेकर व गंगाधर शास्त्री फडके ची व्याकरणें प्रसिद्ध झालीं आणि मराठी व्याकरणाचा आरंभ झाला. परंतु हेहि प्रयत्न अगदी बालबोध होते. पहिला प्रौढ प्रयत्न दादोबांनीं केला. १८३६ मध्यें त्यांचें मराठी भाषेचें व्याकरण हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्या वेळीं ते केवळ बावीस वर्षांचे होते. १८५० मध्यें त्यांनी पहिल्या आवृत्तींत सुधारणा करून व भर करून प्रचंड ग्रंथ निर्माण केला आणि आपलें नांव अविस्मरणीय केलें.

संस्कृत व प्राकृत भाषांशीं मराठीचा संबंध दाखविणारें मराठी भाषेचें नवीन व्याकरण कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं १८६७ त तयार केलें.

कोश : एल्फिन्स्टननें मराठी कोश तयार करण्याचें कार्य बॉ. ने. ए. सोसायटींतील पंडितांवर सोपविलें. त्याप्रमाणें जगन्नाथशास्त्री क्रमवंत बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, रामचंद्र शास्त्री जानवकर, सखाराम जोशी, दाजी शास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले यांनीं महाराष्ट्र भाषेचा कोश तयार केला ( १८२९ ). 'शास्त्री मंडळी केवळ

युरोपियन पंडितांच्या सांगण्याप्रमाणें त्यांना मदत करीत होती' ( म. श. को. १ प्र. ३६ ).

या कालखंडांतील कोशकार्यांत रघुनाथ भास्कर गोडबोले यांचा हंसकोश ( १८६३ ) हें एक अपूर्व कार्य झालें. प्राचीन मराठी कवींच्या काव्यांतील कठिण शब्दांचा हा कोश आहे. एकूण ७ हजार शब्द या कोशांत आहेत. "अलीकडचें संशोधनाचें युग सुरू होण्यापूर्वीच्या काळांत एवढा शोध एक लोकहितवादीशिवाय कोणी केला असें वाटत नाहीं" ( म. ग. इं. अ. १०७ ).

मराठी बरोबर इंग्रजी भाषेचींहि व्याकरणें मराठींत येऊं लागलीं. दादोबांनीं इग्रजी व्याकरणाची मूळपीठिका १८६३ मध्यें सांगितली. मोल्सवर्थ-केनेडी कोशानंतर मराठी-इंग्रजी, इंग्रजी-मराठी, संस्कृत-मराठी असे कोश झाले. कोणत्याहि नव्या कार्याचा प्रस्ताव झाल्यावर त्या कार्यक्षेत्रांत पुढें होऊन काम करण्याचा उत्साह याहि क्षेत्रांत महाराष्ट्र पंडितांनीं व इतरांनीं दाखविला.

**निबंध :**

मिशनरी लोकांचें आक्रमण आणि समाजसुधारक व त्यांचे विरोधक यामुळें या कालखंडांत सामाजिक बाबतींत अतिशय वादप्रसंग उद्भवले. त्या निमित्तानेंच बरेंचसें वाङ्मय निर्माण झालें. मताचा प्रचार करण्याच्या कामीं वृत्तपत्र हेंच मुख्य माध्यम होतें. त्यामुळें सामाजिक विषयांवरील पुष्कळसें वाङ्मय वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होई. ग्रंथरूपानें प्रसिद्ध झालेल्या या कालखंडातील वाङ्मयांत केवळ विधवाविवाहावर लहानमोठी मिळून १५ पुस्तकें झाली. जातिभेदावर ४, परदेशगमनावर १, बालविवाहावर १, स्त्रीशिक्षणावर ३ अशी सामाजिक ग्रंथांची वर्गवारी होते.

विधवाविवाहावर अनुकूल अशा ग्रंथात दादोबा पांडुरंग, विष्णुशास्त्री पंडित यांचें लेखन विशेष विचारप्रवर्तक आहे. विष्णुशास्त्री पंडित यानीं ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या पुनर्विवाह ग्रथाचें मराठींत भाषांतर केलें ( १८६५ ). १८७० मध्यें त्यांनीं या विषयावर दिलेल्या चार व्याख्यानांचें पुस्तक काढलें.

दादोबा पांडुरंग यांचा विधवाश्रुमार्जन हा संस्कृत निबंध मराठी सारांशासह १८५७ मध्यें प्रसिद्ध झाला. विधवाविवाहाचें निरनिराळ्या ग्रंथांच्या आधारें समर्थन करणें, त्याबरोबर विधवांच्या दुःखाचें अत्यंत तळमळीनें चित्रण करून विरोधकाना पाझर फोडणें, असे मतपरिवर्तनाचे दोन्ही मार्ग या ग्रंथांतून अवलंबिले आहेत हें वाङ्मय बुद्धिवादी व भावपूर्ण असें झालें आहे. त्यांत उपहासाचेंहि तीव्र हत्यार उपसलेलें आहे.

विधवाविवाहविरोधकांकडून लेखन झालें त्यांत बाळकृष्ण लक्ष्मण बापट, यांचा विधवाविवाहखंडन हा ग्रंथ विशेष स्वरूपाचा आहे ( १८६५ ). उभयपक्षीं उदासीन राहून हा ग्रंथ लिहिला आहे. परंतु सुधारकांनीं शास्त्रांचा चुकीचा अर्थ लावून आधार घेतले आहेत हेंहि ग्रंथांत दाखविलें आहे. ‘ शास्त्रीय ’ वादपद्धतीची ही एक चुणूक आहे. शास्त्राची ओढाताण न करतां इतर शास्त्राविरुद्ध चालीप्रमाणें हीहि रूढ व्हावी असा मार्ग सुचविला आहे.

उच्च वर्णीयांनीं ज्यांची उपेक्षा केली त्या अशिक्षित, भाबड्या लोकाच्या ठिकाणीं स्वत्वाच्या हक्काची जागृति करण्यासाटीं जोतीबा फुले ( १८२८-१८९० ) यांनीं लेखणी हातांत घेतली होती. परंतु त्या कार्याचाच एक भाग म्हणून समाजांतील ब्राह्मणवर्गाचें, उच्चवर्णीयाचें वजन नाहींसें करणें, त्यांच्या आचारविचारभ्रष्टतेवर अतिशय त्वेषानें हल्ले करणें, त्यांना इतराच्यापुढें अगदीं हास्यास्पद करून सोडणें, हें विध्वंसक कार्यच जोतीबांनीं आपल्या लेखणीनें विशेषतः केलें. त्यांच्या त्वेषांत दीनोद्धाराच्या तळमळीचें तेज आहे, यांत शंका नाहीं; परंतु विरोधकांचें मतपरिवर्तन त्यामुळें झालें नाही. उलट त्यांना चेतविण्याचाच प्रकार झाला. विरोधाचें वातावरण आज शांत झालें आहे. जोतीबांच्या लेखनांतील तळमळ, आवेग आज जास्त स्पष्टपणें दिसून येतात. त्यांतील वाङ्मयीन गुणांचा अभाव त्यांच्या तळमळीनें अनेक पटीनें भरून आला आहे. या कालखंडाच्या शेवटीं जोतीबांनीं सत्यशोधक समाज स्थापन केला ( १८७३ ).

या कालखंडांत निबंधात्मक असें जें वाङ्मय झालें तें बहुतेक नियत-

कालिकांतून येत गेलें. वृत्तपत्रें व मासिकें हीं त्या वेळीं प्रामुख्यानें मतप्रचार व ज्ञानप्रसार यांचींच साधनें होतीं. यांखेरीज निबंधाचीं लहानसहान पुस्तकें प्रसिद्ध होत. या वेळच्या निबंधलेखकांत बोधप्रधान व जागृतिप्रधान असे दोन वर्ग आढळतात. एक गुरुच्या भूमिकेवरून इतरजनांस ज्ञान देणारा वर्ग होता. आपल्याला लाभलेलें ज्ञान आपल्या अज्ञ देशबांधवांस व्हावें अशा इच्छेनें मुख्यतः इंग्रजी ग्रंथांच्या आधारें त्याचें निबंधलेखन झालें. दुसरा वर्ग स्वतःच्या विशिष्ट मतप्रणालीचें विवेचन करण्यासाठीं, इतरांचे मतपरिवर्तन करण्यासाठीं, लेखन करणारांचा. या दुसऱ्या वर्गातील लेखकांनीहि शुद्ध ज्ञानप्रसारासाठीं कांहीं लेखन केलें. परंतु त्यांचा लेखनाच्या मुख्य हेतु मतपरिवर्तन, मतप्रचार हा होय.

बोधप्रधान निबंधलेखनास आरंभ मिशनऱ्यांनीं केला. कौटुंबिक जीवनासंबंधी प्रौढांस व मुलांस उपदेश करणारी लहान लहान पुस्तकें आरंभी प्रसिद्ध झाली. एतद्देशीयांतील दोषांचेंहि आविष्करण मिशनरी लेखकलेखिका ' सौम्य ' शब्दांत करीत. १८३४ मध्यें मुंबईस टेम्परन्स सोसायटी स्थापन झाली आणि मद्यपाननिषेधासंबंधीचें वाङ्मय १८४६ पासून प्रसिद्ध होऊं लागलें. मद्यपानाप्रमाणेंच कर्जबाजारीपणा, व्यभिचार, इत्यादि दुर्गुणांचें निकारण करण्यासाठीं निबंधात्मक पुस्तकें निघालीं. यापेक्षां व्यापक दृष्टीनें विचार करणारेहि निबंध लिहिले गेले.( 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढें काय परिणाम होणार याविषयीं विचार ' रामकृष्ण विश्वनाथ यांनी १८४३ मध्यें निबंधरूपानें मांडले. स्पष्ट, सडेतोड आणि स्वदेशाभिमानानें ओतप्रोत भरलेला पूर्णपणें स्वतंत्र असा ' मराठी भाषेंतला हा पहिलाच निबंध होय ') ( अ. म. ग. पू. १४० ). परकीय अमलामुळें देशांत दारिद्र्य वाढत आहे, कर्तृत्व असूनहि कुचंबणा होत आहे, उद्योगधंदे बुडत आहेत हें स्पष्टपणें दाखवून देशाभिमानानें संघटना करणें हा एकमेव उपाय सांगितला आहे. समाईक भांडवलानें, यांत्रिक साहाय्यानें, व्यापार करण्याचा मार्ग १८४३ सालीं या पुस्तकानें देशापुढें मांडला आहे ! ' कामगार लोकांशीं संभा-

षण ' हा एक निबंध १८५३ सालीं प्रसिद्ध झाला ' मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोकांना उपदेश' भ. वि. कानविंदे यांनीं १८५८ मध्यें केला. त्यांत सुशिक्षितांकडून होत असलेल्या मातृभाषेच्या अनास्थेबद्दल सांगितलें आहे. लोकसुधारणोपदेश ( १८६६ ), आपलें कर्तव्यकर्म कोणतें ( १८७४ ), इत्यादि निबंध पाहिले कीं, तत्कालीन परिस्थितीच्या पर्यवसनाची बरीच स्पष्ट जाणीव लेखकांस तेव्हांपासून होऊं लागल्याचें दिसतें. आपल्या अवनतीस आपणच जबाबदार आहोंत. परदेशी व्यापारास आपणच उत्तेजन देतों हें त्या वेळपासून सांगण्यात येत आहे.

सामाजिक जीवनाचा विचार करतांना राजकारणाचा विचार होतच होता. प्रत्यक्ष राज्यकारभारावर टीका करणारेहि निबंध लिहिले गेले. दादाभाई नौरोजी यानी १८६८ साली दिलेल्या एका भाषणाचें पुस्तक निघालें. त्यांत असंतुष्ट प्रजा व परकी फौज यांच्यांतील कलहाच्या भावी परिणामाबद्दल इषारा दिला आहे. राजकीय विचार ( १८६८ ) या पुस्तकात उमेशचंद्र यांचे प्रातिनिधिक राज्यकारभार, सनदी नोकरीत हिंदी लोकांचा प्रवेश, इत्यादि विचार मांडले आहेत. परंतु " राजकीय आंदोलनास अद्यापि म्हणण्यासारखा आरंभहि झाला नव्हता. त्यामुळें तें वाङ्मय शून्यच म्हटलें तरी चालेल ( म. ग. इं. अ. ११० ).

वि. ना. मंडलिक यांनी टॉड् च्या स्टुडंडस् गाइडच्या आधारें वयाच्या सोळाव्या वर्षीच व्यवहारशास्त्रावर व संवयी आणि अभ्यास यांवर निबंध लिहिले ( १८२७ ). हिंदुस्थानची मध्ययुगीन माहिती सांगून आपल्या विस्तृत कलाकौशल्याची जाणीव करून देणारा निबंध मंडलिकांनीं १८६२ मध्यें लिहिला. तत्कालीन ललित वाङ्मयाविषयी चिकित्सा करणारा असा एकच निबंध या कालखंडांत लिहिला गेला हें विशेष आहे. 'नावल व नाटक याविषयीं निबंध' हा का. बा. मराठे यांचा तो एकमेव निबंध होय ( १८७२ ). या निबंधात तत्कालीन ललितवाङ्मयावर अतिशय सडेतोड टीका केली आहे.

ज्ञानप्रसारक मासिकांतून सृष्टिसौंदर्य, आत्मशिक्षण, लिहिण्याची शैली, इत्यादि निबंध येत. पुणें शालापत्रकांत कवितेविषयीं, मराठी भाषेविषयीं

व विविधज्ञानविस्तारांत मोरोपंत, कानडी भापा, संस्कृत कवि, इत्यादि विषयांवर निबंध येत. आपणास इंग्रजी विद्येनें झालेलें ज्ञान अज्ञ बांधवांना देण्याची जबाबदारी आपल्यावर असल्याच्या जाणीवेनें गुरूच्या भूमिकेवरून बरेंच निबंधलेखन या काळीं झालें.

" तथापि कोणतें ज्ञान समाजास त्या कालांत आवश्यक होतें याचा फारसा विचार लेखकांनीं केलेला दिसत नाहीं. बहुतेक निबंधांचें कोणत्या ना कोणत्या तरी इंग्रजी वाङ्मयाचें समृद्ध स्वरूप पाहून हें लेखक दिपून गेले होते. परंतु ज्ञानभांडार आणि विचारांचें वैभव आत्मसात् केल्याखेरीज नुसत्या अनुवादात्मक निबंधांत तेज आणि जिव्हाळा कसा येणार ? " (प्रा. श्री. रा. पारसनीस. अर्वाचीन गद्य ३).

ज्ञानप्रसाराच्या हेतूनें लिहिणाऱ्या निबंधलेखकांत बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन हे प्रमुख होत. बाळशास्त्री जांभेकर यानी 'दर्पण' व 'दिग्दर्शन' या आपल्या नियतकालिकांत मनोरंजन करीत ज्ञान देण्याच्या पद्धतीनें अनेक विपयांवर निबंध लिहिले. भाऊ महाजन हे आपल्या प्रभाकर पत्रातून समाजप्रगतीस पोपक असे अनेक विपय लिहीत. " या दोघां पंडितांनी प्रज्ञाप्रधान वाङ्मयाचा पुरस्कार करून मराठी गद्यरचनेला नवीन वळण लावलें. " ( अ. म. ग. पृ. १३७ ).

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी मराठी शालापत्रकांतील आपल्या निबंधांनीं निबंधाचा एक आदर्श निर्माण केला. प्रौढ पण सुबोध व शुद्ध अशी भापा लिहिण्यांत ते या काळातील सर्व लेखकात गुरुस्थानीं शोभतात. " संस्कृत भापाव्यासंग करूनहि कृष्णशास्त्री यांच्या भापाशैलीत सुबोध व सरस मराठी वळण कायम राहिलें आहे. " ( अ. ग. ४ ).

जागृतिप्रधान निबंधलेखकात या कालखंडांत लोकाहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, जोतीबा फुले, यांची कामगिरी फार मोठी आहे. वाङ्मयनिर्मितीसाठीं त्यांनीं लेखन केलें नाही. आपले विचार सांगण्याचें एक मध्यम म्हणून त्यांनीं लेखन केलें. तरी त्यांच्या तेजस्वी विचाराचें वाहन झाल्यामुळें त्यांच्या भापेसहि तेज येणें अपरिहार्य होतें. मराठी गद्याचें या कालखंडांतलें तेजस्वी स्वरूप या लेखकांच्या निबंधांत पहावयास

सांपडतें. त्यांचें लेखन बरेंचसें नियतकालिकांतूनच आलेलें आहे.

लोकहितवादी ( १८२३–९२ ) हे जागृतिप्रधान लेखनाच्या प्रवृत्तीचे या कालखंडांतले प्रतिनिधिलेखक आहेत. भाऊ महाजन यांच्या प्रभाकर पत्रांतून त्यांनीं १८४८ पासून लेखनास आरंभ केला. लोकहितवादी या सहीनें त्यानीं प्रभाकरांत १८५० पर्यंत निबंधवजा जीं पत्रें लिहिलीं, तीं ' शतपत्रें ' हा एक अविस्मरणीय ग्रंथ आहे. ' देश अज्ञानानें बुडाला तेव्हां सर्वत्र ज्ञान शतमुखांनीं वाढविलें पाहिजे ' हा त्याच्या लिहिण्या-बोलण्याचा मुख्य रोख आहे. याचें प्रतिपादन करतांना त्यांनी ब्राह्मणांवर व ब्राह्मणी राज्यावर फारच हत्यार चालविलें. पण त्यांत समतोलपणा न राखल्यामुळें कित्येक स्थळीं त्यांचें लिहिणें कुत्सित व अन्यायाचें झालें आहे. यामुळें त्यांच्या लेखापासून व्हावी तितकी इष्ट कार्यसिद्धि झाली नाहीं." ( म ग. इं. अ. ८८ ). परंतु लेखनाच्या परिणामाचा विचार सोडल्यास त्यांच्या निबंधांत जें वैशिष्ट्य आहे तें उपेक्षणीय नाहीं.

"त्यांच्या ठिकाणी प्रथम लोकहितेच्छा व तदनुषंगानें वाचन, संशोधन, लेखन अथवा इतर कोणताहि उद्योग अशी स्थिति होती. त्यामुळें त्यांच्या प्रचंड ज्ञानसंग्रहास व ग्रंथभांडारास एक विशिष्ट ध्येयात्मक वळण असल्याचें सर्वत्र प्रत्ययास येतें. जिव्हाळयामुळें उद्बोधनाचें व सुलभतेमुळें ज्ञानदानाचें कार्य लोकहितवादीच्या गद्यग्रंथसंभारानें अत्यंत यशस्वितेनें केलें. मराठी भाषेला सर्वस्वीं नवीन असे विषयहि अगदी व्यवहारांतील भाषेंत विशद करण्याची त्यांची हातोटी केवळ असामान्य होती."

( प्रा. श्री. के. क्षीरसागर, व्यक्ति आणि वाङ्मय १६–२० )

लोकहितवादींचा ' आक्रोश '—

" मला तर असें वाटतें कीं, स्त्रियांचें दुःख इतकें भारी आहे कीं, त्याची स्मृति झाली तर रोमांच उभे राहतात...हे ब्राह्मण लोक आपल्या मुली मारल्यापेक्षां अधिक दुःखांत ठेवितात...अद्यापि या सुधारणेविषयीं उलटें बोलणारे आहेत. परंतु जसा व्याघ्र रानांत माजला तर ( त्यास ) सर्वजण जाऊन मारतात, तसें या उलटें बोलणारांचा लोक धिकार कां करीत नाहींत ? व याविषयीं एक मत कां होत नाहीं ?

बारा, पंधरा, वीस, तीस वर्षांच्या पोरींचे गळे कापतात हें पाहून अंतः-करण खवळून न जावें काय?...तुम्हीच आपल्या मुलींचे खाटीक स्वस्थपणें होतां. तुमच्या सारिखें राष्ट्र आणि तुमच्यातील विद्वानांसारखे विद्वान यांस तुळणा पृथ्वीवर कोठेंही मिळणार नाहीं. हेंच खरें....यांत नीति नाहीं, धर्म नाहीं, विचार नाहीं, सत्कर्म नाहीं व युक्ती नाहीं; मागें करीत आले व लिहून ठेवलें म्हणून पुढें करितात. परतु त्यांची कांहीं मर्यादा पाहा. लक्षावधि स्त्रिया उपाशी मरतात. घर नाहीं, दार नाहीं, वस्त्र नाहीं, अन्न नाहीं. आणि हे दुष्ट पंडित अशा प्रकरणांत दैत्यासारखे निष्ठुर होऊन बोलतात, त्यास काय म्हणावें ?" † ( शतपत्रें १०४ )

विष्णुबुवा ब्रह्मचारी हे एक मोठे विचारप्रवर्तक लेखक होते. त्यांनीं सुखदायक राज्यप्रकरणी निबंध ( १८६७ ) व सहजस्थितीचा निबंध ( १८६८ ) हीं दोन निबंधात्मक पुस्तकें या कालखंडांत लिहिलीं. सर्व जग हें एक कुटुंब आहे या तत्त्वावर त्यांनीं आदर्शराज्यव्यवस्थेचें चित्र रेखाटलें आहे. त्यात संभवनीयतेपेक्षा कल्पनाविहार बराच आहे. तरी आपले विचार मांडण्याच्या त्यांच्या आवेशपूर्ण पद्धतीनें निबंध आकर्षक झाले आहेत.

" निरनिराळ्या धार्मिक, सामाजिक व राजकीय प्रकरणी त्यांचीं मतें पुष्कळ स्वतंत्र प्रकारचीं होतीं. इंग्रजी राज्यपद्धतीचा त्यांनी अनुभव घेतला होता व नव्या वाऱ्याशीं झगडून त्यांची बुद्धि कणखर बनली होती. जुन्या पद्धतीच्या तपश्चर्येनें व एकांतांतील चालनेनें त्यानी मतें स्थिर केलीं होतीं व युयुत्सुभावनेनें त्यांनी स्वधर्मातर्फेनें तेजस्वी झगडा केला...हिंदुधर्माचे उज्ज्वल चारित्र्याचे व जिव्हाळ्याचे असे विद्वान् पुरस्कर्ते त्या काळात मुंबई प्रांतीं विष्णुबुवासारखे एक दोन सोडून फार करून कोणी नव्हते. "–प्रा. द. वा. पोतदार–म. ग. इ. अ. ९२, ९६

## विष्णुबुवांचें "सुखदायक राज्य"

" सर्व प्रजेकडून सर्व जमिनीची लागवड करवावी. ती अशी कीं

---

† किता. पत्र नं. १०४

ज्या ठिकाणीं जी वनस्पति चांगली पिकेल त्या ठिकाणी तिची लागवड करावी...आणि अनेक प्रकारचीं फळें, कंद, भाज्या, अन्न, (वगैरे)... उत्पन्न करून गांवोगांव कोठारें भरून ठेवावीं. व त्यांतून सर्व गांवकऱ्यानी पोटास लागेल तितकें अन्न न्यावें, व जनावरास चारा न्यावा. याप्रमाणें शीतकाळ, उष्णकाळ व पर्जन्यकाळ या बाराहि महिन्यांत एकसारखें सर्व जमिनींतून उत्पन्न करावें आणि तें सर्वांचें उत्पन्न एकच व एकाचेच ताब्यांत राहून त्यांतून खावयास विपुल न्यावें व राजानें लोंकरीचे, तागाचे, रेशमाचे व कापसाचे याप्रमाणे अनेक तऱ्हेचे कपडे तयार करावे आणि गांवोगांव खजिन्यांत ठेवावे. त्यांतून ज्याला जो कपडा पाहिजे तो त्यानें न्यावा. व सोन्यारुप्याचे, मोतीं, हिरे यांनीं जडलेले अलंकार तयार करून गांवोगांव ठेवावे व सर्व स्त्रिया पुरुषांनीं वापरावे आणि मोडले म्हणजे पुनः राजाच्या खजिन्यांत टाकावे आणि नवे घेऊन जावे. तशीच, शस्त्रें, यंत्रें, तयार करून गांवोगांव ठेवावी व सर्व प्रकारचे खेळ गांवोगांव ठेवावे. व आगगाड्या व तारायंत्रें गांवोगांव असावीं. व सर्व प्रकारच्या कारखानदारांनीं व शेतकऱ्यांनीं व राजानें एकसारखें अहिंसक खाणें खावें व तें सर्वांनीं एका कोठारांतून नेऊन खावें. व सर्वांचीं लग्नें करण्याच्या खात्याच्या मार्फतीनें राजानें करावीं. व आवड नसली तर पुनः ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा, म्हणजे स्वयंवर असावें व सर्वांचीं पांच वर्षांचीं पोरें झालीं म्हणजे मुलगे व मुली राजाच्या ताब्यांत द्यावे. नंतर त्यानें त्याना सर्व विद्या शिकवून ज्याला ज्या कामांत जास्ती उद्योग करण्याची संवय असेल त्याला त्या कामाकडे लावून द्यावा व स्त्रियापुरुष वृद्ध झालीं म्हणजे त्यांच्याकडून कामधंदा न करवितां त्यांनीं स्वस्थ बसून खावें व त्या त्या खात्याचे 'पार्लमेंट' सभेचे सभासद असावे आणि जगत् भासणाराचे उपकार आठवीत बसावें."

—सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध.

"जोतीबांच्या विचारसरणींत ब्राम्हणद्वेष आणि शास्त्रशुद्धतेचा अभाव हे दोन दोष प्रामुख्यानें आढळतात. तरी पण त्यांच्या मनाची

तळमळ, त्यांचा स्वार्थत्याग, आपल्या मतांचा प्रचार करण्यांत त्यांनीं दाखविलेलें धैर्य, मागासलेल्या जातीच्या उन्नतीसाठीं त्यांनीं सोसलेले कष्ट, इत्यादि गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे त्यांच्या मोठेपणाबद्दल कोणालाही शंका राहणार नाहीं. " ( अ. म. ग. पृ. १८२ ).

जोतीबांनीं जाणलेली " गुलामगिरी "—

" अरे कित्येक घरंदाज अज्ञानी शूद्रांचीं घराणीं इर्षेस पेटून एकमेकांशीं लढत असतां आंतून या कलमकसयांसहित दुसऱ्या भटकामगारांचीं घरें शेंकारता शेकारतां धुळीस मिळालीं नसतील काय ? अरे या कसायांच्या नारदशाईमुळें मुलकी, फौजदारी आणि दिवाणी खात्यांत अतोनात खर्च फुगून त्यांतील बहुतेक कारकून मामलेदारासहित चिटणीसांनीं आपल्या " तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् " या अस्सल बीजमंत्रास हरताळ लावून त्याबद्दल " चिरिमिरि देव " या यवनी गायत्रीचा उपदेश त्या पवित्र भट्टमुल्लापासून त्यांनीं घेतल्यामुळें भट वकीलांची दलाली वाढून ते मोठमोठ्या रथांत बसून पोळासारख्या डुरकया फोडीत फिरतात कीं नाहीं ? "—गुलामगिरी पृ. ८९

आपल्या निबंधमालेनें ज्यांनीं महाराष्ट्राच्या वैचारिक आणि वाङ्मयीन जीवनांत एका नव्या युगाचा आरंभ केला तो " मराठी भाषेचा शिवाजी " विष्णुशास्त्री चिपळूणकर हे १८५० मध्यें जन्मले. १८७४ मध्यें त्यांनीं निबंधमाला सुरू केली. मराठी वाङ्मयाच्या नवयुगाचा पूर्ण उदय झाला.

एकंदरीत—मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराच्या १८७४ पर्यंतच्या कार्यासंबंधीं प्रा. पोतदार म्हणतात : "सामग्र्यानें जेव्हां या काळांतील मराठी ग्रंथ व ग्रंथकार आमच्यापुढें उभे राहतात, तेव्हां आम्हांस प्रांजलपणानें असें कबूल करणें भाग पडतें कीं, या पाऊणशें वर्षांत ( १८१०–१८७४ ) एकहि अलौकिक किंवा अजरामर ग्रंथ मराठींत झाला नाहीं. लहानसहान सटरफटर ग्रंथ भराभर झाले, तारागण पुष्कळ

उगवला पण तमोनाशक चंद्र मात्र कोठेंच आढळला नाहीं ( म. ग. इं. अ. ५ ).

"मराठी गद्याचा इंग्रजी अवतार करविण्यांत अनेक हेतु होते. ज्ञान प्रसाराचा शुद्ध हेतुहि त्यात होता. त्याबरोबर इंग्रजी सुधारणेची भुरळ देशी मंडळीवर पाडून ती वश करून घ्यावी असाहि एक डाव होता.. पण ज्या भूमीत हा अवतार झाला त्या भूमीचा व तेथील अन्नपाण्याचा गुण त्याला हळू हळू लागल्याशिवाय कसा राहील ? ख्रिस्तीमतें व सुधारक मतें यांची चलती कांहीं दिवस चालली; पण माधव चंद्रोबा, परशुराम पंत तात्या, इत्यादिकांनी जुन्या प्राचीन सारस्वताचा पुनर्दर्शनाभ्यास घडविला व मराठी वाङ्मयाच्या आंदोलनाचें नवें क्षेत्र पुण्यास बळावलें याचा परिणाम बराच झाला व लोकांची दृष्टि निवळूं लागली. पुढे इंग्रजीची भुरळ व छाप उतरत चालली. व विष्णुशास्त्री यांनी आपल्या तोफा डागल्या तेव्हांपासून सारस्वताच्या स्वरूपांत मोठी क्रांति घडून आली. जुन्या ऐश्वर्याची जाणीव देऊन शास्त्रीबोवांनीं मोठा ... राष्ट्रांत उत्पन्न केला–( प्रा. द. वा. पोतदार.–म. ग. इं. अ. प्र. ७).

---